# प्रस्तावना

माझ्या लेखां ची आणि व्याख्यानां ची ही निवड अध्यापक चोरघडे ह्यां नी केलेली आहे। 'जीवन-दृष्टि' हें रसिक आणि समर्पक नांव हि त्यां नी च योजलेलें आहे। पहिली आवृत्ति मी कृष्ण-मंदिरा त असताना च निघाली होती। ह्या तील व्याख्यानें ह्या आवृत्ती त संशोधिलीं आहेत। लेखां त कांही विशेष फरक करायचा नव्हता। कुठे अेखादा शब्द बदलला आहे। अनुक्रमणी त लेख तेवढे तारके ने दर्शविले आहेत।

हें पुस्तक विद्यार्थि-वर्गाच्या वाचना त येणार आहे। त्यां ना आणि सर्वां ना च माझी अशी सूचना आहे की त्यां नी जीवन-दृष्टी ने त्या च्या कडे पहावें। केवळ साहित्य-दृष्टी ने पाहूं नये। त्यां तील विचारां ची बुद्धि-पूर्वक छाननी करावी। आणि जें ग्रहण होअील तें आचरणा त आणण्या चा प्रयत्न करावा। 'साहित्या ची दिशाभूल' हा लेख प्रथम वाचावा। नंतर अितर लेख आणि व्याख्यानें वाचावीं।

ज्ञाना पेक्षा हि दृष्टि महत्त्वा ची असते। चोरघड्यां च्या अपेक्षे प्रमाणे ह्या पुस्तका ने वाचकां ना ती लाभावी।

परंधाम, पवनार<br>ता० ६-७-४६

विनोबा

# अनुक्रमणिका

# जीवन-दृष्टि

## १ माझी तळमळ

यज्जातीयो यादृशो यत्स्वभावः
पादच्छायां संश्रितो योऽपि कोऽपि ।
तज्जातीयस् तादृशस् तत्स्वभावः
श्लिष्यत्येनं सुंदरो वत्सलत्वात् ॥

—श्रीकूरयल्वार

हा तामिळ वैष्णव भक्ताचा एक श्लोक आहे. त्याचा अर्थ असा :

भगवंताच्या चरणाच्या सावलीचा ज्यानें आश्रय केला त्याला भगवान् सुंदरराज वात्सल्यभावानें मिठी मारतो. भक्त ज्या जातीचा, जशा स्वभावाचा, आणि जसा असेल, देव त्याच्यासाठीं त्या [illegible]चा, तशा स्वभावाचा आणि तसा बनत असतो.

मदुरेजवळील सुप्रसिद्ध ‘अळगार’ मंदिरांत भगवान् विष्णूची मूर्ति फार प्राचीन काळीं स्थापिलेली आहे. त्या मूर्तीला सुंदरराज हें नांव आहे. हिंदी-प्रचार-सभेच्या पदवीदान-समारंभासाटीं मद्रासला गेलों असतां मदुरा येथील मीनाक्षीदेवीच्या दर्शनाला जाऊन आलों. त्या वेळीं तेथून ८ मैलांवर डोंगरांतील सुंदर स्थानांत वसलेल्या ह्या सुंदरराजाचें दर्शन प्रभु-कृपेनें मला लाभलें होतें. कारण, मीनाक्षीप्रमाणें सुंदरराजानें हें मंदिर हि हरिजनांना

मोकळें करण्यांत आलें आहे. मूर्ति नांवाप्रमाणें च सुंदर असून पंढरपुरच्या पांडुरंगाची आठवण करून देणारी आहे. कटीवर हात नाहींत. बाकी थाट तो च आहे. कोरीव काम, भव्य गोपूर इत्यादि दक्षिणेकडील विशेषता आहे. ती अर्थात् पांडुरंगाला लाभलेली नाहीं. बाकी भक्तवत्सलता ती च आहे. पांडुरंगाप्रमाणें च सुंदरराज हि तिकडे 'चित्त-चोर' ह्या संज्ञेनें प्रसिद्ध आहे. पांडुरंगाची प्रसिद्धि हि सुंदरराजाच्या भक्त-मंडळींत आहे. त्यांपैकीं एकानें पांडुरंगाचें वर्णन असें केलें आहे :

मा यात पान्थाः पथि भीमरथ्यां
दिगम्बरः कोऽपि तमालनीलः ।
विन्यस्त-हस्तोऽपि नितम्बबिम्बे
धूर्तः समाकर्षति चित्तवित्तम् ॥

"वाटसरांनो, भीमानदीच्या रस्त्यावर जाऊं नका. तिथें सांवळ्या रंगाचा एक दिगंबर राहतो. कंबरेवर हात टेवून उभा दिसतो. पण असा धूर्त आहे, कीं लोकांचें चित्तरूप वित्त हरून घेतो."

पांडुरंग आणि सुंदरराज दोन्ही मिळून देव एक च आहे. देवाचा स्वभाव देवानें कधीं च सोडला नाहीं. कनवाळू, कृपाळू, भक्तवत्सल, जात-गोत न पाहणारा, नामदेवाच्या भाषेंत, "सर्वांलागीं यावें समान दर्शन," अशा वृत्तीचा. सुंदरराजाच्या मंदिरांत हरिजन-प्रवेश झाल्यामुळें नामदेवाची आणि कूरथल्वारची भावना त्याच्या बाबतींत तृप्त झाली, असें म्हणतां येईल. पांडुरंगाचें असें केव्हां होईल ? तेथें मनुष्यमात्राला प्रवेश केव्हां लाभेल ?

नामदेवाच्या काळीं तर नामदेवाला न स्वतः त्याच्या कुटुंबाच्या पंधरावर आरंभीं पंढरपुरच्या देवळांत प्रवेश मिळाला नव्हता. तेव्हां--

पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा ।
पतितपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥

असा नामदेवाला सत्याग्रह करावा लागला होता. त्याच्या पुरता तो सत्याग्रह त्या वेळीं यशस्वी झाला. पण आतां एकूण हरिजनांचें सर्व

भक्तमंडळींनीं नामदेवाप्रमाणें सत्याग्रह करण्याची जरूर आहे. सत्याग्रह हरिजनांनीं देवळांत घुसण्याचा नव्हे–तो दुराग्रह होईल–पण जोंपर्यंत हरिजनांना प्रवेश नाहीं तोंपर्यंत भक्तमंडळींनीं तेथें न जाण्याचा.

हा सत्याग्रह माझा तर सतत चालू आहे. माझी पांडुरंगाविषयींची भक्ति माझें हृदय जाणते. माझी मूर्तीच्या दर्शनावर श्रद्धा आहे. ज्ञानदेवादिकांच्या विचार-संगतींत माझा आतांपर्यंतचा जन्म गेला आहे. पण अजून मी इच्छा असून हि पांडुरंगाचें स्वनेत्रांनीं दर्शन करूं शकलों नाहीं. "जोंपर्यंत हरिजनांना तुझ्या ह्या राउळांत प्रवेश नाहीं, तोंपर्यंत मी हि माझ्या जागीं बरा" असें मी पांडुरंगाला म्हणत असतों. माझी तळमळ तो जाणतो. आणि त्याला हि ती च तळमळ आहे ह्याविषयीं मला शंका नाहीं.

"काळी घोंगडी काळी काठी। काळा दोरा कंठीं
बोली महाराची थेट मऱ्हाटी। गांडीस लंगोटी
पाईं वाहणा मोठा शाहणा। पतित-पावन नाम जयाचें"

ग्रा. से. वृ. ६–१ सुरगांव, ५-४-४२

---

# २ जीवनांतील तीन प्रधान गोष्टी

## उद्योग, भक्ति व शिक्षण

माझ्या जीवनांत तीन गोष्टींना मी प्रधान पद देतों. त्यांपैकीं पहिली म्हणजे उद्योग. आपल्या देशांत आळसाचें वातावरण फार आहे. बेकारीमुळें हि आळस शिरला आहे. शिकलेल्या लोकांनीं उद्योग करायचा च नाहीं! ज्या देशांतून उद्योग गेला त्या देशाला मोठी कीड लागली आहे, असें समजलें पाहिजे. जो म्हणून खातो, त्यानें उद्योग हा केला च पाहिजे. मग तो

---

पवनार येथें ता. २०-१२-१९३५ रोजीं सायंकाळच्या प्रार्थनेंत झालेलें एक प्रवचन.

उद्योग कोणता हि असो. पण उद्योगावांचून बसतां उपयोगी नाहीं. घरांत उद्योगाचें वातावरण पाहिजे. ज्या घरांत उद्योगाचें शिक्षण नाहीं, त्या घरांतलीं मुलें घराचें डोळ्यांदेखत वाटोळें करतील. संसार आधीं च दुःखमय. ज्यांनीं संसारांत सुख मानलें त्यांच्यासारखे भ्रमांत पडलेले दुसरे कोणी नाहींत. रामदासांनीं म्हटलें आहे—**"मूर्खांमाजीं परम मूर्ख। जो या संसारीं मानी सुख."** जो जो मला भेटतो तो तो दुःखाची च कहाणी सांगतो. मीं तर कधींचें च हें ओळखून ठेवलें आहे आणि पुष्कळ विचारान्तीं आणि अनुभवान्तीं तें पक्कें झालें आहे. तर असा हा संसार जर थोडासा सुखाचा करायचा असेल तर उद्योगाशिवाय सुटका नाहीं. सफाई करायची म्हटली तरी उद्योगी वृत्ति पाहिजे. आणि आज सगळ्यांना करतां येण्यासारखा उपयोगाचा असा उद्योग सूत कांतण्याचा आहे. कपडा प्रत्येकाला लागतो आणि प्रत्येक स्त्री, पुरुष, मुलगी, मुलगा सूत कांतून आपला कपडा काढूं शकतो. चरखा हा तर आपला मित्र होईल, शांति देणारा होईल—जर त्यावर आपण प्रेम करूं तर; मन उदास झालें कीं चरखा हातीं घ्यावा. मनाला बरें वाटेल. गटे नांवाच्या कवीचें एक काव्य आहे. त्यांत त्यानें एका बाईचें चित्र रंगविलें आहे. त्या बाईचें चित्त अतिशय शोकाकुल झालें होतें. तिला कांहीं च सुचेना. शेवटीं तिनें तकली हातांत घेतली. कवीनें असें दाखविलें आहे कीं तिला त्या तकलीनें सांत्वन मिळालें. आणि मी हें मानतों. उद्योगाशिवाय मनुष्यानें बसतां कामा नये. एखाद्याला झोंप येत असेल तर त्यानें निजावें. त्याचें मला कांहीं वाटणार नाहीं. पण उठल्यावर त्यानें वेळ आळसांत काढतां कामा नये.

दुसरी गोष्ट भक्तिमार्ग. लहानपणापासून माझ्यावर जर कोणता संस्कार घडला असेल तर तो भक्तिमार्गाचा. त्यावेळीं आईकडून शिक्षण मिळालें, पुढें आश्रमांत दोन्ही वेळच्या प्रार्थना करण्याची सवय लागली. त्यामुळें माझ्यांत तें मुरून च गेलें. पण भक्ति म्हणजे कर्मशून्यता नव्हे. आळस्याला उद्योग सोडून खोटी भक्ति नाहीं करायची. दिवसभर पवित्र उद्योग करून शेवटीं संध्याकाळीं आणि सकाळीं देवाचें स्मरण केलें पाहिजे. दिवसभर पापें करून, किंवा आळसांत घालवून प्रार्थना होत नाहीं. पण सत्कर्में करून, दिवस सेवेंत घालवून ती सेवा संध्याकाळीं देवाला अर्पण

करण्यासाठीं प्रार्थना होऊं शकते. आपल्या हातून नकळत झालेल्या पापांची देव क्षमा करतो. पाप झालें तर त्याबद्दल तीव्र पश्चात्ताप वाटायला पाहिजे. रोज १५ मिनिटें कां होईना, पण लहान थोर सर्वांनीं एकत्र येऊन निष्ठेनें प्रार्थना करावी. ज्या दिवशीं प्रार्थना झाली नाहीं तो दिवस वाया गेला असें समजावें. भगवान् नारदाला म्हणतात—'मी वैकुंठांत नसेन, एक वेळ योग्याच्या हृदयांत नसेन, सूर्यात हि नसेन; पण कुठें हि नसलों तरी जिथें नामघोष चालला असेल तिथें नेमका मीं सांपडेन.' पण हा नामघोष कर्म करून, उद्योग करून मग च करायचा. नाहींतर तें ढोंग होईल. असा हा माझा भक्तिमार्ग आहे.

आणखी एका गोष्टीचा मला नाद आहे. ती म्हणजे खूप शिकावें व शिकवावें. ज्याला जें येतें तें त्यानें दुसऱ्याला शिकवावें. आणि ज्याला जें शिकतां येईल तें त्यानें शिकावें. म्हातारा असला तरी त्यानें शिकावें. अभंग शिकावे, गीता पाठ करावी, गणित शिकावें. कांहीं ना कांहीं शिकावें च. आणि जें शिकवितां येण्यासारखें असेल तें शिकवावें. शाळेतल्या शिक्षणावर माझा विश्वास नाहीं. पांच-सहा तास मुलांना बसवून ठेवून त्यांचें शिक्षण होत च नाहीं. नाना उद्योग चालले पाहिजेत आणि त्यांत एखादा तास शिकविलें म्हणजे पुरें. आमची आई 'भक्ति-मार्ग-प्रदीप' वाचीत होती. तिला वाचतां कमी येत होतें. पण एकेक अक्षर वाचीत होती. एक दिवस एक अभंग पंधरा मिनिटेंपर्यंत तिचा वाचून च होत होता. मी माडीवर होतों. शेवटीं मीं खालीं येऊन तिला तो अभंग शिकवून दिला. तिला म्हणायला सांगितलें आणि पंधरा-वीस मिनिटांत तिचा तो अभंग पुरा झाला. त्यानंतर रोज तिला मी थोडा वेळ शिकवीत होतों. शेवटीं तें पुस्तक तिचें पुरें झालें. अशा रीतीनें जें जें शिकवितां येण्यासारखें आहे तें शिकवीत राहिलें पाहिजे व शिकत हि राहिलें पाहिजे.

ह्या तीन गोष्टींविषयीं मला सांगायचें होतें तें आज मीं सांगून दिलें आहे.

ग्रा. से. वृ. ५-२

---

उद्योग कोणता हि असो. पण उद्योगावांचून बसतां उपयोगी नाहीं. घरांत उद्योगाचें वातावरण पाहिजे. ज्या घरांत उद्योगाचें शिक्षण नाहीं, त्या घरांतलीं मुलें घराचें डोळ्यांदेखत वाटोळें करतील. संसार आधीं च दुःखमय. ज्यांनीं संसारांत सुख मानलें त्यांच्यासारखे भ्रमांत पडलेले दुसरे कोणी नाहींत. रामदासांनीं म्हटलें आहे—**"मूर्खांमाजीं परम मूर्ख। जो या संसारीं मानी सुख."** जो जो मला भेटतो तो तो दुःखाची च कहाणी सांगतो. मीं तर कधींचें च हें ओळखून ठेवलें आहे आणि पुष्कळ विचारान्तीं आणि अनुभवान्तीं तें पक्कें झालें आहे. तर असा हा संसार जर थोडासा सुखाचा करायचा असेल तर उद्योगाशिवाय सुटका नाहीं. सफाई करायची म्हटली तरी उद्योगी वृत्ति पाहिजे. आणि आज सगळ्यांना करतां येण्यासारखा उपयोगाचा असा उद्योग सूत कांतण्याचा आहे. कपडा प्रत्येकाला लागतो आणि प्रत्येक स्त्री, पुरुष, मुलगी, मुलगा सूत कांतून आपला कपडा काढूं शकतो. चरखा हा तर आपला मित्र होईल, शांति देणारा होईल—जर त्यावर आपण प्रेम करूं तर; मन उदास झालें कीं चरखा हातीं घ्यावा. मनाला बरें वाटेल. गटे नांवाच्या कवीचें एक काव्य आहे. त्यांत त्यानें एका बाईचें चित्र रंगविलें आहे. त्या बाईचें चित्त अतिशय शोकाकुल झालें होतें. तिला कांहीं च सुचेना. शेवटीं तिनें तकली हातांत घेतली. कवीनें असें दाखविलें आहे कीं तिला त्या तकलीनें सांत्वन मिळालें. आणि मी हें मानतों. उद्योगाशिवाय मनुष्यानें बसतां कामा नये. एखाद्याला झोंप येत असेल तर त्यानें निजावें. त्यानें मला कांहीं वाटणार नाहीं. पण उठल्यावर त्यानें वेळ आळसांत काढतां कामा नये.

दुसरी गोष्ट भक्तिमार्ग. लहानपणापासून माझ्यावर जर कोणता संस्कार घडला असेल तर तो भक्तिमार्गाचा. त्यावेळीं आईकडून शिक्षण मिळालें. पुढें आश्रमांत दोन्ही वेळच्या प्रार्थना करण्याची सवय लागली. त्यामुळें माझ्यांत तें मुरून च गेलें. पण भक्ति म्हणजे कर्मशून्यता नव्हे. आपल्याला उद्योग सोडून खोटी भक्ति नाहीं करायची. दिवसभर पवित्र उद्योग करून शेवटीं संध्याकाळीं आणि सकाळीं देवाचें स्मरण केलें पाहिजे. दिवसभर पापें करून, किंवा आळसांत घालवून प्रार्थना होत नाहीं. पण सत्कर्मे करून, दिवस सेवेंत घालवून ती सेवा संध्याकाळीं देवाला अर्पण

करण्यासाठीं प्रार्थना होऊं शकते. आपल्या हातून नकळत झालेल्या पापांची देव क्षमा करतो. पाप झालें तर त्याबद्दल तीव्र पश्चात्ताप वाटायला पाहिजे. रोज १५ मिनिटें कां होईना, पण लहान थोर सर्वांनीं एकत्र येऊन निष्ठेनें प्रार्थना करावी. ज्या दिवशीं प्रार्थना झाली नाहीं तो दिवस वायां गेला असें समजावें. भगवान् नारदाला म्हणतात—'मी वैकुंठांत नसेन, एक वेळ योग्याच्या हृदयांत नसेन, सूर्यांत हि नसेन; पण कुठें हि नसलों तरी जिथें नामघोष चालला असेल तिथें नेमका मी सांपडेन.' पण हा नामघोष कर्म करून, उद्योग करून मग च करायचा. नाहींतर तें ढोंग होईल. असा हा माझा भक्तिमार्ग आहे.

आणखी एका गोष्टीचा मला नाद आहे. ती म्हणजे खूप शिकावें व शिकवावें. ज्याला जें येतें तें त्यानें दुसऱ्याला शिकवावें. आणि ज्याला जें शिकतां येईल तें त्यानें शिकावें; म्हातारा असला तरी त्यानें शिकावें. अभंग शिकावे, गीता पाठ करावी, गणित शिकावें. कांहीं ना कांहीं शिकावें च. आणि जें शिकवितां येण्यासारखें असेल तें शिकवावें. शाळेतल्या शिक्षणावर माझा विश्वास नाहीं. पांच-सहा तास मुलांना बसवून ठेवून त्यांचें शिक्षण होत च नाहीं. नाना उद्योग चालले पाहिजेत आणि त्यांत एखादा तास शिकविलें म्हणजे पुरें. आमची आई 'भक्ति-मार्ग-प्रदीप' वाचीत होती. तिला वाचतां कमी येत होतें. पण एकेक अक्षर वाचीत होती. एक दिवस एक अभंग पंधरा मिनिटेंपर्यंत तिचा वाचून च होत होता. मी माडीवर होतों. शेवटीं मीं खालीं येऊन तिला तो अभंग शिकवून दिला. तिला म्हणायला सांगितलें आणि पंधरा-वीस मिनिटांत तिचा तो अभंग पुरा झाला. त्यानंतर रोज तिला मी थोडा वेळ शिकवीत होतों. शेवटीं तें पुस्तक तिचें पुरें झालें. अशा रीतीनें जें जें शिकवितां येण्यासारखें आहे तें शिकवीत राहिलें पाहिजे व शिकत हि राहिलें पाहिजे.

ह्या तीन गोष्टींविषयीं मला सांगायचें होतें तें आज मीं सांगून दिलें आहे.

ग्रा. से. वृ. ५–२

---

# ३ खोल अभ्यास

अभ्यासांत लांबीरुंदी महत्त्वाची नाहीं; खोली महत्त्वाची आहे. पुष्कळ वेळ तासचे तास आणि नाना विषयांचा अभ्यास करीत राहणें ह्याला मी लांबरुंद अभ्यास म्हणतों. समाधिस्थ होऊन रोज सतत अल्प वेळ एखाद्या निश्चित विषयाचा अभ्यास करणें ह्याला मी खोल अभ्यास म्हणतों. दहा बारा तास निजलों, पण तळमळत आणि स्वप्न-ग्रस्त असल्या झोपेनें विश्रांति मिळायची नाहीं. उलट पांचसहा तास निजलों, पण गाढ, निःस्वप्न, ह्या एवढ्या झोपेनें पूर्ण विश्रांति लाभूं शकते. अभ्यासाचें असें च आहे. समाधि हें अभ्यासांतील मुख्य तत्त्व आहे.

समाधियुक्त खोल अभ्यासाशिवाय ज्ञान नाहीं. लांबलचक अभ्यास म्हणजे पुष्कळसा तर भास च; शिवाय शक्तीचा ह्रास. अनेक विषयांवर आणि भाराभर वाचीत बसून कांहीं लब्धि नाहीं. अभ्यासानें प्रज्ञा स्वतंत्र आणि प्रतिभावान् व्हायला हवी. प्रतिभा म्हणजे नवीन नवीन कोंब बुद्धीला फुटत राहणें. नवीन कल्पना, नवीन उत्साह, नवीन शोध, नवीन स्फूर्ति हें प्रतिभेचें लक्षण. ही प्रतिभा भाराभर वाचनानें नेमकी मरायची.

वर्तमान जीवनांतील आवश्यक कर्मयोगाला अवकाश देऊन सगळा अभ्यास करायला हवा. नाहींतर पुढील जीवनाच्या आशेनें चालू काळांत मरण्यासारखा प्रकार होतो. शरीर ही वस्तु किती विश्वासाची आहे ह्याचा तर अनुभव प्रत्येकाला येत च असतो. देवाची आपणावर अपार कृपा म्हणून तो आमच्या ठिकाणीं कांहीं ना कांहीं व्यंग ठेवून च देतो. ह्या व्यंगाच्या जाणीवेनें आपण जागृत राहूं अशी त्याची अपेक्षा असते.

दोन बिंदूंनीं रेषा निश्चित होते. जीवनाचा मार्ग हि दोन बिंदूंनीं च निश्चित होतो. आपण आलों कोठून तो पहिला बिंदु आणि आपल्याला जायचें आहे कोठें तो दुसरा बिंदु. हे दोन बिंदु नक्की केले म्हणजे

जीवनाची दिशा ठरली. ही दिशा लक्षांत न घेतां कोठें तरी पाय फिरवीत राहण्यानें मार्ग आक्रमिला जायचा नाहीं.

सारांश, 'अल्प मात्रा, सातत्य, समाधि, कर्मांचकाश आणि निश्चित दिशा' हें खोल अभ्यासाचें सूत्र आहे.

(जुन्या पत्रांतील उतारा नूतनीकृत)

ग्रा. से. वृ. ऑगस्ट, १९४०

---

# ४ ब्रह्मचर्य

"मनुष्याचें जीवन हें व्यक्तिगत अनुभवाचें बनलेलें आहे. त्या अनुभवानें मानवसमाजाचा पुष्कळ विकास झाला आहे. परंतु हिंदुधर्मानें त्याचें शास्त्र रचून एक विशिष्ट साधना रूढ केली; ती म्हणजे ब्रह्मचर्य. इतर धर्मांत हि संयम आहे च; परंतु त्याला शास्त्रीय स्वरूप देऊन हिंदु-धर्मानें ज्याप्रमाणें त्यासाठीं शब्द बनविला तसा शब्द अन्यत्र आढळत नाहीं. झाड लहान असतांना त्याला उत्तमांतल्या उत्तम खताची आवश्यकता असते. पोषण जन्मभर हवें. पण निदान लहानपणीं तें सर्वांना मिळालें च पाहिजे. ह्या दृष्टीनें हिंदुधर्मानें ब्रह्मचर्याश्रम उभा केला. परंतु आज मी त्या आश्रमासंबंधीं न बोलतां ब्रह्मचर्य ह्या वस्तूसंबंधीं बोलणार आहें.

माझ्या अनुभवावरून माझें असें मत झालें आहे, कीं आजीवन ब्रह्मचर्य राखावयाचें तर ब्रह्मचर्याची कल्पना अभावात्मक असतां कामा नये. विषय-सेवन करूं नको, ही अभावात्मक आज्ञा झाली. ह्यानें काम भागत नाहीं. सर्व इन्द्रियांची शक्ति आत्म्यांत खर्च कर, अशी भावात्मक आज्ञा पाहिजे. ब्रह्मचर्याच्या बाबतींत असुक करूं नको एवढें सांगून भागायचें नाहीं. अमुक कर हें सांगितलें पाहिजे. आणि त्यासाठीं च 'ब्रह्मचर्य' शब्द योजिलेला आहे.

'ब्रह्म' म्हणजे कोणती हि बृहत् कल्पना. एखादा माणूस आपल्या मुलाची सेवा तो परमात्म-स्वरूप आहे असें समजून करतो, आणि पुत्र सत्पुरुष निघावा अशी इच्छा राखतो, तर पुत्र हें त्याला ब्रह्म झालें.

मुलासाठीं ब्रह्मचर्य पाळणें त्याला सोपें जाईल. आई मुलासाठीं रात्रंदिवस कष्ट सोसते. पण तिला आपण मुलासाठीं कांहीं च केलें नाहीं असें वाटतें. कारण, मुलाविषयींच्या प्रेमाशीं तुलना करतांना तिनें केलेले कष्ट तिला अगदीं अल्प वाटतात. त्याप्रमाणें ब्रह्मचारी मनुष्याचें जीवन तपानें संयमानें भरलेलें असतें. पण त्याच्यासमोर असलेल्या विशाल कल्पनेच्या मानानें तो सारा संयम त्याला अल्प च वाटतो. त्याच्या बाबतींत 'इन्द्रिय-निग्रह मी करतों' असा कर्तरि प्रयोग न राहतां 'इन्द्रिय-निग्रह केला जातो' असा कर्मणि प्रयोग उरतो. गरीब जनतेची सेवा हें ध्येय एखाद्यानें राखलें तर ती सेवा हें त्याचें ब्रह्म झालें. त्यासाठीं तो जें करील तें ब्रह्मचर्य. थोडक्यांत म्हणजे ब्रह्मचर्य-पालनाला कोणती तरी विशाल कल्पना डोळ्यांसमोर पाहिजे, तेव्हां ब्रह्मचर्य सोपें होतें. ब्रह्मचर्याला मी विशाल ध्येयवाद आणि तदर्थ संयमाचरण म्हणतों. ही ब्रह्मचर्यासंबंधीं मीं मुख्य गोष्ट सांगितली.

दुसरी एक गोष्ट सांगायची आहे. ती म्हणजे जीवनांतल्या लहान लहान गोष्टींत हि नियमन पाहिजे. खाणें, पिणें, बोलणें, बसणें, निजणें वगैरे सर्व बाबतींत नियमन पाहिजे. कसें हि वागूं आणि इन्द्रिय-निग्रह साधूं ही आशा व्यर्थ आहे. घड्याला लहानसें हि छिद्र असलें तरी तो पाणी ठेवण्याला निरुपयोगी होतो. तसें च चित्ताचें आहे."

( जुन्या भाषणांतून )

ग्रा. से. वृ. ४-८

---

# ५ उद्योगांत ज्ञानदृष्टि

माझ्या मित्रांनो,

१. काल मी बोललों, त्यांत सर्वजनांना मला काय सांगायचें होतें, हें सांगितलें. आज माझ्या समोर मुख्यतः शाळेची मंडळी आहेत. त्यांना उद्देशून मी बोलणार आहें.

औचित्यविचार

---

राष्ट्रीय शाळा तुमसर येथें ता. १४-२-४२ रोजीं शिक्षक, विद्यार्थी आणि गांवची मंडळी यांच्यासमोर दिलेलें भाषण.

२. ह्या शाळेशीं माझा पूर्वीपासून संबंध आहे. वीस वर्षांपासून ही

कार्यकर्त्यांविषयीं कृतज्ञता

शाळा चालू आहे. काळाशीं टक्कर देऊन ती टिकून आहे. तिच्यांत चिवटपणा आहे. ह्याचें श्रेय येथील शिक्षक-मंडळीला आणि जनतेला आहे. त्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

विज्ञान पाहिजे

३. माझ्या दृष्टीनें आमच्या शिक्षणांत आज जर कशाची विशेष गरज असेल, तर ती विज्ञानाची आहे. हिंदुस्थानचा उद्धार केवळ शेतीवर होणें नाहीं; हिंदुस्थान कृषिप्रधान म्हटला जातो. युरोपांतील राष्ट्रें उद्योगप्रधान म्हटलीं जातात. हिंदुस्थानांत शेती मुख्य असतांना माणशीं सव्वा एकर जमीन आहे. उलट फ्रान्समध्यें ती माणशीं साडे तीन एकर असून तो देश उद्योगप्रधान म्हटला आहे. ह्यावरून हिंदुस्थानची दशा किती वाईट आहे, तें कळून येईल. ह्याचा अर्थ हा होतो, कीं हिंदुस्थानांत एक शेती मात्र होते, दुसरें कांहीं होत नाहीं. अमेरिका (संयुक्त संस्थानें) जगांतील सर्वांत सधन देश आहे. त्यांत शेती आणि उद्योग दोन्ही भरपूर चालतात. तो युद्धासाठीं रोजचा पंचावन कोटि रुपये खर्च करीत आहे. आपल्या देशाची लोकसंख्या चाळीस कोटि. इतक्या लोकांना रोज जेवूं घालावयाचें, तर इथल्या मानानें पांच कोटि रुपये खर्च येईल. हिंदुस्थानला अकरा दिवस जेवण देतां येईल, इतका खर्च अमेरिका रोज युद्धासाठीं करीत आहे. इतकी ती श्रीमंत आहे. हिंदुस्थानांत माणशीं सालिना उत्पन्न पन्नास-साठ रुपये शेतीचें आणि बारा रुपये उद्योगाचें होतें. म्हणून च हिंदुस्थानला कृषिप्रधान म्हणावयाचें. आतां इंग्लंडचें पहाल, तर तेथें सालिना शेतीचें उत्पन्न माणशीं असें च पन्नास-साठ होतें आणि उद्योगाचें होतें पांचशें बारा रुपये. ह्यावरून आपला देश कोठें आहे तें पहा.

ही स्थिति पालटायला आपल्या येथील विद्यार्थी, शिक्षक आणि जनता सर्वांनीं च उद्योगांत तरबेज व्हायला पाहिजे. त्यासाठीं विज्ञान शिकायला पाहिजे.

(अ) आमचें स्वयंपाक घर ही आमची प्रयोग शाळा असली पाहिजे. तेथें काम करणाऱ्याला कोणत्या खाद्यांत किती उष्णांक, किती ओज, किती स्नेह इत्यादि सर्व शास्त्रीय गोष्टी माहीत पाहिजेत. कोणत्या वयाच्या

माणसाला, कोणत्या कामाला कसा आहार लागेल, ह्याचें गणित त्याला करतां आलें पाहिजे. (आ) शौचाला तर सर्व च जातात. पण शाळेंतील मंडळींचें तसें नाहीं चालायचें. मळाचा काय उपयोग होतो ? सूर्य किरणांचा त्यावर काय परिणाम होतो ? मळ उघडा पडल्यास त्यापासून कोणतें नुकसान होतें ? कोणते रोग फैलावतात ? त्याचें खत शेताला दिल्यास जमिनीचा कस किती वाढतो ? इत्यादि सर्व गोष्टींचें शास्त्रीय ज्ञान त्यापासून आपल्याला मिळविलें पाहिजे. (इ) एखादा मुलगा आजारी पडतो. तो कां आजारी पडला ? आजार आला तो फुकट आला नाहीं. त्याला तूं खर्च करून बोलावलेंस. अतिथीप्रमाणें त्याची वास्तपुस्त केली पाहिजे. तो कां आला, कसा आला इत्यादि चौकशी केली पाहिजे. त्याची यथास्थित पूजा, उपचार कसा करायचा तें समजून घेतलें पाहिजे. तो आला च तर त्याच्या पासून सर्व ज्ञान ग्रहण केलें पाहिजे. त्यांत शिक्षणाचा मुद्दा आहे. तो ज्ञानदाता आला आणि गेला; आपण कोरडेचे कोरडे ! असें इतरांप्रमाणें आमचें होतां कामा नये. (ई) तुम्ही येथें सूत कांततां, खादी काढतां. त्याबद्दल तुम्हांला धन्यवाद; परंतु खादी विद्येसंबंधीं शास्त्रीय प्रश्नांनीं उत्तरें जर तुम्हांला देतां आलीं नाहींत, तर शाळा आणि उत्पत्तिकेंद्र उर्फ कारखाना ह्यांच्यांत फरक तो काय राहिला ? परंतु मी तर कारखान्यांत हि ह्या ज्ञानाची अपेक्षा राखीन.

**आपला थोर वारसा**

४. इथल्या शाळेंतलीं मुलें इंग्रजी वगैरेच्या परीक्षांत उत्तीर्ण होतात, इतरांच्या मानानें तीं कमी नाहींत, इत्यादि मला सर्वां सांगण्यांत आलें. परंतु मुलें पास होतात ह्यांत विशेष तें काय आहे ? आपलीं मुलें नालायक थोडीं च असतात ? इंग्लंड-मधल्या मुलांना इतिहास-भूगोल शिकवा तें मराठींतून ? पाहूं किती पास होतात तीं ? बडोद्याला पुष्कळ वर्षांपूर्वी एक साहेब आला होता. त्यानें गीतेचा चांगला वीस वर्षें अभ्यास केला होता. तसा तो चांगला संस्कृत, परंतु त्याला संस्कृत वचन धड उच्चारतां आलें नाहीं. तो काय म्हणाला :

कुरु कर्मैव टस्माद् ट्वम् ।

वीस वीस वर्षें अभ्यास करून त्यांची ही दशा ! आपल्या येथें शेंकडों लोक त्यांच्या भाषेंत सरस बोलतात. परंतु हा आपल्या ह्या भूमीचा च गुण आहे. हजारों वर्षांपासून विद्येची उपासना येथें झाली आहे. हा कांहीं ह्या शाळेंतील गुरुजींचा गुण नाहीं. म्हणून इंग्रजी भाषेच्या ज्ञानावर आम्ही संतोषून चालणार नाहीं. आम्हांला आरोग्यशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञान, यंत्रशास्त्र इत्यादि शिकलें पाहिजे. शास्त्रांची आणि विज्ञानाची ही यादी ऐकून घाबरून जायला नको. तीं उद्योगाबरोबर सहज लीलेनें शिकतां येतील.

५. शिकायच्या विद्या दोन आहेत : एक आपल्या आसपासच्या वस्तु पारखण्याची शक्ति म्हणजे च विज्ञान; आणि दुसरी, आत्मज्ञानपूर्वक-संयम करायला येणें म्हणजे च अध्यात्म. ह्यासाठीं मध्यंतरीं निमित्तमात्र भाषा लागते, तेवढ्यापुरती च ती शिकावयाची. भाषा पोस्ट-मनचें काम करते. मीं जर पत्रांत कांहीं लिहिलें च नाहीं, तर पोस्टमन तो कोरा कागद हि पोंचवील. भाषा म्हणजे विद्येचें वाहन. ही हि किंमत कमी नाहीं. विज्ञान आणि अध्यात्म ही च विद्या. तिचा च मी विचार करीन. माझा चरखा मोडला तर का मी रडत बसेन ? मी सुताराकडे जाऊन तो दुरुस्त करून घेईन. तसें, विंचू चावला असतां मीं रडत बसतां कामा नये. त्याचा उपचार करून मोकळें झालें पाहिजे. अशा प्रकारें आत्म्याची अलिप्तता कळली पाहिजे. ती आंगवळणीं पडली पाहिजे. माझी शाळेची परीक्षा ही च. मी भाषेचा पेपर काढीत बसणार नाहीं. मुलांच्या बोलण्यावरून च त्यांचें भाषाज्ञान मला समजून येईल.

**द्विविध विद्या : विज्ञान आणि अध्यात्म**

६. विद्यार्थी जेवतात, आणि इतर मंडळी हि जेवते. परंतु त्या दोहोंत फरक आहे. विद्यार्थ्यांचें जेवण ज्ञानमय पाहिजे. त्यांनीं धान्य दळलें आणि चाळलें; त्यांत चाळ किती निघाला, तो ते नोंदून ठेवतील. समजा, शेरांतून आठ तोळे चाळ निघाला; म्हणजे हा दहा टके चाळ झाला. हा फार झाला. दुसऱ्या दिवशीं शेजाऱ्यांकडे जाऊन तो त्यांचा चाळ मोजील.

**शाळेंत ज्ञान-दृष्टि प्रधान**

त्याला आढळून येईल, त्यांच्या पिठांतून अडीच तोळे च चाळ निघतो. दहा टके चाळ निघाल्यास काय बिघडलें ? तितका चाळ पोटांत गेल्यास कां चालणार नाहीं ? इत्यादि प्रश्न त्याला सुचले पाहिजेत, त्यानें ते विचारले पाहिजेत, आणि त्यांचीं योग्य उत्तरें हि त्याला मिळालीं पाहिजेत. असें जर झालें तर गीतेंत म्हटल्याप्रमाणें त्याचें प्रत्येक कर्म ज्ञान-साधन होईल. ताप आला तर तो ज्ञान देऊन जाईल. तो प्रयोग होईल. पुन्हां तसला ताप येणार नाहीं. जेथें अशा प्रकारें प्रत्येक गोष्ट ज्ञानदृष्टीनें केली जाते ती शाळा; आणि जेथें ती च गोष्ट कर्मदृष्टीनें होते तो कारखाना. अशा प्रकारें प्रयोगबुद्धीनें, ज्ञान-दृष्टीनें प्रत्येक कर्म करायचें म्हटलें, म्हणजे थोडा खर्च होईल. पण त्यांतून तितकी कमाई होईल. शाळेंत चरखा म्हणजे उत्तम चरखा लागेल. तो कसला तरी चालणार नाहीं. तेथें काम थोडें कमी झालें तरी चालेल, पण तें आदर्श लागेल. कापूस मोजून घेतला जाईल. त्यांतून किती सरक्या निघाल्या, त्या हि मोजल्या जातील. रोझिगांतून इतक्या निघाल्या, व्हेरममधून इतक्या कां ? असा प्रश्न विचारला जाईल. आणि त्याचें उत्तर हि दिलें जाईल. सरकी वाटाण्याच्या च आकाराची, पण त्यांच्या वजनांत फरक कां ? सरकींत तेल आहे म्हणून ती हलकी. मग अशीं च दुसरीं धान्यें कोणतीं, तें पाहण्यांत येईल. त्यासाठीं तराजू लागेल, तो बाजारांतून नाहीं आणावयाचा. तो शाळेंत च बनवायचा. असें सर्व करायचें म्हटलें, कीं झालें विज्ञान सुरू. अशा रीतीनें प्रत्येक गोष्ट करूं लागल्यास तें ज्ञान किती मनोरंजक होईल ? मग तें कोण विसरेल ? गो अकबर अमक्या सालीं मेला तें कशाला घोकायचें ? तो मरून गुलच्या आणि आमच्या कां बोकांडीं बसला ? मी इतिहास घोकायला नाहीं जन्मलों. मी तो निर्माण करायला जन्मलों आहें.

शिक्षकाच्या दृष्टीनें प्रत्येक गोष्ट ज्ञान देणारी आहे. उदाहरणार्थ, मळ च पहा. तो फार मोठें शिक्षण देतो. मी तर त्याबाबत एक श्लोक च बनविला आहे : **'प्रभाते मलदर्शनम्.'** सकाळीं त्याच्या दर्शनानें आपणाला आपलें आरोग्य कसें आहे, त्याचें ज्ञान होईल. मळांतील दुर्गुणानें पुन्हां काल पोटावर केलेल्या अत्याचाराचें आणि अपचनाचें ज्ञान आणि भान

करवितील. त्याप्रमाणें आपण आपल्या आहारविहारांत फरक करूं. किती हि काळजी घेतली, तरी मळ घाण च. तो सकाळीं अवलोकून आपली देहासक्ति कमी होऊन वैराग्य लाभेल. आणि आई जशी थंडीच्या दिवसांत मुलाच्या आंगावर पांघरूण घालते, आणि कोणतें हि अंग उघडें पडलें नाहीं ह्याची काळजी घेते, त्याप्रमाणें जर काळजीपूर्वक आपण मळ कोरड्या मातीनें नीट झांकला, आणि योग्यकाळीं शेतांत पसरवला, तर तो च आपली लक्ष्मी वाढवील. **आरोग्य-वैराग्य-सौभाग्य-दातृ !**

ह्या च प्रमाणें शाळेंतील प्रत्येक कर्म ज्ञानदायी आणि व्यवस्थित होईल. मुलगा बसेल तर ताठ बसेल. घराचा धारण वांकला तर घर टिकेल का ? नाहीं. तसा आपला मेरुदंड हि आपण सर्वदा ताठ राखला पाहिजे. शाळेंत जर ह्याप्रमाणें कार्य होईल, तर राष्ट्र पाहतां पाहतां बदलून जाईल. त्याचें दुःखदैन्य नाहींसें होईल. सर्वत्र ज्ञानाची प्रभा फांकेल.

७. शाळेंतील प्रत्येक गोष्ट ज्ञानसाधन बनवायची म्हटलें, म्हणजे त्यासाठीं शाळा सजवाव्या लागतील. उत्तम उत्तम साधनें ठेवावीं लागतील. रामदासांचें वचन आहे : "**देवाचें वैभव वाढवावें**"

शाळेबाबत जनतेचें कर्तव्य

आपल्या लोकांना आपलीं घरें शृंगारण्याची नव्हे, पण शाळा शृंगारण्याची हौस वाटली पाहिजे. त्यांनीं शाळेच्या गरजेच्या सर्व गोष्टी शाळेला मिळवून दिल्या पाहिजेत. परंतु एवढें हि बस नाहीं. एखादा दानशूर भेटतो आणि म्हणतो, मीं शाळेला इतकी मदत केली. परंतु आपल्या स्वतःच्या मुलाला कोठल्या शाळेंत घालतो ?—तर सरकारी शाळेंत. हें असें कां ? जर राष्ट्रीय शाळा दानास पात्र समजतां, तर त्या सर्व प्रकारें सजवून आपल्या मुलाला तेथें च कां नाहीं पाठवीत ?

मुलें राष्ट्राचें धन. आणि त्यांच्या भोजनांत नाहीं दूध, नाहीं तूप ! मुलापरत मासिक भोजनखर्च अडीच रुपये ! ह्याला काय म्हणतात ? राष्ट्राची एकूण स्थिति विसरतां येत नाहीं; तरी जितकें कमींत कमी देणें जरूर तितकें द्यायला च पाहिजे. मागें जेलमधील सत्याग्रहींना योग्य अन्न मिळत नव्हतें, दूध मिळत नव्हतें, त्याबद्दल त्यांची तकरार होती. गांधी-

जींच्या सूचनेवरून बाहेरील नागरिक डॉक्टर लोकांनीं शाकाहारी माणसाला कमींत कमी किती दूध मिळायला पाहिजे तें ठरविलें. त्यांनीं कमींत कमी ३० तोळे दूध प्रत्येकाला मिळालें पाहिजे असा निर्णय केला होता. आणि सरकारनें जर कैदी ठेवले आहेत, तर त्यानें ती किमान गरज पुरवली न पाहिजे. पण जर आम्ही च त्याची अंमलबजावणी शाळेंत करीत नाहीं तर तें कसें शोभेल? मुलांना दूध मिळालें पाहिजे, त्यांना उत्तम अन्न मिळालें पाहिजे. तसें जर केलें नाहीं, तर त्यांच्यांत तेज उत्पन्न होणार नाहीं.

८. मी कांहीं वस्तु शिक्षकांना, कांहीं विद्यार्थ्यांना आणि कांहीं इतरांना सांगितल्या. त्या सर्व मी आपल्या अनुभवांतून सांगितल्या आहेत, त्यांचा योग्य उपयोग होईल, अशी मी आशा करतों.

आ. से. वृ. ६-१

---

# ६ साहित्याची दिशाभूल

खेडोंपाड्यांच्या सर्वसामान्य शिकलेल्या लोकांच्या वाचनांत मुद्रित वाङ्मय कोणतें आढळून येतें यासंबंधीं मागें एकदां आम्हीं तपास काढला होता. परिणामीं असें आढळून आलें कीं एकूण पांच प्रकारचें वाङ्मय प्रायः वाचलें जातें— (१) वर्तमानपत्रें (२) शालोपयोगी पुस्तकें (३) नाटक, कादंबरी, गोष्टी इत्यादि (४) पौराणिक आणि प्राकृत धार्मिक ग्रन्थ आणि (५) वैद्यकीय नोटिसीं.

लोकांचें मन सुधारणें म्हणजे वरील पांच प्रकारचें वाङ्मय सुधारणें असा मानून अर्थ निघत होतो. यंदाच्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांनीं पहिल्या प्रकारचें म्हणजे वर्तमानपत्री वाङ्मय मराठी भाषेंत किती अधो-गतीला पोंहोचलें आहे इकडे महाराष्ट्रांतील विद्वानांचें आणि साहित्यिकांचें लक्ष वेधलें आहे. आणि तसें करतांना त्यांनीं मराठी भाषेची योग्य सेवा केली आहे असें म्हटलें पाहिजे.

गेल्या वर्षीची गोष्ट आहे. आमचे एक मित्र मला म्हणाले, 'मराठी भाषा किती उंच जाऊं शकते हें ज्ञानदेवांनीं दाखविलें; आणि ती किती खालीं पडूं शकते हें सांप्रतचीं वर्तमानपत्रें दाखवीत आहेत!' अध्यक्षांनीं केलेल्या टीकेचा आणि आमच्या मित्रांच्या उद्गाराचा '**प्राधान्येन व्यपदेशः**' या न्यायानें अर्थ घ्यायचा आहे. म्हणजे सर्व च वर्तमानपत्रांनीं अक्षरशः पॅसिफिक महासागराचा तळ गांठला आहे असा अर्थ करायचा नाहीं. परिस्थिति ठोकळ मानानें काय आहे एवढा च बोध घ्यायचा. अशा दृष्टीनें ही टीका अगदीं यथार्थ आहे असें दुःखानें म्हणावें लागतें.

पण हा दोष कोणाचा? कोणी म्हणतात संपादकांचा, कोणी म्हणतात वाचक-वर्गाचा, कोणी म्हणतात भांडवलदारांचा. तिघे हि गुन्ह्यांत सामील आहेत आणि 'प्राप्तीचा वांटा' तिघांना हि मिळायचा आहे, याबद्दल कोणाला च शंका नाहीं. पण माझ्या मतें गुन्हा करणारे हे तिघे असले, तरी करवणारा वेगळा च आहे आणि तो ह्या पापाचा मुख्य 'धणी' आहे. तो कोण? साहित्याची व्याख्या करणारा चवचाल अथवा चवभ्रष्ट साहित्यकार.

'**विरोधु वादु बळु। प्रणितापढाळू। उपहासु छळु। वर्मस्पर्शु॥ आटु वेगु विदाणु। आशा शंका प्रतारणु।**' हे ज्ञानदेवानें वाणीचे अवगुण म्हणून सांगितले आहेत. पण आमचे साहित्यकार नेमकें ह्या च गुणांना 'वाग्भूषा' म्हणजे साहित्याची सजावट समजतात. मागें एकदां '**टवाळा आवडे विनोद**' या रामदासांच्या उक्तीवर कित्येक साहित्तिक गरम झाले होते. रामदासांचा भावार्थ लक्षांत घेऊन त्यापासून योग्य तो बोध घेण्याऐवजीं विनोदाचें जीवनांतील आणि साहित्यांतील स्थान रामदासांना कळलें नव्हतें असा शोध या मंडळींनीं लावला. उपहास, छळ, वर्मस्पर्श हे ज्ञानदेवांनीं अमान्य केले यांत हि ज्ञानदेवांचें अज्ञान च आमचे साहित्यकार, त्यांच्या साहित्याच्या व्याख्येप्रमाणें, पाहतील यांत शंका नाहीं.

ज्ञानदेवाला किंवा रामदासांना राष्ट्रकल्याणाची तळमळ होती; आणि आमच्या विद्वान् मंडळींना चुरचुरीत भाषेची चिंता असते, मग तिकडे राष्ट्रघात कां होईना, हा यांतील मुख्य फरक आहे. सत्य ज्ञाटल्यास मरो

पण साहित्य जगो, अशी आमची साहित्य-निष्ठा आहे.

'देवा, मला अजून पुरता अनुभव येत नाहीं, मग मी काय नुसता कवि च होऊं का रे ?' असें तुकाराम देवापुढें आपलें दुःख सांगतो आणि हा तुकारामाच्या त्या वचनांत काव्य किती साधलें आहे हें तपासतो ! आमच्या शाळांतील शिक्षणाची सर्व तऱ्हा च अशी आहे. माझ्या वाचनांत एक निबंध आला होता. त्यांत त्या लेखकानें तुलसीदासांची शेक्सपियरशीं तुलना करून कोणाचें स्वभाव-चित्रण काय दर्जाचें आहे, ह्याची चर्चा केली होती. म्हणजे तुलसीदासांचें रामायण, जें हिंदुस्थानांतील करोडो लोकांना—खेडवळांना हि—जीवनाचें मार्ग-दर्शक पुस्तक झालें आहे, त्याचा हि अभ्यास हा भला माणूस स्वभाव-चित्रणाच्या शैलीच्या दृष्टीनें करणार. कुणाला थोडी अतिशयता भासेल, पण मला मात्र पुष्कळ वेळा वाटतें कीं ह्या शैलीभक्तांनीं राष्ट्राचें शील मारून टाकण्याचा उद्योग चालविला आहे.

शुकदेवाचा एक श्लोक आहे, त्याचा भावार्थ असा आहे कीं 'ज्यानें जनतेच्या चित्तांची शुद्धि होते तें उत्तम साहित्य.' जे साहित्य-शास्त्रकार म्हणवले जातात, आणि ज्यांच्या छापेंत आज आम्ही आहोंत, त्यांनीं ही व्याख्या मान्य केलेली नाहीं. त्यांनीं शृंगारापासून बीभत्सापर्यंत भिन्न भिन्न रस मानले आहेत, आणि हे रस ज्यांत असतील तें सरस साहित्य असें ठरविलें आहे. साहित्याची ही सर्व व्याख्या गृहीत धरावी, तिच्या भरीला कर्तृत्व-शून्यता यावी, आणि मग मराठी वर्तमानपत्रांच्या दर्दींच्या खिलाफाहून दुसरें कोणतें लिखाण निर्माण होऊं शकेल हें कोणी हि सांगावें.

मा. से. ग्र. ४. ३

---

# ७ तुलसीदासांची बालसेवा

जेलमध्ल्या आमच्या सर्व-प्रार्थनेंत तुलसीरामायण गाण्याचें काम माझ्याकडे आलें होतें. त्या निमित्तानें रामायणाशीं [illegible] थोडा परिचय होऊन त्यांच्या कांहीं गुणां [illegible] न कळत येत.

तुलसीदासांनीं आम जनतेसाठीं हा ग्रंथ योजला आहे हें त्याच्या रचनेवरून आणि परिणामावरून उघड च आहे. पण त्यांनीं लहान मुलांच्यासाठीं हि रामायणांत कित्येक करामती करून ठेवल्या आहेत, असें माझी शिक्षकाची नजर पाहत आहे. ह्या अनेक करामतींपैकीं एक करामत मी ह्या लेखांत उलगडणार आहें.

नागरीलिपी ही इतर लिप्यांच्या मानानें जरी 'बाळबोध' म्हटली जाते, तरी तींतील जोडाक्षरें तितकींशीं बाळबोध नाहींत. बालकांना तीं चांगला च त्रास देतात, ही सर्वांच्या अनुभवाची गोष्ट आहे. म्हणून आजकाल जोडाक्षरविरहित धडे मुलांच्यासाठीं रचीत असतात. हे धडे अर्थात् कृत्रिम आणि नीरस होऊं पाहतात. पण तुलसीदासांनीं अगदीं सहजपणें आणि सरस रीतीनें लहान मुलांच्यासाठीं रामायणांत पुष्कळ च लिखाण जोडाक्षर-विरहित लिहून ठेवलें आहे, असें दिसतें.

हा मुद्दा तपासण्यासाठीं आपण आतां गणितांत उतरूं. प्रथम अयोध्याकांडांतला कौसल्या रामाला निरोप देत आहे हा एक उतारा संबंध तपासूं. कल्याणच्या मानसांकांत छापलेलें रामायण मजजवळ आहे. त्यांत पृष्ठें ३६०-३६२ मध्यें तो आहे. त्याची सुरवात "**धरि धीरजु सुत-बदनु निहारी**" अशी आहे आणि शेवट "**बरनि न जाहिं बिलाप-कलापा**" असा आहे. ह्या उताऱ्यांत २७ चौपाया आणि ३ दोहे मिळून ३० पद्य-संख्या आहे. त्यांतील जोडाक्षरांची तालिका पुढीलप्रमाणें—

| पद्यांक | जोडाक्षरें | पद्यांक | जोडाक्षरें | पद्यांक | जोडाक्षरें |
|---|---|---|---|---|---|
| २ | म्ह, म्ह, प्र | १९ | म्ह, त्य | २४ | म्ह |
| ५ | प्र | २० | म्ह | २५ | प्र, म्ह |
| १३ | न्ह | २१ | प्र, प्र, प्र | ३० | त्य |
| १४ | न्ह, प्र | २२ | म्ह | | |

ह्या उताऱ्यांत एकूण ७८४ अक्षरें असून त्यांत फक्त १९ वेळा जोडाक्षरें वापरलीं गेलीं आहेत. त्या जोडाक्षरांचें पृथक्करण असें—

| | | |
|---|---|---|
| म्ह | ७ वेळा | एकूण, ५ जोडाक्षरें मिळून १९ वेळा |
| न्ह | २ ,, | |
| प्र | ८ ,, | |
| त्य | १ ,, | |
| व्य | १ ,, | |

आतां ह्या तालिकेचें थोडें मनन. 'म्ह' आणि 'न्ह' हीं प्रत्ययान्तर्गत असल्यामुळें हिंदी भाषेंत असंख्य वेळा येणारीं अक्षरें आहेत. तीं माझ्या विचाराप्रमाणें जोडाक्षरें नसून मुळाक्षरासारखीं च आहेत. कारण, म्ह आणि न्ह हिंदी भाषेंतील रूढीप्रमाणें हकारयुक्त उच्चारलेले 'म' आणि 'न' ह्यांचे प्रकारभेद आहेत किंवा व्याकरणाच्या भाषेंत ते म आणि न ह्यांचे महाप्राण आहेत. 'जिनको' उच्चारण्याची दुसरी तऱ्हा 'जिन्हको' आणि 'तुमको' चें महाप्राणयुक्त उच्चारण 'तुम्हको'. हिंदी भाषेंत च नव्हे, तर इतर हि भाषांत अशीं महाप्राण उच्चारणाचीं उदाहरणें आहेत.

'प्र' हें जोडाक्षर खरें, पण संस्कृतांत असंख्य वेळा येणारें असल्यामुळें संस्कृत साहित्यकारांनीं त्याला विकल्पानें मुळाक्षर मानून घेतल्यासारखें केलें आहे. कारण, जोडाक्षरांच्या पूर्वीच्या अक्षरावर आघात येतो आणि तें गुरु मानलें जातें, हा नियम त्यांनीं 'प्र' च्या बाबतींत ढिला केला आहे. म्हणजे 'प्र' च्या पूर्वीच्या अक्षरावर आघात द्या वा नका देऊं, अशी त्यांची मोकळीक आहे.

म्हणून हिंदी भाषेच्या सोईसाठीं म्ह, न्ह, आणि संस्कृत भाषेच्या सोईसाठीं 'प्र', हीं तीन अपवादात्मक जोडाक्षरें सोडून दिलीं, तर वरील उताऱ्यांत निखळ जोडाक्षरें दोन च आलीं असून तीं हि प्रत्येकीं एकेक वेळा च वापरलीं गेलीं आहेत, असें दिसतें. ७८४ अक्षरांत २ वेळा जोडाक्षरें म्हणजे शून्यप्राय च.

पद-संख्येच्या मानानें २८ पदांपैकीं ज्यांत, एकदां तरी कोई ना कोई जोडाक्षर आलें आहे अशीं पदें २, म्हणजे शेंकडा ७ प्रमाण पडतें.

आतां ज्यांत विद्वान् नसता आहे आणि नित्य वाचिक आहे, असा उतारा घेऊं. आणि म्ह, न्ह, प्र, हीं मुळाक्षरें मानून, अन्य जोडाक्षरें

मानलीं तरी मुळाक्षरांबरोबर च तीं मुलांना शिकवायचीं असें गृहीत धरून जोडाक्षरांचें प्रमाण काय येतें, तें पाहूं. वाल्मीकि रामाला भगवंताचीं निवास-स्थानें सांगत आहेत, हा अयोध्याकांडांतील उतारा आतां वाचायचा आहे. मानसांकांत तो पृष्ठें ४०८–४१२ ह्यांमध्यें आहे. आरंभ : "**सहज सरल सुनि रघुबरबानी**'. शेवट : **सो राउर निज गेह**". ह्या उताऱ्यांत ४२ चौपाया, ६ दोहे आणि १ छंद मिळून ४९ पद्य-संख्या आहे. ह्यांतील जोडाक्षरयुक्त पद्यें खालीलप्रमाणें—

| पद्यांक | जोडाक्षर | पद्यांक | जोडाक्षर | पद्यांक | जोडाक्षर |
|---|---|---|---|---|---|
| १ | ग्य | २ | श्र | ३ | श्र |
| ४ | ध्य | १७ | श्र | २४ | द्व |
| २४ | त्र | ३१ | द्र | ३४ | त्य |
| ३९ | स्य भ्र. | | | | |

अशीं ४९ पद्यांपैकीं एकूण १० पद्यांत जोडाक्षरें आलीं आहेत. म्हणजे विद्वानाच्या तात्त्विक भाषणांत हि तुलसीदास लहान मुलांचें स्मरण राखून शेंकडा ८० पद्यें जोडाक्षर-विरहित लिहीत आहेत. केवढी दया! आणि शिक्षकांना केवढें उदाहरण!

तुलसीदासांनीं लहान मुलांसाठीं खालील वर्णमाला कल्पिली आहे.

अ आ इ ई उ ऊ ऋ ए ऐ ओ औ अं; क ख ग घ; च छ ज झ; ट ठ ड ढ; त थ द ध न; प फ ब भ म; य र ल व; स ह; न्ह म्ह प्र. एकूण ४३ वर्ण. एवढे वर्ण शिकून घ्यावे आणि जोडाक्षरें न आलीं तरी ८० टक्के रामायण खुशाल वाचावें.

इतक्या विशद पण नीरस आंकडेमोडीनंतर तुलसीदासजींचा जोडाक्षरविरहित सरस प्रसाद थोडा सेवन केल्याशिवाय संपवणें ठीक नाहीं.

**'धरम न अरथ न काम रुचि, गति न चहउं निरबान।**
**जनम जनम रति राम-पद; यह बरदानु न आन ॥'**

ग्रा. से. वृ. ६-२ नागपूर जेल, ३–४–४१

# ८ गृत्समद

हा एक मंत्रद्रष्टा वैदिक ऋषि. आजच्या यवतमाळ जिल्ह्यांतील कळंबचा राहणारा. गणपतीचा महान् भक्त. **'गणानां त्वा गणपतिं हवामहे'** हा सुप्रसिद्ध मंत्र ह्यानें च पाहिलेला. ऋग्वेदांतील दहा मंडलांपैकीं द्वितीय मंडल सबंध ह्याच्या नांवावर आहे. सदर मंडलांत ४३ सूक्तें असून मंत्रसंख्या चारशांवर आहे. ऋग्वेद हा जगांतील अति प्राचीन आणि पहिला ग्रंथ मानला जातो. ऋग्वेदांत हि त्यांतल्या त्यांत कांहीं भाग प्राचीनतर आहे. ह्या प्राचीनतर भागांत द्वितीय मंडलाची गणना होते. त्यावरून गृत्समद सुमारें वीस हजार वर्षांपूर्वी होऊन गेला असें इतिहासज्ञ ठरवितात. गृत्समदाचें हें मंडल सूक्त-संख्येच्या आणि मंत्र-संख्येच्या मानानें ऋग्वेदाचा सुमारें पंचविसावा हिस्सा भरेल.

गृत्समद हा एक हरकसबी माणूस होता. ज्ञानी, भक्त आणि कवि तर तो होता च. पण त्याशिवाय गणिती, विज्ञान-वेत्ता, कृषि-संशोधक आणि सरावलेला विणकर होता. जीवनाच्या लहान मोठ्या कोणत्या हि अंगाची उपेक्षा त्याला सहन होत नसे. **"प्राये प्राये जिगीवांसः स्याम"** -आम्हीं प्रत्येक व्यवहारांत विजयी झालें पाहिजे-असें हा नेहमीं म्हणे. आणि त्याच्या ज्वलंत उदाहरणानें आसपासच्या लोकांत उत्साहाचें जागृत वातावरण राही.

गृत्समदाच्या वेळीं नर्मदेपासून गोदावरीपर्यंतचा सर्व भूप्रदेश जंगलांनीं भरलेला असे. पांच-पंचवीस मैलांवर लहानशी वस्ती असावयाची. बाकी सारें निर्जन. आसपासच्या निर्जन अरण्यांत वसलेली गृत्समदाची अशी ती एक मोठ्यांतली वसाहत होती. ह्या वसाहतीनें कापसाच्या लागवडीचा जगांतील पहिला यशस्वी प्रयोग पाहिला. आज हा वऱ्हाड कापसाचें आगर

बनलेला आहे. गृत्समदाच्या काळीं वऱ्हाडांत आजच्यां पेक्षां पावसाचें मान ज्यास्त असे. तेवढा पाऊस जिरवूं शकणारें कापसाचें रोप गृत्समदानें तयार केलें. आणि तें एका लहानशा प्रयोग-क्षेत्रांत लागवडून त्यांतून घडाभर कापूस संपादिला. गृत्समदाच्या ह्या नव्या पैदाशीला लोकांनीं 'गार्त्समदम्' असें नांव दिलें. ह्याचें च लाटीन रूप 'गॉसिपियम्' असेल काय ?

लोंकरीचें कांतणें-विणणें त्याच्या वसाहतींतील मंडळींना चांगलें अवगत होतें. हें काम मुख्यतः स्त्रियांकडे असे. आज पुरुष मंडळी विणतात. आणि बाया त्यांना कांडया भरणें, पांजण करणें इत्यादि कामांत मदत करतात. पण वैदिक काळीं विणकर हा स्वतंत्र वर्ग बनलेला नव्हता. शेतीप्रमाणें विणकाम हि सर्वांचें काम असे. सर्व पुरुषांनीं शेती करावयाची आणि सर्व बायांनीं गृहकार्य संभाळून विणकाम करावयाचें अशी त्या वेळची व्यवस्था असे. संध्याकाळीं सूर्यानें आपले किरण गुंडाळून घेतले म्हणजे त्याबरोबर विणणारी हि आपला अर्धवट विणलेला ताणा गुंडाळून घेते-**पुनः समव्यत् विततं वयन्ती**-असें गृत्समदानें विणणारीचें जीवन-काव्य वर्णिलें आहे. गृत्समदाच्या प्रयोगांतून कापूस तर मिळाला पण कापड कसें काढावयाचें हा मोठा प्रश्न होऊन बसला. लोंकर कांतण्याची लांकडाची तकली असे, तिच्यावर सर्वांनीं मिळून ह्या कापसाचें सूत कांतून घेतलें. विणकाम जरी स्त्रियांकडे सोंपविलेलें असे तरी कांतणें स्त्री, पुरुष, बाल, वृद्ध सगळे करीत. सूत तयार झालें पण तें अगदीं च रद्दी. आतां हें कोणीं कसें विणावयाचें ?

गृत्समद हार खाणारा माणूस नव्हता. तो स्वतः च विणकामांत पडला. विणकामांतील सर्व क्रिया त्यानें सांगोपांग अभ्यासिल्या, सर्व दोष-संपन्न सूत पण त्यांतल्या त्यांत जें थोडें मजबूत होतें त्याचा त्यानें 'तंतु' केला. 'तंतु' म्हणजे वैदिक भाषेंत 'ताणा'. बाकीचें कच्चें सूत 'ओतु' म्हणून राखून ठेवलें. पण पांजण सुरू झाली न झाली तों कचाकच तार तुटूं च लागले. गृत्समद गणिती असल्यामुळें तुटलेले किती तार जोडावे लागले तें मोजीत असे. पहिल्या पांजणींत तुटलेल्या तारांची संख्या चार आंकडी

होती. पुढें ताणा एकदांचा मागावर चढला. हत्त्याची पहिली ठोक मारली. चार पांच तार तुटले. ते जोडून पुन्हां ठोक, पुन्हां तूट, अशा रीतीनें कितीक आठवड्यांत पहिलें ठाण विणून झालें. त्यानंतर सूत हळूहळू सुधरत गेलें. तरी पहिलीं बारा वर्षें एकंदरींत विणकाम फार च त्रासाचें होऊन बसलें होतें. गृत्समदाचीं हीं बारा वर्षें त्याच्या आयुष्यांतील खरीं तपश्चर्येचीं होतीं. तो एवढा उत्साही आणि तंतु-व्रत, ओतु-व्रत, ठोक-व्रत आणि तूट-व्रत अशा व्रतमय वृत्तीनें विणकाम करणारा, तरी सूत सारखें तुटत च राहिलें म्हणजे त्याचा हि जीव कधीं कधीं रडकुंडीला येई. अशा एका प्रसंगीं "**मा तन्तुश् छेदि वयतः**"–देवा, विणत असतांना धागा तुटूं देऊं नको रे! म्हणून त्यानें देवाला आळविलें. पण भलती च प्रार्थना केल्याबद्दल तो तात्काळ अनुतापला. मग त्यानें "धियं मे" म्हणजे 'माझें ध्यान' हे दोन शब्द जोडून सदर प्रार्थना सावरून घेतली. "मी माझें ध्यान विणत असतांना त्याचा धागा तुटूं देऊं नको" असा त्या सुधारून वाढविलेल्या नव्या प्रार्थनेंतून सुशोभ्य अर्थ निघाला. त्याचा आशय असा : "मी खादी विणत असतों ही माझ्या दृष्टीनें केवळ एक बाह्य क्रिया नाहीं. माझी ती उपासना आहे. तो ध्यान-योग आहे. मधून मधून धागे तुटत गेले म्हणजे माझा ध्यान-योग भंगूं पाहतो हें माझें दुःख. त्यासाठीं धागे तुटूं नयेत अशी इच्छा होते. ही इच्छा योग्य असली तरी ती प्रार्थनेचा विषय होऊं शकत नाहीं. त्यासाठीं सूत सुधारलें पाहिजे आणि तें सुधारून घेऊं. पण म्हणून आतां प्रार्थना ही कीं, सूत कच्चें असल्यामुळें तें तुटत राहणार हें दिसतें च आहे; तर तें तुटत असतांना माझ्या अंतर्वृत्तीचा, माझ्या भावनांचा, धागा तुटूं नये.'

आणि त्यांत पुन्हां नवीन उत्पादनाचा कांहीं अंश असतो ना? असें तो आपल्या मनांत चिंती.

ह्या चिंतनामुळें च कीं काय, पण एक दिवस गुणाकाराची कल्पना गृत्समदाला अचानक सुचली. लोक-व्यवहार सुलभ कसा होईल ह्या दृष्टीनें गणित-शास्त्राचें संशोधन त्याचें फुरसतीच्या वेळीं चालावयाचें. त्याच्या काळीं षड्विधांपैकीं बेरीज आणि वजाबाकी हे दोन च विधि लोकांना अवगत होते. गृत्समदाला गुणनविधीचा शोध ज्या दिवशीं लागला त्या दिवशींच्या त्याच्या आनंदाला सीमा नव्हती. त्यानें दोनपासून दहापर्यंतचे नऊ पाढे रचले आणि तो नाचूं च लागला. परवचा घोकणाऱ्या पोरांना जर ही बातमी लागली तर तीं गृत्समदाला धोंडे मारल्याशिवाय राहणार नाहींत! पण गृत्समदानें आनंदाच्या भरांत इंद्रदेवाला पाढयांनीं च आवाहिलें. "हे इंद्रा! तूं दोन घोडयांच्या, नि चार घोडयांच्या, नि सहा घोडयांच्या, नि आठ घोडयांच्या, नि दहा घोडयांच्या रथांतून ये. लवकरांत लवकर ये. त्यासाठीं दोनाचा नव्हे पण वाटेल तर दहाचा पाढा वापर. दहा घोडयांच्या नि वीस घोडयांच्या, नि तीस घोडयांच्या, नि चाळीस घोडयांच्या...... नि शंभर घोडयांच्या रथांतून ये."

गृत्समद चौफेर संशोधक होता. चंद्रकिरणांचा गर्भाच्या वाढीवर विशिष्ट परिणाम होतो असा त्याचा एक महान् शोध पौराणिकांनीं नमूद ला आहे. वैदिक-मंत्रांत हि त्याचें सूचन आढळतें. चंद्राच्या ठिकाणीं मातृ-वृत्ति मुरलेली आहे. आणि कलावान् तर तो आहे च आहे. त्यामुळें सूर्याचे ज्ञानमय प्रखर किरण पचवून आणि त्यांना भावनामय सौम्यरूप देऊन मातेच्या उदरांतील कोमल गर्भाला तें जीवन-अमृत पोंचविण्याचें प्रेमळ आणि कुशल कार्य चंद्राला करतां येतें आणि तें तो निरंतर करीत असतो, असें गृत्समदाचें संशोधन आहे. आधुनिक विज्ञानानें अजून ह्या विषयावर विशेष प्रकाश पाडलेला नाहीं. परावृत्त-किरण-विज्ञान, प्राणविज्ञान आणि मनोविज्ञान ह्या तिघांची येथें गांठ असल्यामुळें प्रश्न गुंतागुंतीचा आणि सूक्ष्म आहे ह्यांत शंका नाहीं. पण गृत्समदाचा सिद्धान्त एरवीं अविज्ञ मनाला हि रुचण्यासारखा तर आहे. बालकाचें 'सौम्य' रूप सोम-कृत असलें तर

त्यांत नवल काय? आपण सूर्यवंशी रामाला हि रामचंद्र म्हणतों म्हणजे चंद्राची च सत्ता सुचवितों ना? कवींनीं चंद्रामृत पिणारा एक चकोर पक्षी कल्पून घेतला आहे. तो मातेच्या उदरांतील गर्भ ठरल्यास कवि तरी खचित च नाराजणार नाहींत. अल्पशा तेजानें लुकलुकणाऱ्या तारका, पण आपली जागा सोडून चंद्राच्या भेटीला कधीं जावयाच्या नाहींत. चंद्र मात्र नम्रतेनें प्रत्येक नक्षत्राच्या भेटीसाठीं त्यांच्या घरीं जावयाचा. एवढा प्रेममूर्ति गर्भस्थ बालकाची चिंता न करील तर दुसरा कोण करील? चंद्राच्या कलेची पूर्णता अर्थात् पूर्णिमेला व्हावयाची. गृत्समद पूर्णिमेला उद्देशून म्हणतो, "पूर्णिमे! गर्भाची शिवण तूं मजबूत सुईनें शिव आणि शतगुणित देणारा, पराक्रमशील, प्रशंसनीय सेवक निर्माण कर—**ददातु वीरं शतदायं उक्थ्यम्!**"

ऋ. से. वृ. ५-५

---

# ९ परशुराम

हा एक विलक्षण प्रयोगी सुमारें पंचवीस हजार वर्षांपूर्वी होऊन गेला. कोंकणस्थांचा हा मूळ पुरुष. आईकडून क्षत्रिय, बापाकडून ब्राह्मण. बापाच्या आज्ञेनें त्यानें आईचें डोकें न डळमळतां उडविलें. हें कितपत योग्य म्हणून कोणी हि खुशाल विचारील. पण त्याच्या [illegible] [illegible] [illegible] न नव्हती. निष्ठेनें प्रयोग करावयाचा आणि अनुभवानें [illegible] [illegible] असें त्याचें सूत्र असे.

परशुराम त्या काळचा सर्वोत्तम पुरुषार्थी माणूस होता. त्याला दुर्बलांविषयीं कळकळ असे आणि अन्यायाविषयीं तीव्रतम चीड. त्या काळीं क्षत्रिय अगदीं न [illegible] होते. ते आपणांला जनतेचे रक्षक म्हणवीत, पण व्यवहारांत त्यांनीं [illegible] च '[illegible]' चा '[illegible]' करून टाकला होता. परशुरामानें त्या अन्यायी क्षत्रियांचा घोर प्रतिकार आरंभिला. [illegible] [illegible] [illegible]

क्षत्रिय त्यानें सरसहा मारून च टाकले. "पृथ्वी निःक्षत्रिय करावयाची" हें त्यानें आपलें ब्रिरुद बनविलें. ह्यासाठीं तो स्वतः आपल्याजवळ नेहमीं कुऱ्हाड बाळगूं लागला आणि कुऱ्हाडीनें एक तरी क्षत्रिय मुंडकें रोज उडविलें पाहिजे, अशी उपासना त्यानें आपल्या ब्राह्मण अनुयायांत रूढ केली. हा पृथ्वी निःक्षत्रिय करण्याचा प्रयोग त्यानें एकवीस वेळा केला. पण जुनें क्षत्रिय बुद्धया मारावयाचे आणि अबुद्धीनें नवीन निर्मावयाचे अशा प्रक्रियेनें फलित काय निघणार ! शेवटीं रामचंद्रानें ह्याच्या डोळयांत अंजन घातलें. तेव्हांपासून त्याची दृष्टि निवळली.

मग त्यानें कोंकणचीं त्या वेळचीं दाट जंगलें तोडून वसाहत करण्याच्या विधायक कार्यक्रमाकडे आपला मोर्चा वळविला. पण कुऱ्हाडीच्या हिंसक प्रयोगाला सवकलेल्या त्याच्या अनुयायांना कुऱ्हाडीचा हा त्या मानानें अहिंसक प्रयोग नीरस वाटला. आणि निर्धनाला जसे सगे सोयरे तसे ते सारे त्याला सोडून गेले. पण हा निष्ठावान् महापुरुष एकटा च तें काम करीत राहिला. ऐच्छिक दारिद्र्याला वरलेला रानी प्रजेचा आदि सेवक जो भगवान् शंकर त्याच्या ध्यानांतून तो प्रतिदिन स्फूर्ति मेळवी. आणि जंगल तोडणें, झोंपड्या बांधणें, वन्यपशूंप्रमाणें तुटक जीवन जगणाऱ्या मानवबंधूंना सामुदायिक साधना शिकविणें ह्या कामीं ती स्फूर्ति राबवी. निष्ठावंत आणि निष्काम सेवा फार दिवस एकाकी राहूं शकत नाहीं. परशुरामाच्या चिकाटीच्या सेवावृत्तीनें कोंकणच्या जंगलांतील तीं रानवट माणसें विरघळलीं आणि त्यांनीं त्याला शेवटीं उत्तम साथ दिली. त्याचे जुने ब्राह्मण म्हणविणारे जे अनुयायी त्याला सोडून शहरांत पळून गले होते त्यांच्या ऐवजीं हे नवे अवर्ण अनुयायी त्याला लाभले. त्यानें त्यांना स्वच्छ आचार, स्वच्छ विचार आणि स्वच्छ उच्चार शिकविला. एक दिवस परशुराम त्यांना म्हणाला " भाई हो, तुम्ही आजपासून ब्राह्मण झालां."

परशुरामाची आणि रामचंद्राची प्रथम भेट धनुर्भंगाच्या प्रसंगानंतर एकदां झालेली. आणि त्याच वेळीं त्याला रामचंद्राकडून जीवन-दृष्टि मिळाली होती. त्यानंतर इतक्या वर्षांत त्या दोघांची भेट कधीं च झाली नव्हती. पण रामचंद्र वनवासांत असतांना पंचवटीला येऊन राहिला होता.

तेथल्या त्याच्या निवासाच्या शेवटच्या वर्षी परशुराम बागलाणच्या बाजूनें त्याला भेटायला आला होता. तो जेव्हां पंचवटीच्या आश्रमांत येऊन पोंचला त्या वेळीं रामचंद्र झाडांना पाणी घालीत होता. परशुरामाच्या भेटीनें रामचंद्राला आनंद झाला. त्यानें त्या तपस्वी आणि वृद्ध पुरुषाचें आदरानें साष्टांग-प्रणामपूर्वक स्वागत केलें. आणि कुशलप्रश्नादि झाल्यानंतर त्याच्या कार्यक्रमाविषयीं विचारलें. परशुरामाची कुऱ्हाड त्याच्याजवळ होती च. त्यानें कुऱ्हाडीच्या आपल्या नव्या प्रयोगाची सर्व माहिती रामचंद्राला दिली. रामचंद्रानें ती ऐकून त्याचा फार गौरव केला. आणि परशुराम दुसरे दिवशीं तेथून परतला.

स्वग्रामीं आल्यानंतर आपल्या त्या नव्या ब्राह्मणांना रामाची सर्व हकीकत सांगून तो म्हणाला, “ रामचंद्र माझा गुरु आहे. त्याच्या पहिल्या भेटींत त्यानें मला जो उपदेश दिला त्यानें माझी वृत्ति पालटून मी तुमच्या सेवेला लागलों. त्या भेटीच्या वेळीं त्यानें शब्दानें मला कांहीं च उपदेश दिला नाहीं. पण त्याच्या कृतींतून मला उपदेश मिळाला आहे. तोच मी तुम्हांला सांगतो. आपलें हें जंगल तोडून वसाहत करण्याचें काम एक उपयुक्त सेवाकार्य आहे यांत शंका नाहीं. पण त्याची हि मर्यादा आहे. ती मर्यादा न ओळखतां जर आपण झाडें तोडत च राहिलों तर ती एक मोठी हिंसा होईल. आणि कोणती हि हिंसा ती करणारावर उलटल्याशिवाय राहत नाहीं असा माझा अनुभव आहे. म्हणून झाडें तोडण्याचें काम आतां आपण बंद करूं या. आतांपर्यंत केलें तें ठीक. कारण त्यामुळें मूळच्या अरण्याच्या जागीं ह्या आजच्या वसाहति बनल्या. पण यापुढें आपण जीवनोपयोगी वृक्षांच्या लागवडीचें हि काम हातीं घेतलें पाहिजे.” असें म्हणून त्यानें त्यांना आंबे, केळी, नारळी, काजू, फणस, अननस इत्यादि कित्येक मोठीं फळझाडें कशीं लावावीत तें शिकविलें. अर्थात् त्यासाठीं त्याला स्वतः वनस्पति-संवर्धनशास्त्राचा अभ्यास करावा लागला, आणि त्यानें आपल्या शेतीच्या प्रयोगांनीं तें अभ्यासिलें. त्यानें त्या शास्त्रांत कित्येक महत्त्वाचे शोध केले. त्यांना नवीन आकार देण्यासाठीं नीं त्यांच्या [illegible] [illegible] त्यानें त्यासाठीं एक नवीनच औजार शोधून काढलें. पण

औजाराला ‘ नव परशु ’ असें नांव देऊन त्यानें आपली परशूची उपासना अखंड राखली.

एकदां समुद्रकांठीं नारळी लावण्याचा एक सामुदायिक समारंभ त्यानें घडवून आणला. आणि त्या निमित्तानें जमलेल्या मंडळींपुढें त्यानें आपल्या जीवनांतील सर्व प्रयोगांचें आणि अनुभवांचें सार मांडलें. समोर भरतीचा समुद्र गर्जत राहिला होता. तिकडे हात करून समुद्रवत् गंभीर ध्वनीनें तो त्यांना म्हणाला, “ भाई हो, हा समुद्र आपणांला काय शिकवीत आहे तें लक्षांत घ्या. एवढा प्रचंड शक्तिशाली पण आपल्या परम उत्कर्षाच्या वेळीं हि तो आपली मर्यादा लंघीत नाहीं. म्हणून त्याचें बळ सतत टिकून आहे. माझ्या सर्व उद्योगांतून आणि प्रयोगांतून मीं हें च निष्कर्षिलें आहे. मीं लहानपणीं पित्याच्या आज्ञेवरून आईचा वध केला. लोक म्हणाले, ‘ केवढा मातृहत्यारा ! ’ तो आक्षेप मला कबूल होत नव्हता. मी म्हणें, “ आत्मा अमर आहे आणि शरीर मिथ्या आहे. कोण कोणाला मारतो ? मी मातृहत्यारा नव्हें, पण पितृभक्त आहें. ” पण माझी चूक आज माझ्या लक्षांत येते. मातृवधाचा आरोप त्या वेळीं कबूल नव्हता, तसा आज हि नाहीं. पण पितृभक्तीला हि मर्यादा असते ही गोष्ट माझ्या लक्षांत आली नाहीं. हा माझा खरा दोष होता. लोकांनीं नेमका तेवढा च दाखविला असता तर त्यानें माझी विचारशुद्धि झाली असती. पण त्यांनीं हि मर्यादा सोडून भलता आक्षेप घेतला. आणि त्यामुळें माझ्या विचारशुद्धीला कांहीं च मदत झाली नाहीं. पुढें मोठेपणीं अन्यायप्रतिकाराचें व्रत पत्करून मी जुलमी सत्तेशीं एकवीस वेळा झुंजलों. प्रत्येक वेळीं मी यशस्वी झालोंसें दिसावें आणि प्रत्येक वेळीं नेमकें अपयश माझ्या पदरीं पडावें. रामचंद्रानें माझी चूक मला पटविली. अन्याय-प्रतिकार हा मानवाचा धर्म खरा पण त्याची हि शास्त्रीय मर्यादा आहे हें ज्ञान मला गुरुकृपेनें लाभलें. पुढें मी जंगल तोडून वसाहत वसविण्याच्या मानव-सेवेच्या कार्यांत पडलों. पण जंगल तोडण्याची हि मर्यादा आहे ही गोष्ट मला वेळेवर कशी सुचली तें तुम्हांला विदित आहे च. आतांपर्यंत मी निरंतर प्रवृत्ति आचरित राहिलों. पण शेवटीं प्रवृत्तीची हि मर्यादा आहे च ना ? म्हणून ह्यापुढें मी निवृत्त होईन म्हणतों

म्हणजे कर्म च सोडून देईन असें नव्हे. पण स्वतंत्र नवीन प्रवृत्ति मी उभारणार नाहीं. प्रवाह–पतित करीत राहीन. प्रसंगीं विचाराल तेव्हां सल्ला हि देईन. पण म्हणून आज मी हा मुद्दाम प्रसंग योजिला आणि हें समुद्रोपनिषद् म्हणा कीं माझें 'जीवनोपनिषद्' म्हणा, तुम्हांस निवेदिलें. पुन्हा थोडक्यांत सांगतों. पितृभक्तीची मर्यादा, प्रतिकाराची मर्यादा, मानवसेवेची मर्यादा आणि एकूण सर्व च प्रवृत्तींची मर्यादा हें माझें जीवनसार. म्हणा एकदां सगळे "ॐ नमो भगवत्यै मर्यादायै".

इतकें बोलून परशुराम शांत झाला. त्याच्या त्या उपदेशाचे खोल पडसाद सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत अजून ऐकूं येत असतात.

ग्रा. से. वृ. ५-४

---

# १० कै. जमनालालजींना श्रद्धांजलि

माझ्या प्रियतम बंधूंनो आणि भगिनींनो !

काल संध्याकाळीं ४ वाजतां महिलाश्रमामध्यें माझें व्याख्यान ठेवलें होतें. त्या व्याख्यानासाठीं मी तिथें जाऊन पोंचलों, मुली येऊन बसल्या आणि मी माझें बोलणें सुरू करणार इतक्यांत मोटर आली. आलेल्या माणसानें सांगितलें कीं "जमनालालजी आजारी आहेत आणि तुम्हांला बोलावलें आहे." जमनालालजी तसे म्हणण्यासारखे आजारी नव्हते. दुपारपर्यंत नेहमींप्रमाणें ते आपलें काम करीत होते, हें मला माहीत होतें. त्यामुळें ते आजारी असल्याची बातमी ऐकली तरी त्याचा ज्यास्त खोल अर्थ मी समजलों नाहीं. तरीपण व्याख्यान सोडून मी गांधीचौकांत आलों. गाडींतून खालीं उतरतों तों दिलीप गाडीवरून उतरत होता. त्याच्या चेहऱ्यावर दुःख दिसत असून हि मला पुरी कल्पना आली नाहीं आणि

[ श्री. जमनालालजी बजाज यांच्या निधनानिमित्त वर्धा येथें ता. १२-२-४२ ला गांधीचौकांत झालेलें व्याख्यान. ]

मीं त्याला "जमनलालजींची प्रकृति कशी आहे" असें विचारलें. त्यावर तो बोलला "ते तर गेले." इतकी अचानक, अनपेक्षित आणि चित्ताला क्लेश पोंचविणारी बातमी ऐकून मला काय वाटायला पाहिजे तें तुम्ही समजूं शकतां. परंतु मला मात्र अगदीं विलक्षण आणि वेगळा च अनुभव आला. ती बातमी क्लेशदायी तर खरी च. पण ती ऐकून मला कांहीं एका विशेष आनंदाचा आभास अंतर्यामांत झाला आणि त्या आनंदाच्या अवस्थेंत च मी वर ज्या खोलींत त्यांचें शव होतें तिथें गेलों. तिथें जी मंडळी बसली होती त्यांच्या चेहऱ्यावर जेव्हां स्पष्ट दुःखाची छाया मीं पाहिली त्या वेळीं मला भास झाला, कीं अशी कांहीं घटना झाली आहे कीं जिच्यामुळें पुष्कळांना दुःख होऊं शकतें. तरीपण मला कबूल केलें पाहिजे, कीं आंतून ज्या आनंदाचा अनुभव मला येत होता तो कांहीं कमी झाला नाहीं. शेवटीं संध्याकाळीं प्रेताला अग्नि दिल्यानंतर जेव्हां ईशोपनिषद् आणि गीताईचे श्लोक म्हणूं लागलों तेव्हां तर त्या आनंदाला पार उरला नाहीं. ही माझी स्थिति रात्रीं झोंपेपर्यंत तशी च राहिली. सकाळीं उठल्यानंतर जमनालाल-जींच्या मृत्यूमुळें केवढी क्षति पडली आहे आणि आमची जबाबदारी किती वाढली आहे याचें हळूं हळूं भान होत गेलें. पुढचा सर्व प्रकार काय झाला असेल तो तुम्ही समजूं शकतां. परंतु मला आलेला आनंदाचा अनुभव कशामुळें आला हें सांगायला पाहिजे.

जमनालालजींनीं गोसेवेचें काम हातीं घेतलें ही बातमी मला जेल-मध्यें कळली. ती ऐकून मला समाधान वाटलें. आणि हें उपयोगी काम जमनालालजींनीं उचललें आहे तेव्हां देशाला तर त्यानें अवश्य उपकार होईल च, परंतु त्यांच्या स्वतःच्या चित्ताला हि त्या योगानें शांति लाभेल असें वाटलें. परंतु त्याबरोबर च त्यांच्या थकलेल्या शरीराला हें काम असह्य होणार आहे ही संभावना मी पाहत होतों च. मी जेलमधून बाहेर आलों त्या वेळीं पहिल्या भेटींत च त्यांनीं प्रश्न विचारला, कीं "मीं गोसेवा संघाचें काम घेतलें त्याबद्दल तुमचा काय अभिप्राय आहे?" मीं त्यांना सांगितलें, कीं "हें ऐकून माझ्या चित्ताला फार समाधान झालें." इतके शब्द मी बोलल्याबरोबर त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें. अलीकडच्या ह्या २।३

महिन्यांत गोसेवेसारखें पवित्र, प्रेमभाव उत्पन्न करणारें आणि आत्म्याच्या उन्नतीचें साधनरूप असें हें सुंदर काम मिळाल्याबद्दल त्यांच्या चित्ताला फार समाधान झालेलें दिसत होतें. आणि नेहमींपेक्षां हि अधिक एकाग्रतेनें आणि निकरानें त्यांनीं हें काम चालविलें. ते जेव्हां मेले तेव्हां त्यांच्या मनाची जितकी उन्नत अवस्था होती तितकी उन्नत अवस्था त्यांच्या पूर्वीच्या सबंध वीस वर्षांच्या प्रयत्नांत नव्हती. गेल्या वीस वर्षांपासून मनाच्या सूक्ष्म परीक्षणाचा त्यांचा अभ्यास असून हि जी मनाची उन्नत अवस्था त्यांना गांठतां आली नाहीं ती ह्या २।३ महिन्यांत त्यांना अचानकपणें प्राप्त झाली. प्रथमपासून त्यांच्याशीं निकट परिचय असल्यामुळें मी हें पाहूं शकत होतों. अशा उन्नत अवस्थेंत मरण येणें फार आनंदाचें आहे. मरण तर प्रत्येकाला च यायचें आहे. पण मरणामरणांत फरक असतात. अगदीं शेवटपर्यंत काम करीत करीत, दुसऱ्याची सेवा घ्यावी न लागतां मनाच्या उन्नत अवस्थेंत देह सोडून जाण्याचें भाग्य प्राप्त होणें यापेक्षा जीवनाचा चांगला अंत आणखी कोणचा असूं शकणार! हें लक्षांत येऊन मी आनंदांत होतों. प्रस्तुत प्रसंग जरी दुःख वाटण्यासारखा असला तरी त्यांत हि आनंदाची बाजू होती ती मी तुमच्यासमोर मांडली. मला वाटतें असें च मरण देवापाशीं आपण मागावें आणि या च दिशेनें आणि या च हेतूनें आपला सर्व प्रयत्न असावा.

रामायणांत एक प्रसंग तुलसीदासजींनीं वर्णिला आहे. सुग्रीव आणि वाली यांचें युद्ध चालू असतां रामानें वालीला बाण मारला. आणि त्या बाणानें विव्हळ होऊन वाली पडला असतां वालीचा आणि रामाचा संवाद झालेला दिला आहे. रामानें बाण मारल्याबद्दल वालीनें रामाला दोष दिला. तेव्हां राम वालीला म्हणतो, "हे माझ्या लाडक्या मुला! हा मी तुला बाण नाहीं मारला. पण हें मीं तुझ्यावर प्रेम केलें आहे. परंतु तुझी जर इच्छा न असेल तर मी तुला जिवंत ठेवतों. तुझी जशी इच्छा असेल तसें करेनों." त्यावर वाली म्हणाला, "रामा! आज तुझें प्रत्यक्ष दर्शन लाभलें आहे. आणि अशा पवित्र क्षणीं मरणाची संधि मला मिळत असतांना ती मी गमावूं आणि तुझ्याजवळ आयुष्य मागूं तर मग पुढें केव्हां मरणाची पाळी

येईल तेव्हां हें दर्शन या डोळ्यांना लाभेल याची मला शाश्वती नाहीं. म्हणून ही च स्थिति मी पत्करतों. मला जिवंत राहण्याची इच्छा नाहीं. आतां च मरणें मला श्रेयस्कर आहे. " असें बोलून वाली मुक्त झाला आणि रामाच्या ज्योतींत मिसळून गेला, असें चित्र आणि चरित्र रामायणांत वर्णन केलें आहे. यांतला भाव हा कीं चित्ताचें शोधन करीत करीत उन्नत अवस्था गांठून तशा अवस्थेंत च मरावें. मी जाणतों कीं जमनालालजींना असें मरण आलें. आणि म्हणून हा दुःखाचा विषय नाहीं पण आनंदाचा विषय आहे; त्याचा हेवा वाटण्यासारखा आहे.

त्यांच्या अनेक गुणांचें वर्णन आपण करूं शकतों परंतु त्यांच्यांतला सर्वांत मोठा गुण हा होता कीं अनेक सेवेचीं कामें करीत असतांना ती सेवा किती झाली ह्याचें हिशेबी पुरुष या नात्यानें बाह्य माप जरी ते घेत होते तरी त्या सेवेचें त्यांचें मुख्य माप वेगळें च होतें. ह्या सेवेनें माझ्या अंतः-करणांतील मळ, अशुद्धि कमी होत आहे ना ? हें ते पहात. जें सेवाकार्य केलें त्याचा परिणाम चित्तशुद्धीच्या रूपांत दिसला तर ती सेवा खरी, चित्त-शुद्धीचा परिणाम कमी दिसला तर ती सेवा तितकी अपुरी; आणि ज्या सेवेचा असा परिणाम दिसून आला नाहीं ती सेवा खोटी असें त्यांना वाटे. प्रत्येक सेवा चित्तशुद्धीच्या कसोटीवर ते घांसून घेत. चित्तशुद्धीचा कस तो च त्या सेवेचा कस असें ते समजत. अशा चित्तशुद्धीच्या वृत्तींत जो देह सोडून गेला तो गेला च नाहीं. तो लहान देहांतून गेला, परंतु समाजाच्या व्यापक देहांत प्रविष्ट झाला. असें पुष्कळदां होतें. देह आत्म्याच्या विकासा-साठीं च आहे. परंतु ज्यांचा आत्मा विशेष उन्नत झाला आहे त्यांच्या विकासाला पुढें देहांत पुरेसा वाव मिळेनासा होतो. त्यांच्या त्या विशाल आत्म्याला देहाचें माप अपुरें पडतें. अशा वेळीं ते आत्मे देह फेंकून देऊन देहरहित अवस्थेंत अधिक सेवा करतात. आणि अशा सारखी स्थिति जमनालालजींची झाली आहे. तुमच्या आमच्या देहांत जणूं त्यांनीं प्रवेश केला आहे असें मी तरी पाहत आहें. असा मृत्यु हा जिवंत मृत्यु होय. मृत्यु हि जिवंत असूं शकतो आणि जीवन हि मृत असूं शकतें. जिवंत मृत्यु फार थोडयांचा होतो. तसा हा जमनालालजींचा मृत्यु आहे. त्याचा परिणाम तुम्हां

आम्हांवर अवश्य होईल. पण तसा परिणाम होण्याला अनुकूल अशी मनाची उघडी दशा आपण ठेवली पाहिजे. अशा परिणामाचें एक लहानसें च उदाहरण देतों. जमनालालजींच्या मृत्यूनंतर त्यांच्या पत्नींना असा संकल्प करण्याची प्रेरणा झाली कीं आपला देह राष्ट्र-कार्यांत समर्पण व्हावा. त्यांनीं आपली स्वतःची खाजगी संपत्ति राष्ट्राला समर्पण करण्याचा संकल्प केला. जानकीबाई म्हणजे कोणी विशेष शिकलेल्या बाई नाहींत किंवा विकासाचें एखादें स्वतंत्र साधन त्यांना लाभलें आहे असें म्हणतां येत नाहीं. परंतु हा परिणाम जमनालालजींच्या मृत्यूचा झाला असा याचा अर्थ होतो. देह असतांना आत्मा जो परिणाम करूं शकत नाहीं आणि करूं शकतो, तो किंवा त्यापेक्षां अधिक परिणाम देह गेल्यावर तो करूं शकतो, त्यानें हें एक उदाहरण आहे. आणखी हि अशीं उदाहरणें होतील. कारण मोठे आत्मे देह सोडल्यावर च अधिक बलवान बनतात. संतांचीं उदाहरणें आपण पाहतों न. ते जिवंत होते तर समाज त्यांची किंमत करीत नव्हता उलट त्यांचा छळ करीत होता. परंतु देह गेल्यानंतर देहाबाहेर राहून फार च शक्तिशाली परिणाम समाजाच्या चित्तावर ते करूं शकले. अशांच्या च मालिकेंत जमनालालजींचें लहानसें कां होईना स्थान आहे. म्हणून त्यांनीं जितक्या जोरानें कार्य केलें त्याहून अधिक जोरानें तें कार्य पुढें चालविण्याची प्रेरणा आम्हांला ईश्वराच्या कृपेनें मिळूं शकणारी आहे. ती प्रेरणा ग्रहण करण्याला आमचें चित्त उघडें असो, ही प्रार्थना करून हें भाषण मी संपवितों.

---

# ११ तीन मुख्य वाद

माझ्या अत्यन्त प्रिय मित्रांनो,

आज मला जें सांगायचें आहे तें सांगण्यापूर्वी [illegible] प्रकाराचा [illegible] आहे. एका मित्रानीं चिठ्ठी धाडली आहे. तीन मुद्दे आहेत,

"कृपया हिन्दीमें बोलें", यांतील 'कृपया' हा शब्द मी स्वीकारणार आहें. म्हणजे 'कृपया' मराठींत बोलणार आहें. आम्ही नागपुरजेलमध्यें असतांना आमच्या चर्चा व व्याख्यानें बहुधा हिन्दींत होत असत. तेथें असलेले सत्याग्रही बहुतेक हिन्दी जाणणारे होते. त्यामुळें त्यांच्याशीं हिन्दींत च बोलणें व चर्चा होत असे. अशा प्रकारें हिन्दीच्या द्वारें आम्हांला एकमेकांचे विचार कळले. व सहवासांत आनंद वाटला. अर्थात् च मला आतां हिन्दी भाषेचा व्याख्यान देण्याइतका अभ्यास झाला आहे.

प्रान्तीय भाषेचें महत्त्व

पण येथें मराठी बोलण्यांत तत्त्वदृष्टि आहे. आमची जी राष्ट्रभाषा हिन्दी अथवा हिंदुस्थानी अथवा उर्दू ती सर्वांनीं अगत्य शिकावी. पण त्या च बरोबर हें हि अगत्याचें आहे कीं जे लोक दुसऱ्या प्रांतांत येऊन राहतात त्यांनी हि त्या त्या प्रांतीय भाषा समजतील व बोलतां येतील इतक्या शिकाव्या. त्याखेरीज सबंध राष्ट्राचा सांधा मिळणार नाहीं. जोड दोन्ही बाजूंनीं होत असतो. निरनिराळ्या प्रांतीय भाषा बोलणारांनीं राष्ट्रभाषा शिकावी व दरेक प्रांतांत राहणाऱ्या अन्य प्रांतीयांनीं स्वदेशी धर्माला अनुसरून त्या प्रांतांतील भाषा जरूर शिकावी. ही तत्त्वदृष्टि तुम्हांला लाभवून देण्याची कृपा करून, म्हणजे च 'कृपया' मी मराठींत बोलणार आहें.

विद्यार्थ्यांकरितां नुकतेंच माझें एक व्याख्यान झालें आहे. तें तुमच्या पैकीं बहुतेकांनीं ऐकलें असेल असें गृहीत धरतों. त्या भाषणांत मीं एक विचार मांडला होता. तो विचार मी सगळीकडे त्या च भाषेंत मांडीत असतों. कारण माझ्या मनांत तो त्याच भाषेंत बसून गेला आहे. तो विचार म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्य जर कोणाचा अबाधित व निरंकुश अधिकार असेल तर तो विद्यार्थ्यांचा. इतरांना बंधनें असतात आणि तीं योग्य हि असतात. पण विद्यार्थ्याला कसलें हि बंधन नको. या हक्काच्या अंमलबजावणीला अजून सुरवात केली नसेल तर आज सुरवात करा. विद्यार्थी हें एक नातें आहे. त्या नात्याला उद्देशून मी बोलत आहें.

विद्यार्थ्यांचा खास अधिकार

विद्यार्थी ह्या व्यक्तीच्या दृष्टीनें बोलत नाहीं. व्यक्ति या नात्यानें त्याला अनेक बंधनें असण्याचा संभव आहे. पण विद्येचा किंवा सत्याचा शोध करीत असतांना विद्यार्थ्यानें मुक्त असलें पाहिजे. अमुक विद्या अमका महात्मा, गुरु किंवा संत सांगतो म्हणून ग्राह्य नाहीं. ‘ ही संतवाणी आहे, ही आमच्या पंथाची वाणी आहे, म्हणून प्रमाण ’ असा बोजा ज्ञान मिळविण्याच्या बाबतींत किंवा विचार ठरविण्याच्या बाबतींत तुमच्यावर नको. विद्यार्थी या व्यक्तीवर मुलगा, मित्र, शिष्य म्हणून किंवा दुसऱ्या नात्यानें —अनेक बंधनें येतील. पण विद्यार्थी या नात्यानें संपूर्ण स्वातंत्र्य हा तुमचा अधिकार आहे. हा फार महत्त्वाचा—अगदीं मूलभूत—अधिकार आहे. हा मूलभूत अधिकार तुम्हीं बाजूला सारला किंवा सरू दिला तर खरी विद्या येण्याची आशा उरणार नाहीं.

**शैक्षणिक अत्याचार**

अलीकडे ‘ सुधारलेल्या ’ राष्ट्रांत इतिहास, संस्कृति, व्यापार, भूगोल इत्यादि शिकविण्याच्या मिषानें विद्यार्थ्यांचा हा अमूल्य हक्क हिरावून घेण्यांत आला आहे. गणपति बनविणारे आजचे हौशी मूर्तिकार ‘ गणपति म्हणून एक तत्त्व आहे, ’ हें विसरून मातीला हवा तसा आकार देतात. त्यांना वाटतें गणपतीची प्रतिमा बनविणें आपल्या हातचें काम आहे. म्हणून त्याला मर्जीस येईल तसा आकार देतात. कोणी त्याच्या हातांत त्रिशूल आणि भाला देतात, कोणी चरखा देतात, तर कोणी त्याला सिगरेटचें हि व्यसन लावून देतो. अशा प्रकारें बिचाऱ्या गणपतीचे हाल होतात. तसे विद्यार्थ्यांचे हाल चालले आहेत. शहाण्या विद्यार्थ्यांनी असे हाल करून घेण्याची तयारी नव्हती. आज हि नसावी. तुम्हीं असा छळ करून घ्यायला तयार होतां कामा नये. विद्यार्थ्यांनी कोणती विद्या शिकावयाची, कोणत्या साच्यांत ओतावें, हें सरकार ठरवतें. विचारांचें व बुद्धीचें नियंत्रण आणि नियमन सरकार करतें. आजकाल सरकारला जे विचार व विकार इष्ट वाटत असतील ते तुम्हांच्या डोक्यांत कोंबण्याचें नेमकें साधन म्हणजे शिक्षण. सरकारला इष्ट वाटणाऱ्या विचारांच्या दृष्टीनें शिक्षणाच्या योजना होत असतात. असे हाल जर तुम्ही सहन करणार तर तुमची व समाजाची

स्थिति वाईट होणार आहे. भांडवलवादी च नव्हे तर सारींच 'वादी' राष्ट्रें या अशा योजना करीत असतात. त्यांना विरोध करणें विद्यार्थ्यांचें काम आहे. ही पहिली गोष्ट ध्यानांत ठेवा.

ही पहिली गोष्ट आहे हें त्या ऋषीच्या ध्यानांत आलें. म्हणून तो वेदांतील ऋषि बोलला. काय म्हणाला तो ? 'माझ्या लाडक्या शिष्यांनो, तुम्ही बारा वर्षें माझ्याजवळ राहिलां, विद्या शिकलां. पण मला आदर्श मानूं नका. सत्य प्रमाण माना माझी कृति प्रमाण मानूं नका. सत्याच्या कसोटीवर माझे शब्द व आचरण घांसा. जें कसाला उतरेल तें घ्या. हिणकस ठरेल तें टाकून द्या. सत्याची कसोटी दरेकाच्या बुद्धीला सहजगम्य आहे. ती तुम्ही वापरा.'

**बुद्धि-प्रामाण्य**

**'यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि, नो इतराणि।'**

'आमचीं चांगलीं तेवढीं चरितें घ्या, वाईट सोडा' असें तो ऋषि म्हणाला. कारण तो खरा ज्ञानदाता गुरु होता. त्यानें सांगितलेलें तत्त्व नवीन नाहीं. पण त्याची अंमलबजावणी कोठें च होत नाहीं. अतिशय दयाळूपणानें ऋषीनें विद्यार्थ्यांना हा संदेश दिला. तो नीट लक्षांत ठेवा. आपला विचार-स्वातंत्र्याचा हा मूलभूत अधिकार शाबूत राखा. तो गमावूं नका.

स्वतंत्र बुद्धि हें विद्यार्थ्याचें पहिलें लक्षण सांगितलें. स्वतंत्र बुद्धि म्हणजे दडपण नसलेली सत्याग्रही बुद्धि. ही बुद्धि घेऊन तुम्ही जगाकडे पहा. त्यांत तुम्हांला अनंत चमत्कार आढळतील. बुद्धीनें ते समजून घ्या. आजच्या युगांत पोकळ डोकें राखण्याची सोय नाहीं. तुम्ही आपले नेमके व निश्चित विचार न ठेवाल तर इतर कोणाचे तरी विचार त्यांत शिरतील. आजचें जग म्हणतें, 'डोकें रिकामें ठेवतां कामा नये. त्यांत कांहींतरी भरलें च पाहिजे. सद्विचार भरा किंवा ते भरायचे नसतील तर बटाटे भरा, दगड भरा, काय वाटेल तें भरा.' तुमचें डोकें पोकळ राहूं द्यायचें नाहीं, अशी या युगाची प्रतिज्ञा आहे. तुम्ही विचार न कराल तर तो रेडियो तुमच्या डोक्यांत विचार कोंबतो. वर्तमानपत्रें विचार करायला भाग पाडतात. ज्यांत विचार नाहींत अशा प्रकारचें डोकें राखणें आज

**पोकळ डोकें नको**

शक्य नाहीं. म्हणून सत्याग्रही बुद्धि ठेवा व सद्विचार करा. सद्विचार पक्के करणें व सांठवणें हा च मार्ग तुमच्यासाठीं उरला आहे. तुम्ही म्हणाल कीं मी विचार बनवणार नाहीं, तर लोक तुम्हांला बनवणार आहेत. स्वतःला बनवून घेऊं नका. जगाच्या हातांतली माती बनूं नका.

दुर्लक्ष करण्याची सोय नाहीं

आजच्या जगांत दुर्लक्ष करण्याची सोय नाहीं. एकांगी अध्ययनाची सोय नाहीं. समाजशास्त्र वगळून आज कोणतें हि चिंतन होणार नाहीं. इतिहास, अर्थशास्त्र व राज्यशास्त्र ह्यांचें तर होणार च नाहीं, पण गणितासारख्या स्वतंत्र व तटस्थ विषयाचें सुद्धां अध्ययन समाजशास्त्रविरहित आज होणार नाहीं. तत्त्वज्ञान-नीति, गणित, सामान्य-विज्ञान, भौतिक-शास्त्र—कोणत्या हि विषयाचा विचार समाजशास्त्र-निरपेक्ष करणें शक्य नाहीं. समाजशास्त्राच्या पोटांत च जणूं काय हे सर्व विषय समावले आहेत म्हणून नित्य जागरूक राहून सर्वांगीण विचार करणें अगत्याचें आहे.

तीन मुख्य विचार-प्रवाह

आज जगांत तीन फार मोठे विचार-प्रवाह दिसून येत आहेत पहिला 'फाशीवाद व नाझीवाद' हा होय. हे दोन्ही हि वास्तविक एक च आहेत. एक जर्मनींत उत्पन्न झाला व दुसरा इटालींत. तो कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत सबंध जगांत आहे. आपल्या हिन्दुस्थानांत हि आहे. दुसरा साम्यवाद. समाजवाद इत्यादि त्याच्या पोटांत येतात. हा वाद रशियांत प्रवृत्त झाला आणि जगभर पसरला. आणि तिसरा गांधींचा विचार. हे तीन च खरे विचार-प्रवाह आहेत. इंग्लंड अमेरिका इत्यादींच्या विचारांची विचार या दृष्टीनें मोजदाद नाहीं. मोजदाद करायची च झाली तर फाशीनाझींच्या च जवळचे आहेत हे. युद्धांत जय कोणाला हि झाला तरी विचाराच्या दृष्टीनें यांच्या ठिकाणीं सत्य नाहीं. म्हणून हिशोबांत घेण्याची जरूर नाहीं.

या तिन्ही वादांची प्रगति आपल्या डोळ्यांसमोर आहे. त्यांचें तुम्ही तटस्थपणानें उत्तम अध्ययन करा. यांतील गांधीवादाचा

गांधीवाद आणि भारतवर्ष

तर उदय जवळपास हिन्दुस्थानांतच झाला आहे. 'जवळपास' म्हणण्याचें कारण इतर देशांतील विचारकांनीं हि त्यासारखे विचार व्यक्त केले आहेत. कांहीं व्यक्तींनीं प्रयोग हि केले आहेत. पण या विषयाला साकार बनवून व त्याला सगुण रूप देऊन त्याचा राष्ट्रव्यापी प्रयोग करणें गांधींना च आणि हिन्दुस्थानांत च शक्य झालें. गांधींच्या प्रयोगाला हिन्दुस्थानांत च अनुकूल परिस्थिति व वातावरण होतें. दुसरे दोन वाद युरोपांत जन्मले आहेत. हे तिन्ही वाद कां व कसे उत्पन्न झाले ? हा विचार आपण केला पाहिजे.

इतिहासाच्या निरीक्षणांतून मीं एक न्याय बनविला आहे. तो तुमच्या समोर मांडतों. 'इन्द्राय तक्षकाय स्वाहा' हा तो न्याय

इन्द्राय तक्षकाय स्वाहा

होय. सापांशीं वांकडें आल्यामुळें एका ब्राह्मणानें सापांचा यज्ञ केला. त्यांत पुष्कळ सापांच्या आहुति दिल्या. पण तक्षक इन्द्राच्या आसनाखालीं जाऊन दडला. इकडे ब्राह्मणानें म्हटलें 'तक्षकाय स्वाहा' पण तक्षक येईच ना. आहुति फुकट गेली. ब्राह्मणाला मोठें आश्चर्य वाटलें. तेव्हां ब्राह्मणानें सूक्ष्म दृष्टीनें भूगोलाचें निरीक्षण केलें. त्याला दिसून आलें कीं तक्षक इन्द्राश्रित झाल्यामुळें आहुति फुकट गेली. म्हणून तो म्हणाला 'इन्द्राय तक्षकाय स्वाहा'. ब्राह्मणानें आडमुठेपणानें दोघांची हि आहुति देण्याचा संकल्प केला. पृथक्करणाची दगदग केली नाहीं. पण इन्द्र पडला अमर. त्यामुळें इन्द्राची आहुति पडणें शक्य नव्हतें. ब्राह्मणानें पृथक्करणाचे कष्ट न केल्यामुळें अखेरीस इन्द्राबरोबर तक्षक हि अमर झाला.

प्रायः कोणता हि वाद असा नाहीं कीं ज्यामध्यें कोणता ना कोणता गुण नाहीं. एखादा वाद सर्वस्वीं अनिष्ट किंवा दोषयुक्त आहे असें ठरविलें

निर्भेळ दोषयुक्त वाद नाहीं

आणि त्याच्यांतील गुणांचा अव्हेर केला तर तो अमर होतो. कोणत्या हि वादांतील गुणदोषपृथक्करण न केलें तर दोषांनीं भरलेला वाद हि फोफावतो. म्हणून दरेक वादांत जे गुण असतील ते जाणून घेतले पाहिजेत. एवढयासाठीं

नाझीवाद सर्वथैव दुष्ट आहे, असें म्हणून चालणार नाहीं. त्यानें त्याच्यांतले गुण आपल्याला दिसत नाहींत व साम्यवादाच्या सत्यान्वें हि अन्वेषण होणार नाहीं. कोणत्या हि वादाचे नुसते दोष पाहिल्यानें तो खंडित होत नाहीं.

**नाझीवादांतील गुण**

भ्रांत वादांतला गुण हि स्वीकारला म्हणजे त्या वादांत मग टिकण्यासारखें कांहीं च शिल्लक उरत नाहीं. या दृष्टीनें आपण नाझीवादांत कोणता गुण आहे तें पाहूं. नाझीवाद एक प्रकारच्या पूर्व अभिमानावर उभा आहे, प्राचीनपरंपरेच्या व पूर्वेतिहासाच्या गौरवावर उभा आहे. "आम्ही जर्मनीचे लोक श्रेष्ठ आहोंत. आमच्या इतिहासांत भव्यता आहे. परमेश्वरानें अथवा कालरथानें एक मोठी कामगिरी आमच्याकडे सोंपविली आहे. आम्ही आमची पूर्वसंस्कृती टिकवून, तिचें पोषण करून च, ती कामगिरी पार पाडूं शकूं. म्हणून हा जर्मनवंश वाढविला पाहिजे. आमच्या ठिकाणीं थोर गुण आहेत, म्हणून आमच्यावर थोर कामगिरी सोंपविण्यांत आली आहे. व्यक्तीप्रमाणें समाजांत व राष्ट्रांत हि विशिष्ट गुण असतात. हे आमचे विशिष्ट गुण म्हणजे च आमचा आमचेपणा. आमची संस्कृति निर्मळ आहे. आम्ही शुद्ध रक्तानें, शुद्ध विचारानें जर्मन लोक च हें कार्य करण्यास लायक आहोंत." शुद्ध म्हणजे पूर्व-परंपरेनें मिळालेलें. बेडकाला बेडकांच्या परंपरेनें जे गुण लाभले ते शुद्ध. सापाला सापांच्या परंपरेनें लाभलेले गुण शुद्ध. त्या च प्रमाणें आम्हांला पूर्व-परंपरेनें लाभलेले जे विशिष्ट गुण ती च आमची शुद्ध संस्कृति. म्हणून आम्ही जर्मन देशाचा अभिमान राखून आपल्या परंपरेचें रक्षण केलें पाहिजे. नाझीवादांत इतर दोष भरपूर आहेत. पण हा एक आकर्षक गुण आहे. आकर्षक वाटला तरी तो पूर्णांशें ग्राह्य नाहीं. पूर्व-परंपरेचें सातत्य कायम राखणें, तिचा धागा तुटूं न देणें, संस्कृतीची परंपरा अविच्छिन्न राखण्याकरितां पूर्वजांच्या संस्कृतीबद्दल आदर व प्रेम [illegible] हा [illegible] आग्रह आहे. वंशाभिमान ही [illegible] वस्तु नाहीं.

साम्यवादांतील आहेत आणि श्रीमंत अधिक श्रीमंत होत आहेत.
ग्राह्यांश गरिबांच्या पोटाचा खळगा खोल खोल होत होत पॅसिफिकासारखा झालेला आहे आणि श्रीमंतांच्या पैशांची टेकडी उंच होत होत हिमालयाएवढी झाली आहे. हें अंतर सहन न होऊन साम्यवाद निर्माण झाला. तो म्हणतो कीं हल्लीं जो बहुमताचा कारभार चालू आहे ती खरी लोकसत्ता नव्हे. मतें मोजण्याची लोकशाही ही खरी नव्हे. कारण त्या लोकशाहींत गरिबांचीं मतें श्रीमंतांच्या हातांत राहतात म्हणून गरिबांच्या मतदानाला किंमत नाहीं. श्रीमंतांचा नाश झाल्याखेरीज कोणाला हि मतदानाचा समान हक्क लाभूं शकत नाहीं. हल्लींची मतदानपद्धति फक्त आकारानें लोकशाहीसारखी आहे. आम्हांला आकारानें नव्हे तर प्रकारानें लोकशाही रूढ करावयाची आहे. ती निष्पक्षपाती लोकशाही होईल. आज निष्पक्षपाती रहायचें असेल तर गरिबांचा पक्षपात राखणें भाग आहे. आतांपर्यंत समान हक्काच्या नांवाखालीं श्रीमंतांचें प्रस्थ माजवण्यांत आलें. समत्वाचें, न्यायाचें, समान संधीचें नाटक करण्यांत आलें. समान संधि म्हणजे गरिबांचा चुराडा. गामा पहेलवान व काडी पहेलवान यांचा सामना ठरवायचा. आणि दोघांना हि म्हणे समान संधि देतों. गामा पहेलवान यशस्वी होणार हें ठरलेलेंच आहे. आधीं गरिबांचा उद्धार करा. मग समान संधि इत्यादि गोष्टी बोला. गरिबांच्या उद्धाराकरितां कोणतें हि साधन वापरलें तरी त्यांत पाप होणार नाहीं. अशा प्रकारें साम्यवादांत गरिबांविषयीं पराकाष्ठेची कळकळ हा गुण आहे.

याप्रमाणें या दोन गुणांमुळें हे दोन वाद जगांत व हिन्दुस्थानांत पसरत आहेत. मीं दोहींचें गुणग्राही वर्णन केलें. पूर्व-परंपरेच्या प्रेमामुळें

हिन्दुस्थानांत नाझीवाद नाझीवाद हिन्दुस्थानांत पसरूं पहात आहे. महाराष्ट्रांत विशेष पसरूं पहात आहे. मी महाराष्ट्रापुरतें बोलतों. कारण महाराष्ट्राचे दोष दाखवण्याचा मला विशेष अधिकार आहे. महाराष्ट्रांत, 'आमचा महाराष्ट्रधर्म', 'आमची पेशवाई', 'आमचा मराठागडी', 'आमची संस्कृति', 'आमचे समर्थ व त्यांची मारुतीची उपासना' वगैरे भावना जो पक्ष

उचलून धरतो, त्याच्याबद्दल तरुणांना आकर्षण वाटतें. त्यामुळें च त्यांना त्या विचारांत पूर्वीच्या इतिहासाच्या अभिमानाचा मोठा गुण दिसतो. दासनवमी, हनुमज्जयन्ती, भीष्माष्टमी, शिवाजी उत्सव यांपासून स्फूर्ति व आवेश यांचा लाभ मिळतो. म्हणून त्या पक्षांत दुसरे किती हि दोष असले तरी तरुणांना तो आकर्षक वाटतो. मुसलमानांत हा च विचार मुस्लीमलीगनें पसरविला. मुसलमानी धर्म कसा वैभवशाली होता, हिन्दुस्थानांत त्या धर्माच्या लोकांचें साम्राज्य कसें होतें, इत्यादि पूर्वपरंपरेच्या अभिमानाचा गुण त्यांत आहे. याप्रमाणें हिन्दुसभा व मुस्लिमलीग या दोहींचें काम नाझी-परंपरेचें आहे. ते जेव्हां खाजगींत मोकळेपणानें बोलतात तेव्हां कधीं कधीं ही गोष्ट कबूल करतात. नेहमीं करीत नाहींत. मात्र सहानुभूतीची जागा ती आहे. शपथविधि, गुप्तता इत्यादि सर्व लक्षणें आहेत. तें हिरवें निशाण, तें कुराणावर हात ठेवणें, ती मारुतीची साक्ष, ती शपथ, तो ध्वज, हें सर्व पाहून एक प्रकारचा उत्साह वाटूं लागतो. असें वाटूं लागतें कीं हे लोक आपणांस अगदीं च कांहीं रानांत सोडीत नाहींत. पूर्वजांच्या परिचित मार्गानें नेत आहेत. या भावनेच्या जोरावर हे नाझी-संप्रदाय हिन्दुस्थानांत वाढले आहेत.

**हिन्दुस्थानची अनुपम गरिबी**

हिन्दुस्थानांत गरिबी उपनिषदांतील ब्रह्मासारखी अद्वितीय आहे. तिला उपमा किंवा तुलना नाहीं. त्यामुळें गरिबांबद्दल कळकळ बाळगणारा व श्रीमंतांबद्दल चीड असलेला साम्यवाद आकर्षक वाटतो व पसरतो.

याप्रमाणें दोन भिन्न गुणांमुळें हे दोन वाद आकर्षक होऊन पसरले आहेत. पूर्वपरंपरेच्या अभिमानामुळें नाझीवाद आकर्षक झाला आहे. हिन्दूंना व मुसलमानांना अभिमानाची जागा दाखवून हिंदुस्थानांत तो पसरला आहे. आणि दारिद्र्य असल्यामुळें साम्यवाद सहज पसरूं शकतो. मी दोषाविष्करणाच्या बुद्धीनें या वादांचा विचार करीत नाहीं. कारण गुण आपल्याला त्यांतील गुण तेवढे च पहावयाचे आहेत.

आतां तिसऱ्या वादाकडे वळूं. तो गांधींनी मांडला. तो काय आहे हें नीट समजून घेतलें पाहिजे. [illegible] नाहीं हा

तिसरा वाद

'शामळो', याचा कसचा आला आहे वाद नि वीद. हे बिचारे गुजराथी, भित्रे, गरीब गाईसारखे, सापाला न मारणारे लोक. यांनीं व्यापाराशिवाय कधीं कांहीं केलें नाहीं. तरवार कधीं उचलली नाहीं. त्या परंपरेंतला हा शामळो. त्याचा वाद तसा च लोकांना पटायचा. पण मी तुम्हांला सांगतों, तसें नाहीं. तसें असतें, तर महाराष्ट्रीय या नात्यानें मीं तो केव्हां च फेंकून दिला असता. शामळोपणा कडू, गोड, आंबट कसा हि असता, तरी मीं तुम्हांला त्याची शिफारस केली नसती.

पण मीं तुम्हांला सांगितलें कीं वस्तुस्थिति तशी नाहीं. हें तुम्ही तपासून पहा. हा वाद तुम्हीं तपासला नाहीं तर मी म्हणेन तुम्ही विद्यार्थी वावळट बनत चाललांत. दुसरा आरोप करणार नाहीं, फक्त वावळट म्हणेन.

हिन्दुस्थान आज दीडशें वर्षें निःशस्त्र आहे. शस्त्रशक्ति नाहीं, द्रव्य-शक्ति हि उरलेली नाहीं. असें हें केवळ शक्तिहीन झालेलें राष्ट्र होतें.

केवळ शक्तिहीन राष्ट्र

अशा राष्ट्रानें ताठ उभें राहण्याची शक्ति कशी मिळवावी हा प्रश्न होता. या बाबतींत विचार-मंथन सुरू झालें. शस्त्रविषयक व द्रव्यविषयक दोन्ही प्रकारची शक्ति लोपली असतांना आपण ताठ उभे राहूं शकतों काय? आपलें सत्व सांभाळूं शकतों काय? असें विचार-मंथन सुरू झालें.

कोणाला वाटलें, पाश्चात्यांचें अनुकरण केलें पाहिजे, त्यांची विद्या शिकायला पाहिजे. कोणाला वाटलें धर्मसुधारणेनें च आपली उन्नति होईल. धर्मसुधारणेचें बळ उत्पन्न करण्याकरितां ब्राह्म-समाज, प्रार्थना-समाज, आर्य-समाज, थिआसॉफी वगैरे चळवळी निघाल्या. त्यांच्या मुळाशीं आमची द्रव्यशक्ति व शस्त्रशक्ति गेली असतांना आपण बुद्धि-शक्तीच्या जोरावर कसे उभे राहूं शकूं, ही तळमळ होती.

शक्ति निर्माण करण्याचें विविध प्रयत्न

बुद्धिशक्तीकरितां च शिक्षणविषयक सुधारणा सुरू झाल्या. बुद्धीची शक्ति ही एक च आशा उरली होती. म्हणून गांधींच्या पूर्वींच्या काळांत धर्मसुधारणेला शिक्षणसुधारणेची हि जोड देण्यांत आली. राममोहनराय, दयानंद, रानडे इत्यादिकांनीं

बुद्धिशक्तीचा प्रयोग

बुद्धीच्या ताकतीनें पुढें येण्याचा प्रयत्न केला. शस्त्राची ताकत नाहीं, द्रव्याची ताकत नाहीं. दुसरें काय करणार ?

शिक्षणविषयक सुधारणेंत इंग्रजी विद्येचें अनुकरण सुरू झालें. तेव्हां दुसरा एक पक्ष निघाला. तो म्हणाला इंग्रजीची उपासना नको.

**शिक्षणविषयक प्रयोग**

पूर्वीच्या विद्यांना च नवीन स्वरूपानें चालना देऊं या. अशा रीतीनें गुरुकुल वगैरे संस्था निघाल्या. त्यांतून तिसरी चळवळ राष्ट्रीय शिक्षणाची निघाली. पूर्वीच्या संस्कृत विद्येचा व नवीन विद्येचा हि लाभ करून घेण्याचा हा प्रयत्न होता. पुनरुज्जीवनाचें व सुधारणेचें जें शिक्षण तें राष्ट्रीय शिक्षण, असें मानलें जाऊं लागलें. पण तिन्ही प्रकारांच्या मुळाशीं विचार एक च, कीं बुद्धीच्या द्वारें शक्ति निर्माण करूं. शक्ति निर्माण करण्याचीं द्वारें तीन : धन, बल व बुद्धि. पहिलीं दोन द्वारें जवळपास बंद झालीं. तेव्हां इंग्रजांशीं टक्कर घ्यायला तिसरें बुद्धीचें द्वार काय तें उरलें. अशा विचारानें त्या चळवळी सुरू झाल्या. अनेक देशभक्तांनीं त्याच्यांत भाग घेतला.

पण बुद्धीमध्यें शक्ति कशी यावी ? बुद्धीचें स्वतंत्र पोषण होतें काय ? आचारहीन बुद्धि शक्तिशाली होते काय ? निराचार बुद्धि शक्तिशाली होत नाहीं. आचारांत बुद्धि उतरविण्याची प्रक्रिया साधल्या-शिवाय स्वतंत्रपणें बुद्धि शक्ति-शाली होत नाहीं. हें लक्षांत आलें तेव्हां कांग्रेस निघाली. बुद्धिमान लोक म्हणूं लागले कीं आपण गरिबांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याच्या कामीं आपली बुद्धि वापरूं या. म्हणजेच ती सक्रिय करूं या. विचार बरोबर होता. पण गाऱ्हाणीं मांडून निराकरणाचा प्रयत्न एका मर्यादेपर्यंत च सफल होतो. पूर्णपणें सफल होत नाहीं. उलट गाऱ्हाणीं स्वस्त मात्र होतात, असा काँग्रेसला अनुभव आला. त्यामुळें काँग्रेसनें गाऱ्हाणीं मांडलीं, तरी तिचें म्हणणें केवळ विनंती रूप असे, तिचा प्रयत्न सफल होत नसे. कां होत नसे ? गाऱ्हाणीं दूर होण्याची शक्यता नव्हती म्हणून. तें कसें ? कारण सगळ्या गाऱ्हाण्यांचें मूळ कारण, सगळ्यांत मोठें गाऱ्हाणें, परराज्य. तें मूळ जिवंत असेपर्यंत दुसरें सुधारलें तरी पुन्हां नवीन गाऱ्हाणीं फुटणार आहे.

हें काँग्रेसच्या लक्षांत आलें. सहज लक्षांत येणारें आहे. मनुष्य सगळें झाड कापूं शकतो, पण ज्या फांदीवर तो उभा असेल ती तोडूं शकत नाहीं. इंग्रजसरकार अनेक सुधारणा करूं शकतें. पण ज्या सत्तेच्या फांदीवर तें उभें आहे, ती मुख्य फांदी तें कसें तोडील? तुम्हीं बुद्धिवाद करून किती हि सांगितलें, जसें यांनीं मला सांगितलें 'कृपया हिन्दीमें बोलें'. तसें तुम्हीं सांगितलें, 'कृपया येवढी फांदी तोडा' तर तें कसें ऐकेल? ती कृपा त्याच्या अंगाशीं येईल. ते किरकोळ फांद्या तोडतील, पण मुख्य फांदीला हात लावणार नाहींत. म्हणतील 'स्वतंत्रताकी जय' बोलूं नका. 'इंग्रजसरकार की जय' बोला.

**मूलभूत गाऱ्हाणें**

हें लोकांच्या लक्षांत आलें. हें लक्षांत आल्यानंतर 'आतां काय करावयाचें' हा प्रश्न उभा राहिला. वाक्य ऐकलें 'शक्तीनें मिळती राज्यें। युक्तीनें यत्न होतसे।' दरारा बसवणें ही शक्ति आणि गुप्त रीतीनें कार्य करणें ही न युक्ति, असा समज झाला. आतां अधिकाऱ्यांना मारूं या, गुप्त कट करून बाँबगोळे तयार करूं या, असें वाटूं लागलें. ऑफिसरांचे खून झाले. हें सर्व शुद्धबुद्धीनें झालें. पण त्यांना काय अनुभव आले? बाँबगोळे तयार करायला पैसे पाहिजेत. मग ह्यांनीं इतिहासांतून धडा घेतला. शिवाजीमहाराजांनीं गुप्त कट केले. त्यांना हि साधनें मिळवावीं लागलीं. त्यासाठीं सुरत लुटली. मराठ्यांनीं बंगाल्यांत दरोडे घातले. यांनीं हि भगवद्गीतेच्या नांवावर सद्भावनेनें डाके घालायला सुरवात केली. पण डाके मारणारे पूर्वींचे च जे गरीब लुटारू होते ते हि डाके मारूं लागले. यांच्या पेक्षां ते वाकबगार होते. त्यांनीं च ज्यास्त डाके मारले. पण लोकांना तें कसें कळणार? कोणते डाके कोणाचे, हें कसें समजणार? बोकडाची मान कापणारी सुरी कोणाची, हें बोकडाला कळेना. ही सुरी यज्ञासाठीं मारणाऱ्या ब्राह्मणाची आहे कीं मांस विकण्यासाठीं मारणाऱ्या खाटकाची आहे? बिचाऱ्या बोकडाला कळेना. दरोड्या-दरोड्यांतील फरक लोकांना करतां येईना. आम्हांला सोडवा एवढें च ते म्हणूं लागले. त्यामुळें सरकारचें चांगलें फावलें. अराजक्यांत आणि दरोडेखोरांत फरक न करतां आल्यामुळें बाँबगोळ्यांचा मार्ग गेला.

**शक्तीचे व युक्तीचे प्रयोग**

**गांधींचा मार्ग**

पुढें महात्मा गांधी आले. त्यांनीं म्हटलें, अराजक्यांची तळमळ चांगली आहे, पण पद्धति बरोबर नाहीं. मुख्य फांदी च तोडायला हवी पण हिंसेनें हिंदुस्थानांत जमायचें नाहीं. संघटित हिंसेवर-बसविलेली ही प्रक्रिया व्यापक प्रमाणावर असली तर च ती फळायची. हल्लींचीं सरकारें अत्यंत संघटित, व्यापकतम हिंसेचीं सरकारें आहेत. तितकी व्यापक हिंसक संघटना प्रजेला करतां येत नाहीं. म्हणून तिची हिंसा कुचकामाची ठरते. शक्ति निर्माण होत नाहीं. फार तर, राष्ट्रप्रेमाची तहान भागते. कांहींतरी करण्याची तळमळ शांत होते. व्यक्तिगत समाधान मिळतें. पण संघटनेला ही पद्धत निरुपयोगी आहे. राष्ट्रीय उत्थानाच्या दृष्टीनें कुचकामाची आहे.

**सरकारच्या सत्तेचा पाया**

म्हणून गांधी म्हणाले, आम जनतेचें उघडपणें संघटन करण्याची माझी पद्धति च परिणामकारक ठरेल. सरकार स्वसत्तेवर टिकत नाहीं. लोकांकडून मिळालेल्या सत्तेवरच टिकतें. त्याला लोकांचा आधार लागतो. सरकार आणि लोक असे दोन हात मिळून राज्याची टाळी वाजते. तुम्हीं तुमचा हात काढून घ्या म्हणजे त्याचा हात आपोआप च लटका पडतो. लोकांनीं दिलेली सत्ता काढून घेतली तर सरकार टिकत नाहीं. आपण प्रतिकाराची शक्ति निर्माण करूं शकूं ती अशा च संघटनांतून.

**आपल्या मर्यादेची पूर्व-परंपरा**

हिन्दुस्थान एवढें मोठें चाळीस कोटींचें राष्ट्र कसें झालें ? आपल्या पूर्वपरंपरेच्या गुणामुळें एवढें मोठें राष्ट्र बनलें. हें फिरकोळ राष्ट्र नाहीं. आपले परमपूज्य राष्ट्रीय कवि रवीन्द्रनाथ ठाकूर यांनीं हिंदुस्थानास उद्देशून 'भारतेर महामानवेर सागरतीरे' असें म्हटलें आहे. सगळ्या जगाचे लोक येथें येऊन राहिले आहेत. सर्व च आक्रमण करून आलेले नाहींत. आपण त्यांना जाणूनबुजून आश्रय दिला. पारश्यांनीं आक्रमण केलें नव्हतें. आपण त्यांना प्रेमानें जागा दिली. जे आक्रमण करून आले ते हि मिळून एकजीव झाल्यासारखे आहेत. आतां मुसलमान कोणी बाहेरून उपटून काढील

तर गोष्ट वेगळी. आपल्या राष्ट्राची मर्यादेची एक जुनी परंपरा आहे. आपण इतरांना वाव देऊं शकतों व इतरांवर आक्रमण करीत नाहीं.

शस्त्र म्हणजे काय ?

या परंपरेंतून गांधींना हा विचार मिळाला. आपल्याजवळ प्रतिकाराचें शस्त्र आहे. शस्त्र म्हणजे शासन, नियमन, करणारें, तो अर्थ हाताला लागू पडतो. हत्याराला लागू पडत नाहीं. हत्यार हें शस्त्र च नाहीं. तें औजार आहे. जड वस्तु आहे. त्याला स्वतंत्र किंमत नाहीं. त्याची गरज नाहीं.

अहिंसेच्या प्रगतीची खूण

हिन्दुस्थानची महान आवश्यकता, त्याच्या इतिहासाची एक च एक मागणी, पूर्ण करण्याकरितां हा विचार निर्माण झाला. म्हणून तो पसरतो. वीस वर्षांत बराच पसरला. जगांत इतरत्र अहिंसेला जणूं स्थान च नसल्यासारखें आहे. पण हिंदुस्थानांतील तरुण देखील, 'राष्ट्रीय-व्यवहारांत हिंसा योग्य कीं अहिंसा' यावर विचार करतात. अहिंसेच्या मार्गावर ही फार च मोठी प्रगति आहे, असें मी समजतों. तात्बडतोब सगळे अहिंसावादी होतील अशी आपली अपेक्षा च नाहीं. सगळ्यांनीं आधीं विचार च करायला पाहिजे. आज तरुणांनीं हि हिंसेचा फेरविचार सुरू केला, ही च खरी प्रगति आहे. यापेक्षां ज्यास्त लवकर गांधींचा विचार फैलावणें शक्य नव्हतें. मी म्हणतो फैलावूं हि नये. सावकाश विचारपूर्वक च त्याचा स्वीकार झाला पाहिजे.

भारतवर्षीय परंपरा

ही विचारसरणी हिन्दुस्थानच्या पूर्वपरंपरेंतून निर्माण झाली आहे कीं नाहीं ? हिन्दुस्थानची मुख्य पूर्वपरंपरा पाहिली पाहिजे. हिन्दुस्थानांत परंपरेचे अनेक किरकोळ प्रवाह आहेत. मराठ्यांची, रजपुतांची, शिखांची अशा अनेक परंपरा आहेत. पण हिन्दुस्थानांतील अनेक धर्मांना, जातींना, भाषांना, प्रान्तांना एकत्र राखणारी जी परंपरा ती मुख्य परंपरा होय. तिच्यांतून हा अहिंसेचा विचार निर्माण झाला. त्या परंपरेचा अभिमान धरा. अशा रीतीनें नाझीवादाचा गुण सुद्धां या विचारांत उत्तम रीतीनें बसूं शकतो. जेलमध्यें मीं या परंपरेचा विचार केला. महाराष्ट्राचा व

पुढें महात्मा गांधी आले. त्यांनीं म्हटलें, अराजक्यांची तळमळ चांगली आहे, पण पद्धति बरोबर नाहीं. मुख्य फांदी च तोडायला हवी पण हिंसेनें हिंदुस्थानांत जमायचें नाहीं. संघटित हिंसेवर-बसविलेली ही प्रक्रिया व्यापक प्रमाणावर असली तर च ती फळायची. हल्लींचीं सरकारें अत्यंत संघटित, व्यापकतम हिंसेचीं सरकारें आहेत. तितकी व्यापक हिंसक संघटना प्रजेला करतां येत नाहीं. म्हणून तिची हिंसा कुचकामाची ठरते. शक्ति निर्माण होत नाहीं. फार तर, राष्ट्रप्रेमाची तहान भागते. कांहींतरी करण्याची तळमळ शांत होते. व्यक्तिगत समाधान मिळतें. पण संघटनेला ही पद्धत निरुपयोगी आहे. राष्ट्रीय उत्थानाच्या दृष्टीनें कुचकामाची आहे.

**गांधींचा मार्ग**

म्हणून गांधी म्हणाले, आम जनतेचें उघडपणें संघटन करण्याची माझी पद्धति च परिणामकारक ठरेल. सरकार स्वसत्तेवर टिकत नाहीं. लोकांकडून मिळालेल्या सत्तेवरच टिकतें. त्याला लोकांचा आधार लागतो. सरकार आणि लोक असे दोन हात मिळून राज्याची टाळी वाजते. तुम्हीं तुमचा हात काढून घ्या म्हणजे त्याचा हात आपोआप च लटका पडतो. लोकांनीं दिलेली सत्ता काढून घेतली तर सरकार टिकत नाहीं. आपण प्रतिकाराची शक्ति निर्माण करूं शकूं ती अशा च संघटनांतून.

**सरकारच्या सत्तेचा पाया**

हिन्दुस्थान एवढें मोठें चाळीस कोटींचें राष्ट्र कसें झालें ? आपल्या पूर्वपरंपरेच्या गुणामुळें एवढें मोठें राष्ट्र बनलें. हें किरकोळ राष्ट्र नाहीं, आपले परमपूज्य राष्ट्रीय कवि रवीन्द्रनाथ टाकुर यांनीं हिंदुस्थानास उद्देशून 'भारतेर महामानवेर सागरतीरे' असें म्हटलें आहे. सगळ्या जगाचे लोक येथें येऊन राहिले आहेत. सर्व च आक्रमण करून आलेले नाहींत. आपण त्यांना जाणूनबुजून आश्रय दिला. पारश्यांनीं आक्रमण केलें नव्हतें. आपण त्यांना प्रेमानें जागा दिली. जे आक्रमण करून आले ते हि मिसळून एकजीव झाल्यासारखे आहेत. आतां मुद्दाम कोणी भांडणें उकरून काढतील

**आपल्या मर्यादेची पूर्व-परंपरा**

तर गोष्ट वेगळी. आपल्या राष्ट्राची मर्यादेची एक जुनी परंपरा आहे. आपण इतरांना वाव देऊं शकतों व इतरांवर आक्रमण करीत नाहीं.

शस्त्र म्हणजे काय ?

या परंपरेंतून गांधींना हा विचार मिळाला. आपल्याजवळ प्रतिकाराचें शस्त्र आहे. शस्त्र म्हणजे शासन, नियमन, करणारें. तो अर्थ हाताला लागू पडतो. हत्याराला लागू पडत नाहीं. हत्यार हें शस्त्र च नाहीं. तें औजार आहे. जड वस्तु आहे. त्याला स्वतंत्र किंमत नाहीं. त्याची गरज नाहीं.

अहिंसेच्या प्रगतीची खूण

हिन्दुस्थानची महान आवश्यकता, त्याच्या इतिहासाची एक च एक मागणी, पूर्ण करण्याकरितां हा विचार निर्माण झाला. म्हणून तो पसरतो. वीस वर्षांत बराच पसरला. जगांत इतरत्र अहिंसेला जणूं स्थान च नसल्यासारखें आहे. पण हिंदुस्थानांतील तरुण देखील, 'राष्ट्रीय—व्यवहारांत हिंसा योग्य कीं अहिंसा' यावर विचार करतात. अहिंसेच्या मार्गावर ही फार च मोठी प्रगति आहे, असें मी समजतों. ताबडतोब सगळे अहिंसावादी होतील अशी आपली अपेक्षा च नाहीं. सगळयांनीं आधीं विचार च करायला पाहिजे. आज तरुणांनीं हि हिंसेचा फेरविचार सुरू केला, ही च खरी प्रगति आहे. यापेक्षां ज्यास्त लवकर गांधींचा विचार फैलावणें शक्य नव्हतें. मी म्हणतो फैलावूं हि नये. सावकाश विचारपूर्वक च त्याचा स्वीकार झाला पाहिजे.

भारतवर्षीय परंपरा

ही विचारसरणी हिन्दुस्थानच्या पूर्वपरंपरेंतून निर्माण झाली आहे कीं नाहीं ? हिन्दुस्थानची मुख्य पूर्वपरंपरा पाहिली पाहिजे. हिन्दुस्थानांत परंपरेचे अनेक किरकोळ प्रवाह आहेत. मराठ्यांची, रजपुतांची, शिखांची अशा अनेक परंपरा आहेत. पण हिन्दुस्थानांतील अनेक धर्मांना, जातींना, भाषांना, प्रान्तांना एकत्र राखणारी जी परंपरा ती मुख्य परंपरा होय. तिच्यांतून हा अहिंसेचा विचार निर्माण झाला. त्या परंपरेचा अभिमान धरा. अशा रीतीनें नाझीवादाचा गुण सुद्धां या विचारांत उत्तम रीतीनें बसूं शकतो. जेलमध्यें मीं या परंपरेचा विचार केला. महाराष्ट्राचा व

हिन्दुस्थानचा विचार केला. थेट वेदकालापासून आजपर्यंतच्या सबंध हिन्दुस्थानच्या इतिहासांत ज्या ज्या व्यक्तींनीं क्रांति केली, त्यांचा विचार केला. त्या बाबत थोडें लिहिण्यास हि आरंभ केला होता. परशुराम आणि गृत्समद ह्यांविषयीं लिहिलें. आणि तितक्यांत आमची जेलमधून सुटका झाली. हिंदुस्थानच्या विशाल इतिहासांत विशिष्ट जातीची परंपरा इतकी किरकोळ ठरते, कीं तिचा निराळा विचार करण्याची गरज च नाहीं. हिन्दुस्थानची परंपरा एका महान वटवृक्षाची परंपरा आहे. त्या वटवृक्षाचा आश्रय घेण्याऐवजीं त्याच्या फांद्या कापून डोकें फोडून घेणें बुद्धिमत्तेचें लक्षण नाहीं. हिन्दुस्थानची परंपरा म्हणजे हिन्दु, मुसलमान, ख्रिस्ती, पारशी, शीख, बौद्ध, जैन, या सगळ्यांच्या शास्त्रकारांची व असंख्य साधु-संतांची परंपरा. ही परंपरा जर मी सोडीन तर आपल्या राष्ट्राचा तेजोवध करीन. याबद्दल माझी खात्री पटली. या अर्थानें नाझीवादांतील पूर्व-संस्कृतीच्या अभिमानाचा गुण निराळ्या स्वरूपांत गांधीवादांत आहे. पण तो इतक्या निराळ्या स्वरूपांत आहे कीं त्यांत नाझीवादांतील वंशाभिमानाचा दोष नाहीं. आमची पूर्वपरंपरा व्यापक आहे म्हणून तिचा अभिमान हि जवळ जवळ विश्वव्यापी आहे. म्हणून त्याला अभिमान देखील म्हणतां येत नाहीं. पूर्वींच्या सांस्कृतिक प्रयत्नांशीं अनुसंधान राखणें, हें च त्याचें मुख्य लक्षण आहे.

**गरिबांचा उद्धार गरिबांच्या च द्वारें**

गरीब लोकांचा 'उद्धार' आम्हीं उच्च वर्गीयांनीं केला पाहिजे ही भाषा खोटी आहे. गरिबांचा उद्धार करणारा, त्यांना वर काढणारा, मी वेगळा आहें अशी भावना त्यांत आहे. मीं जर वर काढलें नाहीं तर ते वर येऊं शकणार नाहींत असा खोटा अभिमान त्यांत आहे. गरीब लोकांचा उद्धार गरिबांच्या हातांत आहे. आम जनतेला अशी शक्ति गांधींनीं दिली. गरिबांचा उद्धार गरिबांच्या द्वारां च झाला पाहिजे. हें साम्यवादांतलें सार आहे. तें आपण स्वीकारूं. पौष्टिक वस्तूंतलें देखील सार तेवढें आपण घेतों. बदामाचा व दुधाचा देहाला उपयोगी तेवढा अंश आपण घेतों. साम्यवादाच्या बाबतींत हि सारासार विचार करायला हवा.

गरिबांचा उद्धार गरिबांनीं च केला पाहिजे. हा त्यांतला सारभूत अंश आपण घेऊं; निःसार अंश फेकून देऊं.

**साम्यवादाच्या प्रक्रियेंतील त्याज्य अंश**

साम्यवादाच्या प्रक्रियेंत हिंसेच्या द्वारा क्रान्ति करण्याची शिकवण आहे. हा तिचा निःसार अंश होय. हिंसेची शक्ति जनतेची शक्ति होऊं शकत नाहीं. जशी विद्वत्ता ही आम जनतेची शक्ति नव्हे. ती तर मूठभर पंडितांची शक्ति. ती त्यांच्या च किल्लीकुलपांत बंद असायची. तशी तलवार हि आम जनतेची शक्ति नव्हे. म्हातारे, बायका, मुलें, अशक्त यांची ती शक्ति नव्हे. बत्तीस इंची किंवा चौतीस इंची छातीच्या धिप्पाड प्राण्यांची ती शक्ति आहे. इतक्या रुंद छातीचे उंच प्राणी नेहमीं सज्जन च असतात असें नाहीं. शिवाय त्यांची ती शक्ति कायमची राहणारी हि नाहीं. जें हिंसेच्या शक्तीनें मिळविलें तें टिकविण्यांकरितां सतत हिंसा च करावी लागेल, म्हणून गरिबांची, आम जनतेची, ती शक्ति होऊं शकत नाहीं.

**सारांश**

साम्यवादाचें सार गरिबांना स्वतःचा उद्धार करण्यास समर्थ बनविण्याची ही कळकळ ती आपण घेतली. निःसार वस्तु टाकून दिली. नाझीवादांतील सदंश पूर्वपरंपरेचा अभिमान तो हि घेतला. पण आपल्या अभिमानाला अभिमान हा शब्द च लागू नाहीं. इतका तो व्यापक आहे. जीं राष्ट्रें एकरंगी आहेत त्यांचा देशाभिमान संकुचित असतो. हिन्दुस्थानची परंपरा मिश्र व व्यापक आहे. व्यापक भारताच्या, या महामानव-समुद्राच्या, मिश्र-परंपरेचा अभिमान संकुचित होऊं च शकत नाहीं. तो निष्कलंक आहे. तेव्हां व्यापक भारताचा अभिमान व गरीब लोकांची शक्ति प्रकट करणें हे दोन गुण दोन वादांतून घेणारा तिसरा वाद मी तुम्हांला शक्य तितक्या तटस्थपणें सांगितला.

'शक्य तितक्या' म्हणण्याचें कारण, एका अर्थानें मी सुद्धां पक्षपाती आहें. मला तो वाद पटला, माझ्या जीवनांत उतरला, म्हणजे मी त्याचा झालों, तरी पण मला तो जितक्या तटस्थतेनें मांडतां आला तितका मी

मांडला. माझें पहिलें सूत्र लक्षांत ठेवा. मी म्हणतों म्हणून किंवा गांधी म्हणतात म्हणून तो स्वीकारूं नका. व्यापक बुद्धीनें व तटस्थ विचार करा.

अहिंसा ही शक्ति कशी ?

हिंसा ही जनतेची शक्ति नव्हे हें दाखविलें. आतां, अहिंसा ही शक्ति कशी ? हें दाखवायचें राहिलें. म्हणजे अहिंसेला सामाजिक स्वरूप कसें देतां येईल हें दाखवायचें राहिलें. आतांपर्यंत आपल्याकडें व जगांत एका एका व्यक्तीनें अहिंसेच्या बळावर जय मिळविल्याचीं उदाहरणें आढळतील. एकनाथ महाराज, येशू ख्रिस्त, सॉक्रेटिस यांनीं अहिंसेच्या चिवटपणाचें सामर्थ्य दाखविलें.

प्रयोगाची प्रक्रिया

प्रयोगाची प्रक्रिया अशी च असते. विज्ञानांत देखील प्रयोग-शाळेंत एक एक व्यक्ति प्रयोग करते. तो सिद्ध झाल्यावर त्याचा व्यापक प्रयोग, अथवा सामाजिक विनियोग होतो. वाफेच्या शक्तीचा शोध वैयक्तिक प्रयोगानें लागला. नंतर समाजांत त्याचा विनियोग झाला. तो शोध व्यक्तीपुरता च राहिला असता तर फुकट गेला असता. अहिंसेंत व्यक्तिगत प्रयोग देखील फुकट जात नाहीं. अहिंसेची शक्ति व्यक्तिगत असली तरी ती कार्य करते. ती सामाजिक केली तर फार मोठें कार्य करते.

एक शंका

एक शंका विचारण्यांत येते. "सगळा समाज एकनाथ, बुद्ध किंवा ख्रिस्त बनूं शकतो काय ?" बनूं शकला असता तर तुमच्या समोर योजना च मांडाव्या लागल्या नसत्या. तुम्हीं आम्ही सामान्य माणसें हि त्यांच्या प्रयोगाचा उपयोग करूं शकतों. त्याला त्यांच्या इतकी शक्ति नको. गुरुत्वाकर्षणाचा शोध करायला न्यूटनला बुद्धि लागते. पण तो वापरायला मिस्त्रीला तशी बुद्धि लागत नाहीं. हिटलर हि आपल्या क्षेत्रांत अद्वितीय आहे. तो नवीं नवीं शस्त्रास्त्रें शोधून काढतो. पण त्याच्या शास्त्रज्ञांना जी बुद्धि लागते, ती तीं शस्त्रें वापरणाऱ्या शिपायाला लागत नाहीं.

प्रथम शोध करणारे अद्भुत असावे च लागतात. पण सामाजिक प्रयोगांकरितां अद्भुत शक्तीची जरूर नाहीं. गांधींना अलौकिक शक्तीची गरज असेल. पण त्या शक्तीचा सामाजिक प्रयोग करण्याकरितां अलौकिक शक्तीची जरूर नाहीं.

**प्रथम शोधकांची विशेषता**

गुण्य-गुणकाचें उदाहरण घ्या. तकली अगदीं लहान आहे. तिच्यावर चाळीस च तार निघतील. पण ती चाळीस कोटि हातांनीं वापरली तर चाळीस कोटी गुणिले चाळीस इतके तार होतील. तशी अहिंसा आहे. तकलीप्रमाणें ती साधी, सुटसुटीत सोईस्कर आहे. म्हातारे, मुलें, बाया, दुर्बळ सर्व ती वापरूं शकतात. आम्हीं चाळीस कोटि लोक म्हणजे अहिंसेच्या प्रयोगाच्या तकल्या च समजा. आम्हीं एक एक तोळा अहिंसक शक्ति मिळवली तरी समाजाला ख्रिस्ताच्या अहिंसेपेक्षां ज्यास्त उपयोगी ठरेल. शेताला एका च ठिकाणीं खंडोंगणती खत दिलें तर चालत नाहीं. एक एक इंच च खत शेतभर दिलें आणि तें मुरलें तर ज्यास्त उपयोगी ठरतें. आपण सर्वांनीं थोडी थोडी अहिंसेची शक्ति मिळवली तर हिमालयापेक्षां उंच कार्य होईल. ख्रिस्तासारख्याच्या खंडोगणती अहिंसेपेक्षां ज्यास्त परिणाम होईल.

**सामाजिक प्रयोगाची थोरवी**

---

## १२ समाजवादाचें स्व-रूप

समाज-वादाची मूलभूत कल्पना नवीन नाहीं. अपरिग्रहाच्या आणि यज्ञाच्या योजनेंत तिचा संपूर्ण समावेश केला आहे. समाज प्रवाहात्मक आणि नित्य आहे. ह्या पूर्वसिद्ध सामाजिक प्रवाहाचें ऋण घेऊन व्यक्ति जन्मास येते. समाजापासून मिळालेल्या सेवा-दानाची परतफेड करणें व्यक्तीचें जीवित-कर्तव्य आहे. परतफेड करण्यांत दुसऱ्या कोणावर उपकार

होत नाहीं. आपली च ऋण-मुक्तता होते. ऋणमुक्ततेची संपूर्णता म्हणजे च मोक्ष. 'माझा मी' म्हणून स्वार्थ-बद्ध होण्यांत मनुष्य विनाकारण संकोचून लहान होतो. त्या ऐवजीं माझें कांहीं च नाहीं, जें आहे तें सर्वांचें आहे असें मानण्यांत कल्पना विशाल होऊन खरी श्रीमंती लाभते. देहाच्या अवयवानें देहाला भिण्याचें कारण नाहीं. समाज-वादांतला हा मुख्य सत्वांश आहे.

त्याबरोबर संपूर्ण मानवेतिहासाची अर्थ-मूलकता, वर्गविग्रहाची अपरिहार्यता इत्यादि अवांतर कल्पना-जाल हि त्या भोंवतीं उभें केलें गेलें आहे. अर्थ-मूलकता पहायची, तर काम-मूलकता हि पाहतां येईल. अर्थ-प्रेरणा आणि काम-प्रेरणा मानवांत नाहींत असें कोणी म्हणत नाहीं. पण ही मानवता नव्हे. आणि मानवांतील 'अंतर-तर' प्रेरणा वेगळी च आहे, असें आम्हांला वाटतें. पण तें सिद्ध करायचें तर आम्हीं आमचें व्यक्तित्व प्रेम-पूर्वक समाजार्पण केलें पाहिजे. 'समाज' ह्या कोटीचा हि संकोच न करतां त्यांत सर्व भूतमात्रांचा यथासंभव समावेश करावयाचा आहे, हें हि विसरायचें नाहीं. इतकें सर्व लक्षांत घेतलें म्हणजे अहिंसेशिवाय गति च उरत नाहीं.

---

# १३ नित्ययज्ञाची गरज

हल्लींच्या काळांत राष्ट्रीय जागृतीच्या ज्या कांहीं नवीन कल्पना निघाल्या, त्यांतली अत्यंत स्फूर्तिदायक अशी कल्पना मला नित्ययज्ञाची वाटते. गरिबांशीं अनुसंधान राखण्याची, राष्ट्रासाठीं कांहीं निर्माण करण्याची. आणि निर्माण केलेलें राष्ट्राला अर्पण करण्याची ही कल्पना फार उज्ज्वल आहे. आजकाल आपण जी खादी काढतों, ती पन्नास लाखांच्या आसपास आहे. जोर मारला तर एखाद कोटपर्यंत काढूं शकूं असें बोललें जातें. परंतु हिंदुस्थानचा प्रश्न माणशीं पांच रुपयांचा कपडा धरला तरी, दोनशें कोटींचा आहे. त्या हिशेबानें आपल्या कार्याची गति फार च अल्प आहे. तिला वेग मिळत नाहीं, त्याचें मुख्य कारण नित्ययज्ञाच्या मा

कल्पनेच्या मुळाशीं असलेलें महान आध्यात्मिक तत्त्व आमच्या लक्षांत आलेलें नाहीं, हें आहे. कोणता हि सार्वजनिक प्रयोग जोंपर्यंत आपण त्याच्या थेट मुळाशीं जाऊन पोंचत नाहीं, तोंपर्यंत सार्वत्रिक होत नाहीं.

लोकांत नित्ययज्ञाच्या कल्पनेबाबत स्फूर्ति कां उत्पन्न होत नाहीं, याचा विचार करतां एक गोष्ट लक्षांत येते ती अशी : अति प्राचीन काळापासून कोणत्या हि उपायानें शक्य झाल्यास कर्मांतून मुक्त होऊन जाणें हें एक आध्यात्मिक तत्त्व च आम्हीं ठरवून टाकलें आहे. अंतिम ध्येय म्हणून तें बरोबर आहे. पण आम्हीं तें जणूं आमचें आचारसूत्र च बनविल्यासारखें आहे. आम्ही ध्यान करूं, भक्तीचा विचार करूं, ज्ञानचर्चा करूं; परंतु त्यासाठीं प्रत्यक्ष कार्यांतून अलग होऊन जाणें जरूर आहे, असें आम्हीं मानून घेतलें आहे. मध्ययुगीन संत आपापल्या रोजच्या कार्यांत तन्मय असत हें खरें; परंतु तें कार्य करण्यांत च त्यांना भक्तीचा किंवा आत्मज्ञानाचा अनुभव येत होता कीं काय, याबाबत निःशंकता नाहीं. भजनांतल्या आनंदाचा अनुभव च त्यांना आपल्या रोजच्या आजीविकेच्या उद्योगांत येत होता, कीं तो उद्योग एक प्राप्त कर्तव्य समजून ते करून टाकीत आणि त्यांतून मोकळे होऊन भजनाचा आनंद लुटीत ? मी जें पाहूं शकलों त्यावरून कार्यमग्न जरी ते असत, तरी त्यांची कर्मांहून वेगळी अशी उपासना होती, असें दिसतें. त्याबद्दल माझी तक्रार आहे असें नाही. पण माझा प्रश्न हा आहे, कीं मध्ययुगीन काळीं संतांच्या जीवनाची अशी स्थिति होती का, कीं चरखा, नांगर, किंवा असलें एखादें उपजीविकेचें औजार हें च त्यांचें उपासनेचें द्वार, तद्द्वारा होणाऱ्या क्रिया हीच त्यांच्या उपासनेची धार, त्यांत मग्न होणें हें च त्यांचें ध्यान, त्यांतून निघालेलें फलित समाजाला अर्पण करणें हें च भगवंताला समर्पण, त्यांत अनुभवलेली चित्ताची समता हा च योग ? हें सर्व त्यांच्या उपासनेच्या, भक्तीच्या, व्याख्येंत होतें का ? ज्या अष्ट सात्त्विक भावांची भाषा ते बोलत, ते भाव त्यांना त्यांच्या उपास्य मूर्तीच्या चिंतनांत किंवा कीर्तनांत उत्पन्न होत असत. परंतु त्यांचीं रोजचीं दैनिक कर्में च ते उपासनारूप मानीत असें निश्चित सांगतां येत नाहीं. "**कर्मेंच उपासना रूप करावी**" असें सांगणारीं वचनें हि

संतांच्या वाणींत आढळणारीं आहेत. पण सर्व संतांचा सामग्र्यानें विचार केला तर त्यांच्या एकूण जीवनप्रवाहांत तीं वचनें थोडीं गौण पडतात असें वाटतें. संभव आहे, संतांच्या विषयींचा हा समज चुकीचा असेल. परंतु आम लोकांच्या बाबतींत बोलायचें तर हें निश्चित म्हणतां येईल, कीं शेंकडों वर्षांपासून लोकांत ही च कल्पना रूढ आहे. कसें हि करून—मग तें निवृत्तीच्या नांवानें म्हणा किंवा भक्तीच्या नांवानें म्हणा—कर्म टाळणें ही च खरी भक्ति आणि हें च खरें ज्ञान. कर्म केल्याशिवाय तर सुटका च नाहीं. कारण, त्याशिवाय आजीविका चालणें कठिण आणि दुसऱ्यावर आपला भार हि पडतो. म्हणून कर्म करून टाकावें, इतकी च फार तर लोकांची उडी जाते. परंतु शेवटीं उपासना ही कर्माहून वेगळी असली पाहिजे, अशी लोकांची कल्पना. ज्यांची अशी कल्पना होती किंवा आहे, त्यांच्या विचारांत उणेपणा आहे, हें मला सांगायचें आहे. कर्म टाळणें, निदान थोडक्यांत करून मोकळें होणें, हा आध्यात्मिकतेचा आधार मानण्यांत, माझ्या मतें, विचारदोष आहे आणि त्यामुळें हानि झाली आहे. म्हणून आपल्याला जर राष्ट्र उद्योगशील व्हावें असें वाटत असेल, तर उद्योगशीलतेंत च खरी आध्यात्मिकता आहे, हा विचार जीवन उद्योगशील बनवून स्थिर केला पाहिजे. त्याचा स्वतः अनुभव घेतला पाहिजे आणि दुसऱ्यांना त्याची प्रेरणा देत राहिलें पाहिजे.

आतांपर्यंत जें खादीकार्य झालें त्यांत मला ह्या वस्तूची उणीव भासली आहे. चरखासंघानें आपल्या कार्यकर्त्यांकडून अशी अपेक्षा राखली आहे कीं, त्यांनीं रोज एक लट कांतावी. किंवा रोज एक न झाली, तर महिन्यांतून निदान तीस लटी तरी कांताव्या. त्यासाठीं प्रत्येक महिन्याच्या खादी-पत्रिकेंत ७॥ गुंडया किती जणांनीं कांतल्या, त्यापेक्षां कमी किती जणांनीं कांतलें, आणि मुळीं च न कांतणारे किती, याचे आंकडे दिले जातात. त्यांत मी पाहतों, कीं न कांतणारांची संख्या हि कमी नसते. न कांतणारे कदाचित असा विचार करीत असावेत, कीं "मजुरांनीं कांतलेलें ढीगच्या ढीग सूत आम्ही रोज तोलतों, त्याची मजुरी देतों, आणि एवढ्या ह्या ढिगांत आमच्या ७॥ गुंडयांची भर न पडली, तर काय मोठा फरक

पडणार आहे ?” परंतु गुणाकार हें दाखवून देईल, कीं थोडें थोडें म्हणून जें वाटतें, तें वास्तविक किती महान आहे. सुताचे ढीग पडले आहेत असें वाटतें, पण हिंदुस्थानची लोकसंख्या हि चाळीस कोट आहे ना ? त्यांना हे ढीग कमी च पडणार आहेत.

रोज स्वतः नियमित कांतण्यांतली विशेषता काय आहे, हें मंडळींच्या लक्षांत अजून आलेलें नाहीं. सर्वांसाठीं एक राष्ट्रीय उपासना सिद्ध करणें, ही महत्त्वाची वस्तु आहे. त्यानें आध्यात्मिक क्रांति होईल. आणि तद्द्वारा आर्थिक, राजकीय आणि सामाजिक क्रांति होईल. हें दर्शन त्यांना झालें तर ते अवश्य कांततील. ज्या दिवशीं कांतलें नसेल, त्या दिवशीं जेवण गोड वाटणार नाहीं. ही वस्तु आमचे लोक अजून पूर्णपणें समजले नाहींत, याबद्दल मला खेद होतो. कॉंग्रेसनें एके काळीं ठरविलें होतें, कीं जे लोक सूत कांतून देतील ते च कॉंग्रेसचे सभासद होऊं शकतील. परंतु हें फार दिवस चाललें नाहीं. आम्ही बोलतांना तर बोलतों, कीं श्रीमंतांची सत्ता जाऊन गरिबांची सत्ता आली पाहिजे, गरिबांचें राज्य झालें पाहिजे. परंतु ज्या वस्तूंत श्रमाची प्रतिष्ठा राहिली असती, म्हणजे च गरिबांची प्रतिष्ठा राहिली असती, ती वस्तु सोडून देऊन त्या ठिकाणीं चार आण्यांची म्हणजे च पैशाची, प्रतिष्ठा आम्हीं कायम केली. सभासदत्वासाठीं सूत कांतण्याची अट असती, तर कोण्या श्रीमंतानें एरवीं केवढे हि पैसे कॉंग्रेसला दिले असते, तरी तें दान समजलें गेलें असतें. पण त्यानें सूत कातून दिल्याशिवाय त्याला सभासद होतां आलें नसतें. ह्या एका च वस्तूनें समाजवादाचा जितका प्रचार झाला असता, तितका क्वचित च दुसऱ्या कोणत्या वस्तूनें झाला असता.

म्हणून माझें इथल्या विद्यार्थ्यांना सांगणें आहे कीं, तुम्ही रोज सूत कांता. हा नियम आपल्या जीवनाचा नियम समजा. जेवणाला एखाद्या वेळीं रजा देतां येईल; कारण, रोज जेवणें नेहमीं च कर्तव्य ठरत नाहीं. जेवण सोडण्याचे जितके प्रसंग कल्पितां येतील, तितके हा नियम तोडण्याचे खात्रीनें कल्पितां येणार नाहींत. ही वस्तु जर मंडळी समजून जातील, तर आपलें फार मोठें काम होईल. कारण, ही भावना जीवनांत दाखल

झाल्यावर तिचा प्रभाव जीवनाच्या प्रत्येक क्रियेवर होणार आहे. अर्धा तास नियमित कांतणें, मौनपूर्वक कांतणें, त्यांतल्या त्यांत कांतण्याचा वेळ हि शक्य तर निश्चित करणें, ह्या बाबी अशा आहेत, कीं त्यांनीं एकूण सर्व च जीवनाचें थोडेंफार नियंत्रण होईल. त्याचा आमच्या सत्त्वनिष्ठेवर चांगला परिणाम होईल, आणि तसा तो झाला म्हणजे आसपासच्या लोकांवर हि तो होणार च. मुलगा कांतूं लागला म्हणजे आईबापांवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय रहायचा नाहीं. तसा च तो त्याच्या मित्रांवर हि झाल्याशिवाय रहायचा नाहीं. असें हें आत्म्याच्या व्यापकतेचें सूत्र आहे.

---

# १४ वैराग्ययुक्त निष्काम बळ

माझ्या बाळगोपाळांनो,

तुमचे खेळ पाहून आनंद झाला. तुम्हां बाळगोपाळांचे हातीं देशाचें भवितव्य आहे. तुम्हीं जे खेळ खेळलांत ते कशासाठीं? शक्ति मिळविण्यासाठीं. शक्ति कशासाठीं? गरीब लोकांच्या रक्षणासाठीं. गरिबांच्या उपयोगीं पडतां यावें म्हणून. शरीर सुदृढ करावयाचें तें झिजविण्यासाठीं. चाकूला धार कशासाठीं द्यावयाची? तो गंजून जावा म्हणून नाहीं, तर तो कामाला यावा म्हणून. शरीराला धार द्यावयाची, शरीर चपळ व काटक बनवावयाचें. हेतु हा कीं, पुढें तें दुसऱ्याच्या सेवेंत चंदनासारखें झिजवितां यावें. बळ हें सेवेसाठीं आहे.

"**वैराग्ययुक्त निष्काम बळवंतांत मी बळ**" असें गीतेंत भगवंतांनीं सांगितलें आहे. शब्द नीट लक्षांत ठेवा. नुसतें बळ नव्हे. वैराग्ययुक्त निष्काम बळ! अशा वैराग्ययुक्त निष्काम बळाची मूर्ति च आपण व्यायाम शाळांतून ठेवीत असतों. कोणती ती मूर्ति? हनुमंताची

---

[ मागें खानदेशांतील दौऱ्याचे प्रसंगीं धुळें येथील विजय व्यायाम शाळेंत विनोबांनीं दिलेल्या प्रवचनापैकीं मुख्य भाग दिला आहे. ]

पवित्र व सामर्थ्यवान् मूर्ति ? हनुमंत वैराग्ययुक्त निष्काम बळाचा पुतळा होता. म्हणून वाल्मीकीनें त्याचे पोवाडे गाइले. रावण हि महा बलवान होता. परंतु रावणाजवळ वैराग्य नव्हतें, रावणाचें बळ हें भोगासाठीं होतें. दुसऱ्यास छळावयासाठीं होतें. रावण पर्वत उचली, वज्र मोडी. दहा माणसांचें बळ जणूं त्याच्या एकट्याच्या अंगीं. म्हणून त्याला दहा तोंडें व वीस हात दाखविण्यांत आले. इतका बलवान असून त्याचें बळ धुळींत मिळालें. मारुतीचें बळ अजरामर झालें आहे. बळाच्या ह्या दोन मूर्ति, दोन चित्रें वाल्मिकीनें उभीं केलीं आहेत. रावणाच्या बळांत भोगवासना होती. रावण बळानें भोग मिळवूं पहात होता. मारुति बळानें सेवा करूं पहात होता. सेवेला वाहिलेलें बळ टिकेल, अमर होईल. भोगाला वाहिलेलें धुळींत मिळेल. स्वतःच्या व जगाच्या नाशास कारणीभूत होईल.

समुद्राच्या तीरावर सारे वानर बसले होते. लंकेंत कोण जाईल, याची चर्चा चालली होती. मारुति एकीकडे राम राम जपत बसला होता. जांबुवंत मारुतीजवळ जाऊन म्हणाला, "मारुते, तूं जाशील ?" मारुति म्हणाला, "तुमच्या आशीर्वादानें जाईन." तो एकटा वानर कोणत्या बळाच्या जोरावर त्या बलवान राक्षसांमध्यें निर्भयपणें गेला ? मारुतीला जेव्हां असा प्रश्न विचारण्यांत आला, तेव्हां त्यानें काय उत्तर दिलें ? मी माझ्या मनगटाच्या जोरावर आलों, बाहुबळावर आलों, असें का त्यानें उत्तर दिलें ? मारुति म्हणाला, "मी रामाच्या बळावर येथें आलों. माझ्या मनगटांत जोर आहे कीं नाहीं मला माहित नाहीं. परंतु रामाचें बळ मात्र माझ्याजवळ आहे." आणि मनगटाचा जोर म्हणजे तरी काय ? खोल विचार करून पहा. मनगटाचा जोर म्हणजे शारीरिक परिश्रम करण्याचा जोर. त्यासाठीं हे हात आहेत. सेवेसाठीं आपण हस्तवान आहोंत. पशूंला हात नाहींत. मनगटाचा जोर वापरून अन्न निर्माण करावयाचें, सेवा करावयाची. मनगटांतील ही जी सेवा करण्याची शक्ति आहे, ती कोणाची ? मारुति ओळखीत होता कीं, ही आत्म्याची शक्ति आहे. रामाची शक्ति आहे.

ज्या बळाची आत्म्यावर श्रद्धा नाहीं, रामावर श्रद्धा नाहीं, तें बळ कुचकामाचें असतें. अमृतसर येथें कत्तल झाली व त्यानंतर लोकांचा

तेजोभंग करण्यासाठीं, डायरनें त्यांना रस्त्यांतून सरपटत जावयास लावलें. पहाडासारखे पंजाबी लोक, ताकदवान व मजबूत अशीं त्यांचीं तीं शरीरें, परंतु तीं सरपटत जाऊं लागलीं. कारण रामावर श्रद्धा नव्हती. आत्म्याची निर्भयता त्यांना माहीत नव्हती. आज बंगालमध्यें अशा च प्रकारची कहाणी आहे. लोकांवर वाटेल तीं बंधनें घालण्यांत येत आहेत. रस्त्यांतून लष्कर चाललें कीं सलाम करायला यावें लागत आहे. कारण काय ? आत्म्याची निर्भयता पटली नाहीं. रामाचें बळ ज्यानें ओळखलें तो कळिकाळाला भीत नसतो. केवळ बळ निराधार आहे, बळ आत्मश्रद्धेवर सुप्रतिष्ठित असलें पाहिजे. निर्बळांत हि आत्मश्रद्धेनें बळ उत्पन्न होतें. जो निष्ठावंत आहे, ज्याच्याजवळ श्रद्धेचें बळ आहे, तो इतर शंभरांना हलवील असें उपनिषद् सांगत आहे. म्हणून आध्यात्मिक बळाची उपासना हवी.

हनुमंताच्या ठिकाणीं केवळ पशूचें बळ नव्हतें. मारुतीचा जो श्लोक* आहे, त्यांत बाकीच्या सर्व बळांचें वर्णन आहे. परंतु अंगबळाचें वर्णन कोठें च नाहीं. मारुति मनासारखा व वाऱ्यासारखा वेगवान होता, तो जितेंद्रिय होता, तो अत्यंत बुद्धिमान होता, तो नायक होता, तो रामदूत होता, असें सारें वर्णन आहे. बळाची देवता मारुति ! परंतु या स्तुतींत बळाचा उल्लेख हि नाहीं हें आश्चर्य नव्हे काय ? परंतु हे गुण म्हणजे च खरें बळ. हे गुण म्हणजे च खरी कार्यशक्ति.

मनुष्याच्या अंगांत वेग पाहिजे, स्फूर्ति पाहिजे, मनासारखा वेग पाहिजे. काम समोर दिसतां च ताडकन् आनंदानें उडी मारली पाहिजे. सिंहगड जिंकावयाचा निरोप येतां च निघाला तानाजी ! नाहीं तर मनांत सेवा आहे व शरीर तर जागचें हालत नाहीं. तें आळसांत लोळत आहे. त्याचा काय उपयोग ? ज्ञानदेवांनीं मोठें सुंदर वर्णन केलें आहे. सेवा करणारा कसा पाहिजे ? ते सांगतात—

**" आंग मनापुढें घे दौडा "**

मनांत आलें नाहीं तों च तें करावयास शरीर दौडत गेलें पाहिजे.

---

* मनोजवं मारुततुल्यवेगम् । जितेंद्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ।
वातात्मजं वानरयूथमुख्यम् । श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ॥

अंगांत असा वेग असावयास जितेंद्रियत्व पाहिजे. संयम पाहिजे. संयमाशिवाय वेग साधणार नाहीं. पण वेग आणि संयम दोन्ही असून बुद्धि अपुरी पडली तरी चालणार नाहीं. म्हणून त्याबरोबर बुद्धि पाहिजे. कर्म-कुशलता, कल्पनाशक्ति, प्रतिभा पाहिजे. सांगकाम्ये असून चालणार नाहीं. आणि इतक्यावर पुनः रामाच्या सेवेची भावना हवी. राम जेथें जा म्हणून सांगेल तेथें जाण्यास अहोरात्र तयार !

हिंदुस्थानांतील कोटयवधि देव तुमची सेवा मागत आहेत. तुमच्या सेवेची त्यांना जरूर आहे. या सेवेसाठीं तयार व्हा. वेगवान, बुद्धिमान, संयमी, सेवेची हौस असलेले असे तरुण बना. शारीरिक बळ मिळवा व प्रेम मिळवा. मघां येथील व्यायामशाळेच्या हौदांत मीं कुस्त्या पाहिल्या. त्यांत एक कुस्ती हरिजन व ब्राह्मण यांच्यांत झाली. मला त्यांत समभाव दिसून आला. या च समभावानें जर आपण पुढें वागलों तर समाज बलवान होईल. या च समभावाचें पोषण केलें, तर जे खेळ खेळलांत, ज्या कुस्त्या केल्यात, त्यांतून कल्याण निर्माण होईल.

खेळांत आपण समभाव शिकतों. शिस्त, व्यवस्था याचें महत्त्व शिकतों. या खेळांशिवाय दुसरेहि चांगले खेळ खेळतां येतील. शेत खणणें हा सुद्धां एक खेळ च. एकदम खणत्या (कुदळी) वर जात आहेत, एकदम जमीनींत घुसत आहेत. मजा दिसेल. त्या खेळांत नमुनेदार व्यायाम होईल. त्यांत बुद्धीला सुद्धां अवसर आहे. व्यायामांत बुद्धीला हि चालना मिळाव-यास हवी. म्हणून व्यायाम सुद्धां कांहींतरी निर्माण करणारा असावा असें मला वाटतें.

येथील खेळांनीं शक्ति व प्रेम दोन्ही हि तुमच्यांत उत्पन्न होवोत. सर्व प्रकारचीं सर्व जातींचीं मुलें एकत्र येतात, खेळतात. त्यामुळें प्रेमाचा विकास होतो. त्या आठवणी पुढच्या जीवनांत उपयुक्त होतात. आपण बरोबर खेळलों, एकत्र कुस्ती केली, एकत्र पोहलों, एकत्र सामर्थ्य मिळविलें, ज्ञान मिळविलें, इत्यादि आठवणींनीं पुढें एकत्र याल. संघशक्ति व सहकार्य वाढेल.

हे तुम्ही गणवेष घातले आहेत. यांचा उद्देश हि आत्मीयता वाढावी हा च आहे. परंतु हा पोषाख खादीचा च करा. ते पट्टे जे वापराल ते मेलेल्या

जनावरांच्या चामड्याचे च वापरा. सर्वत्र दक्षता ठेविली पाहिजे. थेंबें थेंबें तळें साचें. राष्ट्राला सर्वत्र भोंकें पडलीं आहेत. सारखी संपत्ति बाहेर जात आहे. इकडे लक्ष ठेवा.

व्यायाम केला व दूध आणि भाकर नसेल तर कसें होणार! तुम्हांला दूध पाहिजे असेल तर गोरक्षण झाले पाहिजे. गोरक्षणासाठीं मृत गायी-बैलांच्या चामड्याच्या च वस्तु वापरल्या पाहिजेत. भाकर पाहिजे म्हणून शेतकरी जगवला पाहिजे. खादी घेऊन त्यांना थोडी मदत करूं तर ते जगतील, व आपणाला भाकर मिळेल. तुम्हांला जर घरीं भाकर न मिळती तर येथें किती उड्या मारल्या असत्या? घरीं भाकर तयार आहे ही खात्री आहे म्हणून उड्या मारल्यात. उड्या मारण्याची शक्ति अन्न देतें. म्हणून उपनिषद् सांगतें "**अन्नं वाव बलाद् भूयः**"-अन्न हें बळाहून श्रेष्ठ आहे. राष्ट्रांत जर अन्न नसेल तर बळ कोठून येणार? आधीं अन्नाची सोय व मग आखाडे, आधीं अन्नाची सोय व मग ज्ञान-दान. एकदां भगवान् बुद्धांचा एक प्रचारक हिंडत होता. त्याला एक भिकारी आढळला. तो प्रचारक त्याला धर्माचा उपदेश करूं लागला. परंतु भिकारी लक्ष देईना. त्याचें लक्ष लागेना. तो प्रचारक रागावला. बुद्धाकडे जाऊन तो म्हणाला "तेथें एक भिकारी आहे. त्याला मी इतकें चांगलें सांगत होतों, तरी तो ऐकत नाहीं." बुद्ध म्हणाले, 'त्याला माझ्याकडे आण.' तो प्रचारक त्या भिकाऱ्याला बुद्धाकडे घेऊन आला. भगवान् बुद्धांनीं त्याची स्थिति पाहिली. तो भिकारी उपाशी आहे हें त्यांनीं ओळखलें. त्यांनीं त्या भिकाऱ्याला पोटभर जेऊं घातलें, व सांगितलें 'आतां जा.' तो प्रचारक म्हणाला, 'तुम्हीं त्याला जेऊं खाऊं घातलें, परंतु उपदेश तर कांहीं च दिला नाहीं!' भगवान् बुद्ध म्हणाले, 'आज अन्न दिलें हाच त्याला उपदेश होय. आज त्याला अन्नाची सर्वांत जरूरी होती. तें त्याला आधीं दिलें. तो जगेल तर उद्यां ऐकेल.'

आपल्या राष्ट्राची आज अशी च स्थिति आहे. आज राष्ट्रांत अन्न च नाहीं. रामदासांच्या वेळीं अन्न भरपूर होतें. हिंदुस्थानांतील संपत्तीचा झरा आजच्या सारखा त्या वेळीं आटला नव्हता. म्हणून त्यांनीं प्राणाची, बळाची उपासना शिकविली. आज खेड्यांत केवळ आखाडे काढून भागणार नाहीं.

अन्नोत्पत्ति व गोसेवा या दोन गोष्टी राष्ट्रांत असतील तर च राष्ट्राचें संवर्धन होईल. बलवान तरुणांनीं राष्ट्रांत अन्न व दूध भरपूर करावयाचें आहे. हिंदुस्थान पुन्हां गोकुळ करावयाचें आहे. त्यासाठीं आज खादीची विजार घालून व मेलेल्या–मारलेल्या नव्हे–गायी बैलांच्या चामडयाचा पट्टा घालून अन्नोत्पत्तीस व गोपालनास मदत करा.

तुम्हीं खाकी पोषाख करतां. परंतु तो पोषाख करून गरिबांच्या पोटावर पाय नका देऊं! गरिबांचें संरक्षण करण्यासाठीं कवायती करणार, परंतु ते गरीब जगले तर त्यांचें रक्षण करणार ना? तूं खाकी वापरून बाहेर पैसे पाठवणार, तिकडे गरीब मारणार! मग संरक्षण कोणाचें करणार? तूं पैसे पाठविणार परदेशीं आणि खेडयांतील लोकांजवळ दूध व भाकर मागणार? ते कोठून देतील बाबा तुला! म्हणून खाकी वापरायची च असेल, तर खाकी खादी वापरा. आणि खाकी खादी न मिळाली तर नुसती खादीच वापरा. खाकी सोडा. खाकी वांचून कांहीं अडलें तर नाहीं च.

सर्व धर्मांविषयीं उदार भावना असूं दे. जो खरा मातृभक्त आहे, तो सर्व मातांना पूज्य मानील. स्वतःच्या गाईची तो सेवा करील, परंतु दुसऱ्याच्या आईचा हि आदर करील. प्रत्येकजण आईच्या दुधावर पोसला जातो. धर्म हा मातेसारखा आहे, मला माझी धर्ममाता प्रिय आहे. मी मातृपूजक आहें, म्हणून दुसऱ्याच्या आईची निंदा तर नाहीं च करणरा उलट त्या मातेला हि वंदन करीन.

मनांत हा भाव उत्पन्न होण्यास भक्ति लागते. मनांत खरी भक्ति जागृत झाली कीं, हें सारें होईल. म्हणून बाहेरच्या कसरतीबरोबर आंत उपासना हवी. कसरतीनें शरीर चपळ व सुभग करून आत्म्याच्या हातांत द्यावयाचें. शरीर हें आत्म्याच्या हातांतील हत्यार आहे. हत्यार चांगलें उपयोगीं पडावें म्हणून स्वच्छ पाहिजे. शरीर स्वच्छ करून आत्म्याच्या हवालीं करा. अंतर्बाह्य शुचि व्हा. जसा हा मारुति आहे. बलवान व भक्तिवान असा सेवेसाठीं सदोदित उभा आहे. तुम्ही वयानें तरुण असाल परंतु शरीर जर सेवेसाठीं झटकन उठत नसेल, तर तुम्ही म्हातारे च. ज्यांच्या

अंगांत वेग आहे तो तरुण. मग त्याचें वय कांहीं हि असो. मारुति कधीं च म्हातारा नाहीं. तो चिरतरुण आहे, चिरंजीव आहे.

असे चिरतरुण तुम्ही व्हा. तुम्हांला दीर्घायुष्य लाभून वयानें म्हातार-पण येईल त्या वेळेस हि तरुण असा. वेग कायम ठेवा, बुद्धि शाबूत ठेवा. अशा प्रकारें तन्मयबुद्धीनें जनतेची व तद्द्वारा परमेश्वराची सेवा करावयास तरुण लागोत अशी परमेश्वराची मी प्रार्थना करितों.

---

# १५ राष्ट्रासाठीं त्याग–किती व कां?

मित्रांनो, या ठिकाणीं धुळ्यांत आल्यावर घरीं आल्यासारखें च मला वाटतें. कारण, कांहीं कळकळीचीं काम करणारीं माणसें, शुद्ध हृदयांचीं माणसें, या ठिकाणीं आहेत. पण हें एक कारण झालें. दुसरें हि एक कारण आहे. तीन वर्षांपूर्वीं मी येथें आलों होतों. येथील जेलमध्यें सहा महिने रहावयास सांपडलें होतें. जेल हें आमच्यासारख्यांचें घर च आहे. सहा महिने येथें राहिलों तो काळ फार आनंदाचा गेला. जेवढे लोक त्या ठिकाणीं होते त्या सर्वांना वाटलें कीं आयुष्यांतील कोणते हि सहा महिने असे गेले नसतील.

धुळ्याला मीं पुष्कळ संस्था पाहिल्या. इतक्या भरीव काम करणाऱ्या संस्था ज्या शहरास लाभल्या आहेत अशीं शहरें आमच्या देशांत थोडीं च आहेत. संपत्ति आहे एवढ्यानें च संस्था चालत नाहीं. संस्था चालविण्या-साठीं विशेष मनोवृत्ति लागते. ती मनोवृत्ति येथें थोडी फार आहे. त्या वृत्तीचें नांव काय? मीं विचार करून तिला गुणारोपणवृत्ति असें नांव दिलें आहे. ज्याप्रमाणें दोषदृष्टीचा मनुष्य सहज च दुसऱ्यावर दोषारोपण करतो व ते दोष त्याच्या ठिकाणीं नाहींत असें सिद्ध होतें तेव्हां च नाईलाजानें तें खरें मानतो, त्याच्या उलट ही गुणारोपणवृत्ति आहे. जोंपर्यंत विरुद्ध सिद्ध

---

[विनोबांनीं १९३३–३४च्या सुमारास धुळें येथें दिलेल्या प्रवचनाचा मुख्य अंश.]

होत नाहीं तोंपर्यंत माणसाला गुणसंपन्न समजावयाचें. अशी गुणारोपणवृत्ति असल्याशिवाय संस्था चालणार नाहींत. वस्तुतः 'आस्तिकता' जिला म्हणतात ती ही च आहे.

आपण घरांत एकमेकांना सांभाळतों, त्याप्रमाणें राष्ट्राच्या कारभारांत हि झालें पाहिजे. दोष पोटांत घालून गुणावर जोर दिला पाहिजे. घरच्या कारभारांत जी वृत्ति आपण उपयोगी मानतों ती सामाजिक व्यवहारांत वावगी कशी होईल? घरांत उदारता, प्रेम, सहानुभूति व सहकार पाहिजेत. सामाजिक व्यवहारांत हि ते च गुण पाहिजेत. जो न्याय कुटुंबांत तो च बाहेर. ज्या रीतीनें व ज्या वृत्तीनें कुटुंबाचे प्रश्न आपण सोडवतों त्या च रीतीनें व त्या च वृत्तीनें देशाचे व जगाचे प्रश्न सोडवावयाचे असतात. ह्यासाठीं गुणारोपणवृत्तीची फार जरूर असते. ही वृत्ति धुळेकरांजवळ थोडीफार आहे. त्यामुळें येथें थोड्याफार संस्था चालल्या आहेत. तरी मला हें कबूल करावयास पाहिजे कीं एवढयानें माझें समाधान होत नाहीं.

महात्मा गांधींवर एक आक्षेप सरळ मनानें पुष्कळजण घेत असतात. महात्मा गांधी हे लोकांपासून फार अपेक्षा करतात, त्यांना मनुष्यस्वभावाचें नीट ज्ञान नाहीं, ते मनुष्याच्या शक्तीच्या बाहेर त्यागाची मागणी करतात, पुढाऱ्यानें जनतेला शक्तीबाहेर ताणूं नये, शक्तीपेक्षां अधिक त्यागाची अपेक्षा करूं नये वगैरे लोक म्हणत असतात. असें बोलणें गैर आहे असें मी म्हणत नाहीं. सरळ वाटतें तसें तुम्ही बोलतां. परंतु हें थोडें सूक्ष्मपणें पाहिलें पाहिजे.

मनुष्य किती त्याग करूं शकतो हें कुटुंबांत लक्षांत येतें. मनुष्य कुटुंबासाठीं अगदीं शेवटच्या टोकाचा–आत्यंतिक–त्याग करीत असतो असें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां दिसून येतें. आत्यंतिक उदाहरणें सोडून दिलीं तरी सामान्यतः कुटुंब कांहीं ठराविक त्याग प्रत्येकापासून मागतें च. पिढयानपिढया चालत आलेले कुळधर्म नीट चालावयाचे असतील, जो गुणसंचय पूर्वजांपासून आपणांस मिळाला त्याचा विकास करावयाचा असेल, तर जितका त्याग कुटुंबांत करावा लागेल, त्या मानानें गांधी जो त्याग मागतात तो कांहीं च नाहीं. तुम्ही जरा खोल जाऊन पहा म्हणजे

कुटुंबासाठीं तुम्ही किती करतां व त्या मानानें राष्ट्रासाठीं गांधी किती मागतात तें दिसून येईल.

परंतु हें खोल जाऊन पाहणें दरेकास कदाचित शक्य होणार नाहीं. हें निरीक्षण कठिण म्हणून सोडून देऊं. सूक्ष्म निरीक्षण दूर ठेवूं. आपण व्यापक दृष्टीनें पाहूं. आपण पांच हजार मैल दूर जाऊन पाहूं व तसें च पांच हजार वर्षे मागें जाऊन पाहूं.

आपण प्रथम दूर जाऊं. २० वर्षांपूर्वी युरोपांत महायुद्ध सुरू झालें. हें महायुद्ध ४ वर्षे चाललें. अत्यंत हिशेबी व व्यवहारी डोक्याच्या माणसांनीं हें युद्ध चालविलें. तें युद्ध शंकराचार्यांच्या शिष्यांनीं अद्वैत स्थापण्यासाठीं निर्माण केलें नव्हतें. तर सकाम व स्वार्थप्रिय लोकांची ती उचल होती. अशा त्या युद्धाच्या वेळीं, जर्मनींतील लोकसंख्या ६ कोटि धरा, जर्मनीनें जवळ जवळ एक कोटि शिपाई उभा केला. ह्याचा अर्थ असा कीं हिन्दुस्थानांतील लोकांनीं ३६ कोटींतून सहावा हिस्सा म्हणजे ६ कोटी लोक कायदेभंगाच्या लढाईंत उभे केले असते तरी तो त्याग मनुष्यस्वभावाच्या, मनुष्यशक्तीच्या, बाहेरचा झाला नसता.

हिंदुस्थानांत जें आपण कायदेभंगाचें युद्ध केलें त्याचा आढावा काढला तर ज्यास्तींत ज्यास्त दीड लाख लोक त्यांत सामील झाले होते असें म्हणतां येईल. परंतु जर्मनीच्या मानानें पहावयाचें म्हणजे सहा कोटि लोक उभे रहावयास पाहिजे होते. महात्माजींच्या झेंड्याखालीं दीड लाख सामील झाले. हा जो त्याग आम्हीं केला तो मनुष्यशक्तीच्या पलीकडचा आहे ?

जर्मनीच्या त्यागाच्या मानानें आम्हीं त्याग केला तो कांहीं च नाहीं. तुलना हि होऊं शकणार नाहीं. थोडेफार गोळीबारानें मेले. थोडेफार लाठीमारानें घायाळ झाले. कांहींचे तुरुंगांत हाल झाले, अशांचा दहा हजार आंकडा धरला तरी जर्मनीचा जो त्याग त्या मानानें आपला कांहीं च नाहीं असें म्हणावें लागेल. जर्मनीचा त्याग जर मनुष्यस्वभावास धरून आहे तर महात्मा गांधी जो त्याग मागतात तो मनुष्यस्वभावाच्या व मनुष्यशक्तीच्या बाहेरचा कसा !

एकीकडे तर हिंदी संस्कृतीचा अभिमान दाखवतां. हिंदी संस्कृति थोर व श्रेष्ठ असें मानतां. आमची संस्कृति सर्वांत जुनी, आमच्यांत अनेक ऋषिमुनि, साधुसंत, वीर, झाले. येथें ब्रह्मविद्या निर्माण झाली. आमची संस्कृति उदार, सुंदर, यज्ञप्रवण, स्वर्गीय, असें मानतां. परंतु असे जे तुम्ही त्या तुमचा त्याग जर्मन लोकांच्या त्यागाच्या दोनशेंवा हिस्सा हि नाहीं. आणि म्हणतां हा हि त्याग मनुष्यशक्तीच्या बाहेरचा आहे! धन्य आहे तुमची!

मला हें सांगावयाचें आहे कीं, स्वराज्यासाठीं जो आम्हीं त्याग केला तो अत्यंत अल्प आहे. राष्ट्रासाठीं काय करावें लागतें ह्या बाबत जर्मनीचें ताजें उदाहरण आहे. जसें जर्मनांचें तसें च फ्रेंचादि इतरांचें. त्या लोकांनीं जो त्याग केला तो कांहीं फार मोठया उदात्त ध्येयासाठीं नव्हता. त्यांचीं ध्येयें लोभमूलक होतीं. असें असून हा एवढा त्याग त्यांनीं केला. मग आम्हीं आपल्या स्वातंत्र्यासाठीं, आणि तें हि सत्याच्या मार्गानें मिळवण्यासाठीं, ह्या उदात्त व भव्य ध्येयासाठीं, किती त्याग करावयास पाहिजे होता? ह्या ध्येयासाठीं उच्च संस्कृतीचा अभिमान धरणाऱ्यांनीं किती हि त्याग केला असता तरी तो सार्थकीं लागला असता. अनेक पिढया आमचें गुणवर्णन झालें असतें. असें सुंदर ध्येय. परंतु त्यासाठीं जी थोडी फार मागणी महात्माजींनीं केली ती हि आम्हांला फार वाटली!

आम्ही जगांतील उंच माणसें, श्रेष्ठ संस्कृतींचीं, थोर पूर्वजांचीं, अशा साऱ्या अभिमानासकट तुम्ही कोणत्या तोंडानें म्हणाल कीं केला हा त्याग फार झाला, पवित्र ध्येयासाठीं केलेला हा लहानसा त्याग मनुष्य-स्वभावाच्या व मनुष्यशक्तीच्या बाहेरचा झाला?

मनुष्याच्या त्यागाचें माप आपण ५ हजार मैल दूर जाऊन पाहिलें. आतां ५ हजार वर्षें मागें जाऊन पाहूं. मैलांनीं दूर गेलों, वर्षांनीं मागें जाऊं.

हिंदुधर्म रचणाऱ्यांनीं, त्या विचारवंतांनीं, असें ठरविलें कीं सरासरी चार माणसांत एक वानप्रस्थ असावा. चार माणसांतील एक देशाची, समाजाची, सेवा करणारा असावा. सर्व स्मृतींनीं ही गोष्ट मान्य केली आहे. वानप्रस्थ हा उत्तम शिक्षक असें सर्व स्मृति म्हणतात. देशाची पिढी

तयार करण्यास त्यागी, अनुभवी, तपस्वी अशी मंडळी पाहिजे. म्हणून स्मृतिकारांनीं वानप्रस्थसंस्था निर्माण केली. केव्हांतरी ही योजना अमलांत असली पाहिजे. वानप्रस्थांचें १/४ हें प्रमाण आपण सोडूं. १/१० घ्या. निदान १/२० तरी धरण्यास हरकत नाहीं. ह्याचा अर्थ असा कीं धुळ्याची जर ४० हजार लोकसंख्या असेल तर दोन हजार वानप्रस्थ–सेवा करणारे–धुळ्यांत असले पाहिजेत.

उपनिषदांचे ऋषि व्यवहार धरून बोलत नाहींत असें समजूं. परंतु मनूसारखे समाजशास्त्रज्ञ, ज्यांनीं समाजासाठीं धर्म रचला, ते तर व्यवहारी असतील ना ? त्यांनीं जी धर्म-रचना केली तींत तुमच्यापासून कोणती अपेक्षा केली आहे ? त्या व्यवहारास धरून बोलणाऱ्या ऋषीनें धुळ्यांतून दोन हजार सेवक मागितले. महात्मा गांधींनीं जो त्याग मागितला तो तुम्ही अव्यवहारी म्हणतां, मनुष्याच्या शक्तीबाहेरचा म्हणतां. आणि आतां या धर्मशास्त्रकारानें मागितला तो हि अस्वाभाविक च का ? तो ऋषि स्वप्न-सृष्टींत वावरणारा पागल नव्हता. तो मनुष्यस्वभाव जाणणारा होता. पूर्वीच्या मन्वादि स्मृतिकारांनीं असा त्याग मागितला. आज हि परदेशांतले लोक किती त्याग करीत आहेत हें हि आपण पाहिलें. आणि ह्या प्राचीन व अर्वाचीन त्यागाच्या मानानें आपण केलेला त्याग जर मापला तर आपण करतों ती चळवळ आहे का राजवाडे म्हणत त्याप्रमाणें वळवळ आहे तें समजून येईल.

मी तुम्हांला ठपका नाहीं देत. मी कोणाला ठपका देऊं ? "**आपुला चि वाद आपणाशीं**" आपले च ओंठ, आपले च दांत. धुळ्यांत चारदोन संस्था आहेत ह्याचा मी आनंद कसा मानूं ? गो–रक्षणाची काल संस्था निघाली म्हणून आनंद मानूं ? का हरिजन विद्यार्थ्यांचें एक कसेंबसें छात्रालय निघालें आहे, ज्याच्याकडे लक्ष देण्यास एकदोन माणसांपेक्षां इतरांस जरूर भासत नाहीं, त्याचा अभिमान धरूं ? पूर्वजांनीं लढाया केल्या, पराक्रम केले, तत्संबंधींचीं चित्रें व कागदें सांभाळणारी येथें संस्था आहे म्हणून अभिमान धरूं ?

राजवाडे-स्मारक मंदिराच्या उद्घाटन-प्रसंगीं मी तीन वर्षांपूर्वीं आलों होतों. पांच मिनिटें बोललों. ज्यास्त बोलण्याची ती वेळ नव्हती,

प्रसंग नव्हता. परंतु त्या वेळेस मीं हें सांगितलें कीं, इंग्रज इतिहासकार तुमच्या पूर्वजांस नालायक म्हणतात म्हणून तुमचा संताप होतो. संशोधकाला इतका संताप तो कशाला ? जरा समता धर, इतका संतापूं नको. इंग्रज इतिहासकार आमच्या आजच्या वर्तनावरून आमच्या गत इतिहासाची परीक्षा करील. फळावरून झाडाची परीक्षा होते. हिंदुस्थानच्या इतिहासाला आमच्यासारखीं नादान फळें लागतात तर इंग्रज इतिहासकार काय म्हणेल ? फळ ज्याअर्थी कडू आहे त्याअर्थी बीजांत च कांहीं दोष असला पाहिजे. आज स्वराज्य मिळवा, त्यासाठीं त्याग करा, तुमचीं तोंडें उज्ज्वल होतील, पूर्वजांचे इतिहास हि उज्ज्वल होतील. पूर्वजांच्या तोंडाला आमचें आजचें वर्तन कालिमा फांशीत आहे. आमची संस्कृति उदार, उज्ज्वल, थोर म्हणून भागत नाहीं. तें प्रत्यक्ष दिसलें पाहिजे. तुम्ही तोंडानें म्हणाल, "**नायं हन्ति न हन्यते**" परंतु प्रत्यक्ष कृतींत अयं हन्ति, अयं हन्यते हें च तर दिसून राहिलें आहे ! तुम्ही हरिजनांना ठेचतां व परक्यांच्या लाथा खातां ! अशा पशुसम वर्तनानें इतिहास उज्ज्वल कसा होणार ? आम्ही जोंपर्यंत आजचा इतिहास बदलत नाहीं तोंपर्यंत जुनीं कागदपत्रें किती हि सांभाळलीं तरी तीं जळल्यासारखीं च आहेत. आपला इतिहास जर कांहीं उज्ज्वल करावयाचा असेल तर आजचें वर्तन शुद्ध करा, उज्ज्वल करा. आम्हीं आजचा काळ उज्ज्वल केला, त्याग भरपूर केला, ध्येयनिष्ठा दाखविली तर, जरी जुने सर्व कागदपत्र नष्ट झाले, मराठ्यांच्या पराक्रमाचे च नव्हे तर वेदाचे, उपनिषदांचे हि सारे कागद फाटले, अक्षरन् अक्षर जरी उडून गेलें तरी हि आमचा मागील इतिहास जगांत उज्ज्वल ठरेल. असें हें तेजस्वी, त्यागी, पराक्रमी उज्ज्वल राष्ट्र उज्ज्वल परंपरेचें च असलें पाहिजे असें निःशंकपणें जग म्हणेल. भूतकालीन इतिहास उज्ज्वल करावयाचा असेल तर त्याला उपाय म्हणजे हल्लींचा काळ उज्ज्वल करणें. "**सांगे वडिलांची कीर्ति, तो एक मूर्ख ॥**" असें जें समर्थांनीं म्हटलें त्यांत हें च सांगितलें आहे. हा मूर्खपणाचा एक प्रकार नमूदून तो काढून टाकावा म्हणून समर्थांनीं खटपट केली. पढतमूर्खपणा नसावा. कांहीं गांवढळ मूर्ख.

कांहीं शहरी मूर्ख. कांहीं लिखतपढत असून मूर्ख. कांहीं तसे नसल्यामुळें मूर्ख. पढतमूर्ख असूं नये, पूर्वजांची केवळ कीर्ति गात बसूं नये, स्वतः पराक्रम करावा, हें रामदासांच्या लिखाणाचें स्वारस्य. समर्थांनीं जो केवळ पूर्वजांचीं स्तुतिस्तोत्रें गात बसण्याचा मूर्खपणा काढून टाकण्याचा यत्न केला तो अजून आपल्यांतून गेला नाहीं. पूर्वज होऊन गेले. तूं शिल्लक आहेस, तुझ्याबद्दल काय तें बोल ना ? तूं आपला वर्तुळाकार फिरत आहेस व तोंडानें पूर्वजांचे पोवाडे गात आहेस. शून्य दर्शविण्यासाठीं वर्तुळ च कां योजिलें, चौकोन कां नाहीं अशी मला शंका येई. परंतु आजची आमची स्थिति पाहिली म्हणजे तें लक्षांत येतें. पूर्वजांच्या अभिमानाचें आजचें फलित काय—तर शून्य ! समर्थांनीं असल्या या कर्तृत्वहीन स्वभावाला मूर्खांत काढलें आहे.

आमच्या हातून कर्तृत्व व्हावें, आजचा इतिहास उज्ज्वल होऊन आमची प्राचीन भव्य संस्कृति सतेज व्हावी, म्हणून तर महात्मा गांधी आमच्याजवळ त्याग मागत आहेत. त्यांनीं जो त्याग मागितला तो अत्यंत अल्प आहे. उलट अहिंसेच्या बळावर अल्प त्याग हि महान् फळ देईल असा त्यांचा दावा आहे. इतर देशांतील राष्ट्रपुढारी जो त्याग मागतील त्या मानानें हा कांहीं च नाहीं. त्यांत मनुष्य-स्वभाव ताणला जातो असें तुम्हांस म्हणतां येणार नाहीं. उलट केलेल्या त्यागानें तुम्हांस समाधान वाटणार नाहीं.

'**दुर्लभं भारते जन्म**' असा अभिमान बाळगणारे आम्ही ! परंतु काय रे आमची ही दशा ! 'दुर्लभं भारते जन्म' असें म्हणणाऱ्यावर इतर देशांपेक्षां भारतांत सेवावृत्ति, त्यागवृत्ति, प्रेमवृत्ति, ध्येयनिष्ठा, निर्भयता, मरणाबद्दलची बेपर्वाई हीं अधिक नको का दिसावयास ? कीं भारतांत हरिजनास पशूप्रमाणें वागवण्यांत येतें, येथें भेदांचा, उच्चनीचतेचा बुजबुजाट झालेला आहे, येथें मरणाचा डर जगांत अन्यत्र नाहीं इतका भरला आहे, येथें दास्याची चीड येत नाहीं, येथें स्वदेशीधर्म पाळला जात नाहीं, येथें उद्योगाची पूजा नाहीं, येथें ऐक्याचा व विशाल दृष्टीचा अभाव आहे म्हणून 'दुर्लभं भारते जन्म' म्हणतां ? कोणत्या हि दृष्टीनें पाहिलें तरी आजची आपली स्थिति फार भयानक आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. ही

स्वस्थिति पाहून आम्हांस दुःख, खेद, संताप वाटली पाहिजेत तर तुम्ही का समाधान मानणार? येथील दोनचार संस्थांचा लहानसा खेळ मांडून आनंद मानणार? तुम्ही भला मानाल, पण मी मानणार नाहीं व तुम्हांला मानूं देणार नाहीं. चार दोन सेवकांनीं काम करावयाचें, बाकीच्यांनीं का स्वस्थ बसावयाचें? सार्वजनिक कामांत प्रत्येकानें भाग घेतला पाहिजे. प्रत्येकानें आपल्या शक्तीचा, आपल्या बुद्धीचा, आपल्या द्रव्याचा हिस्सा सार्वजनिक सेवेसाठीं सादर केला पाहिजे. नेपोलियन इंग्लंडावर हल्ला करूं पहात होता. डोळ्यांत तेल घालून नेल्सन बसला होता. नेल्सननें राष्ट्राजवळ काय मागितलें? प्रत्येक मनुष्यानें स्वतःचें कर्तव्य केलें पाहिजे अशी इंग्लंडची अपेक्षा आहे—असें तो म्हणाला. प्रत्येकानें जबाबदारी उचलली पाहिजे. देशाचा संसार आपल्या प्रत्येकाच्या शिरावर आहे व तो चालवला पाहिजे. इंग्लंडवर त्या काळांत जें संकट आलें होतें त्यापेक्षां आज हिंदुस्थानवर कमी संकट आहे असें तुम्हांस वाटतें का? ही भारत-भूमि प्रत्येक पुत्रापासून सेवेची अपेक्षा करीत आहे. भारतमातेस प्रत्येकाची जरूर आहे. गर्भांत राहिलेल्या बाळाकडे पाहून ती म्हणत असेल, 'हा तरी येईल, हा माझ्या उपयोगीं पडेल, हा माझे अश्रु पुशील, हा पांग फेडील!'

गोकुळावर संकट आलें होतें त्या वेळेस भगवंतांनीं सर्वांच्या हातांची अपेक्षा केली. सर्वांचे हात लागले पाहिजेत. मग त्यांची करांगुळी आहे च. मनुष्यप्राणी केवळ भोगी असून कसें चालेल? आजूबाजूच्या परिस्थितीचा त्यानें विचार केला पाहिजे. पाण्याचा स्वभाव कसा असतो पहा. विहिरींतून बादलीभर पाणी काढतां च तेथला पडलेला खळगा भरून काढण्यासाठीं चोहोंबाजूनें पाणी धावतें व एका क्षणांत पुन्हां समानता होते. विहिरीचें पाणी चढलें तर सारें वर चढेल, खालीं झालें तर सारें एकदम खालीं येईल. परंतु पाण्याऐवजीं ज्वारीच्या ढिगाकडे पहा. ज्वारीच्या ढिगांतून जर एक पायलीभर ज्वारी काढली तर तेथला खळगा तसा च राहील. तेथला खळगा भरून काढावयास कांहीं थोडे महात्मे—ज्वारीचे दाणे—धावतील व खड्ड्यांत उड्या घेतील पण बाकीचे आडमुठे धावून येणार नाहींत. ते तसे च मजा पाहतील. मनुष्यसमाज हा पाण्याप्रमाणें असावा.

हिंदुधर्म पुकारून पुकारून सांगत आहे कीं नरदेह दुर्लभ आहे. संतांनीं कंठशोष करून सांगितलें, हा दुर्लभ नरदेह लाभला तर कांहीं सार्थक कर.

**'सोनियाचा कलश । माजीं भरला सुधा-रस'** सोन्यासारखा नरदेह मिळाला आणि तो पुनः या संतांच्या पुण्यभूमींत! असें असून तुम्हीं त्याचें काय चीज करीत आहांत! त्या पाण्याप्रमाणें धावून गेलांत तर नरजन्माचा महिमा तुम्ही टिकवलांत असें होईल.

तुम्ही म्हणाल, 'प्रत्येकानें मदत करावी, प्रत्येकानें सार्वजनिक सेवेला हातभार लावावा, हें खरें. परंतु दिवस कठिण आले. व्यापाऱ्याचा व्यापार चालत नाहीं. शेतकऱ्याची शेती पिकत नाहीं. पिकली तर विकली जात नाहीं. नौकरीधंद्यांत राम नाहीं. तर काय करावयाचें?' परंतु माझें याला उत्तर असें कीं 'दिवस कठिण आले म्हणून घरांत पांच मुलें असलीं तर त्यांना वांटून देतां च कीं नाहीं?' सार्वजनिक सेवा हें एक सहावें मूल माना व या मुलाच्या वांटयास् जें येईल तें द्या. समाज हें एक कुटुंबाचें च अंग माना. घरखर्चाचीं जशीं अनेक खातीं तसें च हें एक खातें. **'दया करणें जे पुत्रासी ते चि दासा आणि दासी'** हें च सूत्र मनुष्यसमाजाचें असलें पाहिजे.

कठिण दिवस आले म्हणून बाप एकटा खात नाहीं. जें असेल तें सर्वांना देतो. कमी मिळेल परंतु सर्वांस मिळेल. एकटयानें जेवणें हें महापाप आहे. तो ऋषि काय सांगतो, ऐका—

**मोघमन्नं विन्दते अप्रचेताः। सत्यं ब्रवीमि वध इत् स तस्य।**
**नार्यमणं पुष्यति नो सखायं। केवलाघो भवति केवलादी॥**

तूं आपल्या एकटयासाठीं पैसा जमवला असशील तर तो व्यर्थ आहे. तूं स्वतःसाठीं अन्नाची लयलूट करून कोठार बांधलें आहेस. अरे, तें कोठार नाहीं, तें तूं अन्न नाहीं मिळविलेंस! तो ऋषि म्हणतो, "तो तूं वध मिळविलास, वध!"—वध इत् स तस्य—'तो त्याचा वध आहे.' तो ऋषि धोक्याची सूचना देत आहे. त्या तळमळणाऱ्या निःस्वार्थी ऋषीहून कोण अधिक हितकर्ता आहे? त्याला केवढी तुमची दया! तो ऋषि सांगत आहे—तुम्हीं एकटे खाल तर केवळ पापाचे पुतळे

म्हाल. तुम्हांला कोठारें भरून मिळालीं आहेत तीं फुकट. तो तुमचा वध तुम्हीं सांपडलांत ! जो इतरांस पोसणार नाहीं, कोणाला मदत देणार नाहीं, त्याच्याजवळ जें आहे तो त्याचा वध आहे. नीट कान टवकारून ऐका. रशियांत त्या ऋषीची वाणी खरी ठरली आहे. लोकांना न देतां संचय करणें म्हणजे वध मिळवणें हें त्यांच्या अनुभवास आलें. तुम्हांला वेद पुकारून सांगत आहे. श्रुतिमाउलीहून अधिक कळकळीनें कोण सांगणार !

शंकराचार्य म्हणतात, हजारों आईबापांपेक्षां ही श्रुति कल्याणकारिणी व हितैषिणी आहे. अशी ती श्रुति सांगत आहे. तुमची वेदांवर श्रद्धा आहे ना ? मी वेदांचा नम्र उपासक व भक्त आहें. इतकी साफ साफ स्पष्ट शब्दांत धोक्याची सूचना कोणत्या प्रेमळ माणसांकडून तुम्हांस मिळाली होती ? मिळणार होती ? ऋषीहून प्रेमळ कोण असणार ? रशियांत जे प्रकार झाले, तसे जर येथें होऊं लागले तर तुम्ही म्हणाल आम्हांला अशी धोक्याची सूचना कां कोणीं दिली नाहीं अगोदर ? त्या थोर ऋषीनें जीव तोडतोडून नव्हती का सूचना दिली ? हजारों वर्षांपासून देऊन ठेविली आहे. "तुम्ही जर एकटे खाल तर मराल; स्वतःसाठीं अन्नसंचय करणें म्हणजे वध संपादन करणें होय." या विचाराहून नवीन विचार कोणता समाजवादी देत आहे ?

दुसरा उपाशी मरत असतांना, भरपूर श्रम करून उपाशी मरत असतांना, स्वतःजवळ सांठवून ठेवतां ? हें कोणाला सहन होईल ? हें ऋषीला सहन झालें नाहीं. अन्नावरचे नागोबा होऊन नका बसूं ! तुम्ही खा व उरलेलें द्या. परंतु सांठवून ठेवूं नका. समर्थांनीं हें च सांगितलें.

आपण यथेष्ट जेवणें । उरलें तें वांटणें ।
परंतु वायां दवडणें । हा धर्म नव्हे ॥

समर्थांचें साधें सप्रचीत बोलणें ! तुम्ही दूध प्या, पोटभर जेवा. परंतु घरांत सांठवून नका ठेवूं. वेदांचा हा च संदेश, मनूचा हा च, समर्थांचा हा च. तुम्हांला हे सारे पूज्य, प्रिय व मान्य आहेत. त्यांचें म्हणणें मांडलें आहे. पोटभर जेवा, उरलेलें द्या, नागोबा नका होऊं.

प्रत्येकानें समाजाला हिस्सा दिला च पाहिजे. तसा दिला तर कितीतरी कामें होतील. महात्माजी नवीन नवीन कामें दाखवीत च आहेत. त्यांनीं आतां ग्रामोद्योगसंघ काढला आहे. गरीब लोकांचे धंदे मरत चालले आहेत; मेले आहेत. ते सुरू केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. कोणी म्हणतो हें कळयुग यंत्रयुग, कोणी म्हणतो कलियुग! अरे, युग तूं निर्माण करशील तें होईल! काळ बनवणें तुझ्या हातांत आहे. म्हणे यंत्रयुग आलें! काय रे ही तुझी श्रद्धा! पाश्चात्य म्हणाले, यंत्रयुग आणि तूं तें मानतोस! विलक्षण च आहे तुझी श्रद्धा! माझा काळ मी बनवतों. मी च काळ आहें. गीतेंत भगवान् म्हणतात, "मी काळ आहें." त्या भगवंताचे च आपण अंश ना? जीव म्हणजे ईश्वराचा च सनातन अंश ना? म्हणजे तुम्ही हि काळरूप आहांत. काळाला बनवणें हें तुमच्या हातचें आहे. गांधींनीं दहा वर्षांत चरखा केला च कीं नाहीं उभा?

खादीची चिंधी दिसत नव्हती. आतां सर्वत्र भांडारें झालीं कीं नाहीं? तो महापुरुष "यंत्रयुग आहे, कसें होईल?" असें म्हणत बसला नाहीं. निराकार काळाला आकार देणारे तुम्ही; तुम्हांला पाहिजे असेल तें युग होईल. यंत्रयुग आहे, कलियुग आहे, ह्या दोन्ही कल्पना भ्रामक आहेत. कलियुग म्हणणाऱ्याला अंधश्रद्धावान् म्हणून तुम्ही हसतां. तुम्ही यंत्रयुग म्हणतां. पाश्चात्त्य म्हणतो, तुम्ही म्हणतां! काळ आपली इच्छा असेल, प्रयत्न असेल, तसा होईल. काळाला वांकवण्याचें सामर्थ्य तुझ्या दृढनिश्चयांत आहे.

महात्मा गांधी साध्या साध्या गोष्टी सांगून राहिले आहेत. ते म्हणतात, हातानें दळलेलें पीठ खा. गूळ वापरा. तो पैसा गरीब शेतकऱ्याला मिळेल. वेळीं च सावध झालें पाहिजे.

मनुष्य मरूं लागला म्हणजे मग च त्याच्या मदतीस जाणार का? असें नका करूं. जरा आधीं त्याच्याकडे जा. तो जिवंत आहे तों च धावाधाव करा. त्यांच्या धंद्यांना जगवा. त्यांनीं तयार केलेले पदार्थ घ्या.

तुमच्या हातांत आहे तेवढें तर कराल? "तुझें आहे तुजपाशीं." सगळें च कांहीं बाहेर नाहीं. गूळ घे, घाण्यानें तेल घे, एरंडाची कागद

घे. अशानें गरिबांस अन्न मिळेल. संपत्ति थोडीफार खेड्यांत जाईल, संपत्ति विभागली जाईल.

संपत्तीचा कायदा च असा आहे कीं ती पडून राहतां कामा नये. संपत्ति खेळती पाहिजे. तिचा एके ठिकाणीं ढीग होऊं देऊं नये. संपत्ति एके ठिकाणीं सडूं लागली कीं घाण उत्पन्न होणार, रोग उत्पन्न होणार, मरण फैलावणार. म्हणून संपत्ति सांठवूं नका. जरा मूठ सैल करा. तुम्हांला आळसाला पोसा असें नाहीं सांगत. खेड्यांतील वस्तु घ्या व जरा महाग पडल्या तरी सोसा. गरिबाला उद्योग मिळेल. स्वाभिमानपूर्वक तो घांस खाईल. असें कराल तर च जें भयानक संकट येऊं पाहत आहे, तें टळेल. ईश्वर आम्हांस सद्बुद्धि देवो !

ग्रा. से. वृ. ५-९, १०.

---

# १६ आजचें दुःख

माझ्या खेडेगांवच्या भावांनो आणि बहिणींनो ! मी आज येथें नाइलाजानें आलों आहें. असे बोलण्याचे प्रसंग जितके टाळतां आले तितके टाळले. परंतु हा टाळतां आला नाहीं. कारण ह्या वर्षी मी इथेंच राहतों आहें. आसपासच्या निरनिराळ्या शेतांतून रोज फिरायला जात असतों. त्यामुळें आसपासच्या शेतीशीं माझा परिचय झाला आहे. अशा स्थितींत जेव्हां मला आजच्या सभेचा अध्यक्ष होण्याविषयीं सांगण्यांत आलें तेव्हां तें मला स्वीकारावें लागलें. येथील शेतीची दशा जशी मी डोळ्यांनीं पाहिली आहे तशी ती गणितानें हि पाहिली आहे. प्रत्येक गोष्ट मी गणितानें पहात असतों. एकदां कोणी मला विचारलें कीं ईश्वराच्या खालोखाल तुमची कशावर श्रद्धा आहे ? मीं उत्तर दिलें, गणितावर. मीं गणितानें पाहिलें आहे कीं ह्या वर्षी पिकी फार वाईट आहे. आणि म्हणून च मीं आज येथें बोलण्याचें स्वीकारलें. बहुधा शक्य तितकें बोलण्याचें मी नाकारतों.

---

वर्धा जिल्हा शेतकरी परिषदेंतील विनोबांचें अध्यक्षीय भाषण (ता. २९-१२-३८)

बोलतां येत असून मी बोलत नाहीं. लिहितां येत असून लिहीत नाहीं. ह्या सबंध वर्षांत मीं चार लेख लिहिले आणि हें तिसरें सार्वजनिक भाषण आहे. लोक म्हणतात भाषण, लेखन हीं प्रचाराचीं शक्तिशाली साधनें आहेत. पण माझा अनुभव सांगतो कीं हीं कमींत कमी ताकतीचीं साधनें आहेत. म्हणून मी आपला प्रत्यक्ष कामाची संधि घेतों. येथील परिश्रमालयांत रोज जाऊन येतों. दुपारीं तेथें जायला मिळणार नाहीं म्हणून आज सकाळींच दोन तास जाऊन आलों. आज माझा विचार सभेचें काम कमींत कमी वेळांत आटोपायचा आहे. तेव्हां बोलणारे मुद्द्यांवर बोलतील आणि ठराव थोडे च करतील अशी मला आशा आहे. सेलसुऱ्याला गेल्या वर्षीच्या अधिवेशनांत माझ्या आठवणीप्रमाणें २५ ठराव झाले. ( गोपाळराव म्हणाले, ' नाहीं. ४० झाले ' ) संस्कृतांत म्हण आहे; कुत्रीला पिलें पुष्कळ पण बिचारीला सुखाची झोंप लागत नाहीं. सिंहीला एकच बच्चा असतो. पण त्याच्या बळावर ती निर्भयपणें निजते. जी सभा पुष्कळसे ठराव प्रसवते ती निर्भय नाहीं. थोडे ठराव करणारी सभा सुरक्षित आहे.

इतक्या प्रस्तावनेनंतर मला काय सांगायचें आहे तें थोडक्यांत सांगून टाकतों. शेतकऱ्याचा विचार करतांना—आणि ह्यांतच शेतावर काम करणारे मजूर समजून घ्यायचे—माझ्या मतें चार गोष्टी लक्षांत घ्यायला पाहिजेत. एकतर, शेतकऱ्यांचीं आजचीं तात्कालिक दुःखें कोणतीं आणि त्यांची कशी व किती सोडवणूक करतां येईल ? दुसरें, शेतींत कोणत्या सुधारणा करतां येतील ? त्या कामीं शेतकऱ्याला काय मदत करतां येईल ? तिसरी गोष्ट, त्याला खेड्यांत जोडधंदे कसे देतां येतील ? चौथी, त्याची नैतिक व सामाजिक सुधारणा. आजचें दुःख दोन प्रकारचें आहे. तें म्हणजे प्रांतिक आणि गांवठी सरकार यांच्याकडून होणारे जुलूम. यांतून सुटका कशी करून घ्यायची हा प्रश्न आहे. मी मुख्यतः याच विषयीं बोलणार आहे. आजचें दुःख कसें नाहींसें होईल याचीच तुम्हांला मुख्य चिंता आहे. तेव्हां तेंच खुलासेवार सांगून बाकीचे मुद्दे थोडक्यांत आटोपीन.

प्रथम प्रांतिक सरकारचा विचार करूं. कांग्रेसच्या लोकांनीं सरकारचा गाडा उचलला आहे. ते त्या गाड्याला जुंपले आहेत. त्यांची दशा दयाजनक

आहे. त्यांच्याकडून परभारें कांहीं व्हायचें नाहीं. तुम्ही प्रयत्न कराल तरच त्यांना कांहीं करतां येईल. 'शितावरून भाताची परीक्षा' अशी एक म्हण आहे. पिकाचा अंदाज ठरविण्याची सरकारी पद्धति पाहून मी एक नवीन म्हण काढली आहे; 'फुलांवरून फळांची परीक्षा.' पण '**मोहराऐशीं फळें नाहीं। आलीं कांहीं गळती**' हा आहे जगाचा अनुभव. येथें त्रैराशिक बसत नाहीं. मीं ह्या वर्षीं शेतांची पाहणी अगदीं सुरवातीपासून केली आहे. पऱ्हाटीच्या रांगा किती, तुरीच्या किती, फुलें किती, बोंडें किती ह्यांचें मीं गणित केलें आहे. प्रत्येक महिन्याची स्थिति अगदीं वेगळी आणि उत्तरोत्तर वाईट आढळली. पंधरा दिवसांपूर्वीं जेथें बारा आणे पीक होतें तेथें पंधरा दिवसांनंतर चार आणे हि उरलें नाहीं. या परिस्थितींत शेतकऱ्याला मी काय सांगणार? मी तर त्याला हें च सांगेन कीं वायदा देण्याची तुझी स्थिति नसेल तर वायदा देऊं नको. लोक म्हणतात, सरकार आपलें आहे. तें आपणांला चालवायचें आहे. वायदा न देऊन राज्य कसें चालेल? मी म्हणतों, राज्य चालवायचें म्हणून सांगितलें कोणीं? आणि राज्य चालवायचें म्हणजे तरी काय करावयाचें? राज्य चालविणें म्हणजे शेतकरी, प्रजा, सुखी करणें ना? त्या साठीं च वायदा घ्यायचा ना? तो का उगी च असतो? कांहीं पिको वा न पिको, पक्षी जसा आपला वांटा घेतात तसा का सरकारला वायदा घ्यायचा असतो? शेतकऱ्याचें दुःख निवारण करतां येत नसेल तर आसनावरून खालीं उतरा; प्रजेची फिकीर राखून—सन्मानपूर्वक—आसनावर राहतां येत नसेल तर सोडा आसन. आसनावर राहणें हा कांहीं स्वतंत्र धर्म नाहीं. पिकी वाईट असल्यामुळें ह्या वर्षीं संपूर्ण वायदा माफ झाला पाहिजे असा माझा तरी अभिप्राय झाला आहे. कोणीं वायदा मागूं नये आणि मागितला तर कोणीं देऊं नये असें सांगण्याशिवाय आजच्या स्थितींत मला गत्यंतर दिसत नाहीं.

येथें प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या शेतकरी—समितीला माझी एक सूचना आहे. त्यांनीं नमुन्यादाखल निरनिराळ्या विभागांतील पांचपंचवीस ठिकाणची शेती प्रत्यक्ष पाहून तेथील माहिती आंकड्यांनिशीं व्यवस्थित गोळा करावी. म्हणजे त्या त्या ठिकाणच्या सरकारी आणेवारीशीं ह्या

आंकड्यांची तुलना होऊन शेतकऱ्याच्या स्थितीविषयीं गणितानें सरकारला खात्री पटवितां येईल. पण ह्या बाबतींत लोकांना हि मला एक इशारा द्यायचा आहे. आम्हांला असत्याचें कांहींच वाटत नाहीं. आमचा हा नित्याचा व्यवहार आहे. कोणास ठाऊक किती पूर्वींपासून हें असत्य आमच्या समाजांत शिरलें आहे. मला वाटतें शेंकडों वर्षांचें जुनें आहे हें. आमची समजूत च होऊन बसली आहे, कीं व्यवहारांत खोटें बोलणें उपयोगाचें असतें. घासाघीस केल्याशिवाय सौदा व्हायचा च नाहीं. विकणारानें आपल्या वस्तूची किंमत दहा पैसे सांगायची आणि घेणारानें ती दोन पैशाला मागायची. ही आमची रीत. जसें दुकानदार आणि गिऱ्हाइक ह्यांच्या संबंधांत, तसेंच सरकार आणि प्रजा ह्यांच्या संबंधांत. सरकार पिकाची आकारणी बेसुमार करतें आणि मग शेतकरी हि पीक भलतें च कमी झाल्याचें दाखवितात. दुकानदार आणि गिऱ्हाईक ह्यांच्यांतील हा खोटा व्यवहार केव्हां निघून जाईल तो जावो, पण प्रजा आणि सरकार ह्यांच्या संबंधांत तरी तो मुळीं च असतां कामा नये. म्हणून लोकांना माझें सांगणें आहे कीं त्यांनीं जी खरी स्थिति असेल ती नेमकी सांगत जावी. अतिशयोक्ति करूं नये.

आतां गांवटी सरकाराविषयीं माझें म्हणणें सांगतों. गणपतरावांना जो कंस, रावण दिसतो तो टेनन्सी ॲक्ट मीं पाहिला आहे. त्याचें मराठी भाषांतर हि कायद्याच्या मराठी परिभाषेचा परिचय होईल म्हणून पाहून गेलों. त्याच्या वाचनानें आणि परिस्थितीच्या अवलोकनानें माझें असें मत झालें आहे कीं तो मालगुजारांना देखील लाभाचा नाहीं. वायदा-वसूलीची जबाबदारी मालगुजारावर टाकून त्याच्याबद्दल ४० टक्के वायदा सरकार त्याला देतें आणि स्वतः ६० टक्के घेतें. मालगुजारावरची ही जबाबदारी काढून टाकून ४० टक्के वायदा अजीबात कमी केला तर त्यांत मालगुजारांचें कांहीं नुकसान नाहीं. कारण मालगुजारी इतकी वांटली गेली आहे कीं पै आणि दोन पैंचे हि मालगुजार भारंभार पडले आहेत. म्हणजे शेतकरी च पुष्कळसा मालगुजार आहे. अर्थात् शेतकरी ह्या नात्यानें त्याला ४० टक्के सूट मिळायची च आहे. ज्या कांहीं मालगुजारांशीं ह्याबाबत माझें बोलणें

झालें आहे, त्यांना माझें म्हणणें पटलें आहे. ४० टक्के सुटीमुळें होणाऱ्या नफानुकसानाची वजावाकी करतां पुष्कळांना तर फायदा च होईल. मध्यम मालगुजारांना नफानुकसान कांहीं होणार नाहीं. जे कांहीं मोठ्यांपैकीं मालगुजार आहेत त्यांना थोडें नुकसान झाल्याचें दिसेल. पण तें सुद्धां कागदी च. कारण वसुलीसाठीं शेतकऱ्यावर खटले भरावे लागतात. त्यासाठीं त्यांना आपला पैसा लावावा लागतो. शेतकऱ्यांकडून वसूली झाली नाहीं तरी त्यांना तेवढी रक्कम सरकारला भरून पटवावी लागते. या सर्व बाबींचा हिशोब करतां त्यांचें नुकसान विशेष होण्यासारखें नाहीं. पण जे सोळा आणे मालगुजार असतील, किंवा ज्यांची शेती मुळीं च नसेल, अशा मालगुजारांचें कांहीं नुकसान होईल. त्याबावत तज्ज्ञमंडळानें बसून योग्य व्यवस्था केली पाहिजे. आणि करतां येईल.

हा केवळ आर्थिक नफानुकसानाचा विचार झाला. पण त्याबरोबर धर्माचा, नीतीचा हि विचार करावा लागतो. हिंदुस्थानच्या आजकालच्या हलाखीच्या स्थितींत शेतकऱ्यांकडून वायदा वसूल करण्याची जबाबदारी पतकरणें, त्यासाठीं गरिबांवर खटले भरणें आणि ह्या सर्वांचा मोबदला ४० टक्के पदरांत घेणें म्हणजे महापाप आहे. अशा स्थितींत मालगुजारांनीं आपण होऊन च सभा केल्या पाहिजेत. आणि आमच्यानें वसूली होत नाहीं, आम्हांला ही जबाबदारी नको म्हणून सरकारला सांगायला पाहिजे. ह्या मालगुजारांच्या दलालीमुळें दुःखी पीडित जनतेचा सरकारशीं सरळ संबंध येत नाहीं. सरकारला लोकांच्या, प्रजेच्या, परिस्थितीची स्पष्ट जाणीव होत नाहीं. मालगुजार सरकारची ढाल बनतात. मालगुजारांनीं मधें पडून हें पाप आपल्या माथीं कां घ्यावें ? समजा उद्यां स्वराज्यासाठीं लोकांनीं करबंदीची चळवळ सुरू केली. अशा वेळीं मालगुजार देशद्रोही ठरतील. ते सरकार आणि जनता यांच्या कैचींत सांपडतील. त्यांची स्थिति दातांच्या कचाट्यांत सांपडलेल्या जिभेसारखी होईल. म्हणून मी म्हणतों कीं शेतकऱ्यांप्रमाणें मालगुजारांनीं हि चाळीस टक्के वायदा कमी करण्याबाबत ठिकठिकाणीं सभा भराव्यात. त्यांच्या सभेंत हें पास होईल. ४० टक्के कमिशन सोडायला तयार असलेले मालगुजार मला भेटले आहेत. कौंसिलनें

यथासमय ५० टक्के वायदा कमी करावयाची घोषणा केलेली आहे. पण आमच्या मध्यप्रांतांत आज च अशाप्रकारें ४० टक्के सारा कमी होऊं शकतो.

पण हें कठिण कां होऊन बसतें ?—तर नसतें वर्गयुद्ध कल्पिल्यानें. वर्गयुद्धाची भाषा सुरू झाली म्हणजे मालगुजार हि हट्टास पेटतात. म्हणतात करा काय पाहिजे तें ! आम्ही नाहीं आपले हक्क सोडणार ! एका मालगुजारानें तर आपल्याजवळ ईस्ट इंडिया कंपनीपासून मिळालेली सनद असल्याचें सांगितलें. तींत त्याला 'यावच्चंद्रदिवाकरौ' मालगुजारीचे हक्क दिले असल्याचें तो मला सांगत होता. मी त्याला म्हणालों, आज च रात्रीं अशी एक घटका यायची आहे कीं जेव्हां सूर्य हि नसेल आणि चंद्र हि नसेल. त्या वेळीं तो कागद खुशाल फाडून टाकतां येईल आणि पौर्णिमा सोडून दिली तर अशी वेळ दररोज च येत असते. राज्य देखील येतें आणि जातें. तेथें तुझ्या कागदाची रे काय विशाद ? गीता म्हणते आणि आपण सर्व जाणतों, कीं हें शरीर हि टाकून जावें लागतें. देहासंबंधीं ही स्थिति, तेथें कागदाची काय कथा ? ही कागदी मालगुजारी घेऊन द्वेषाला पात्र कां व्हा ? बदल म्हटलें कीं त्यांत कांहीं आंबट गोड असायचें च. तरुणाचा वृद्ध झाला म्हणजे काय झालें ? विचार परिपक्व झाले. शरीर दुर्बळ झालें. असें हें चालायचें च. त्यांत भिण्यासारखें काय आहे ? सृष्टीचा तो नियम च आहे. सृष्टींत हरघडी फरक होत आहेत, आणि त्यामुळें च मौज आहे. प्रवाहांत स्वच्छता आहे.

म्हणून लोक जेव्हां म्हणतात राजसत्ता च किंवा लोकसत्ता च किंवा प्राज्ञसत्ता च किंवा मंडळसत्ता च उत्तम आहे, तेव्हां त्यांचें तें म्हणणें मला मानवत नाहीं. एका पद्धतीला त्रासला म्हणजे दुसरी चांगली म्हणूं लागतो इतकें च. वस्तुतः कोणती हि एक च पद्धति सदासर्वदा सर्वोत्तम होऊं शकत नाहीं. ज्याला पोटदुखी असते तो म्हणतो ह्यापेक्षां डोकेंदुखी पुरवली. डोकेंदुखीवाला म्हणतो खोकला परवडला, हें डोकें दुखणें नको. भावार्थ इतका च कीं मनुष्य नेहमीं प्रस्तुत दुःखांतून सुटूं पाहतो. त्यासाठीं तो फेरबदल करीत च राहतो. पेशवे जाऊन इंग्रज आले. लोकांना पेशवाई बुडाल्याचा शोक झाला नाहीं. अल्फिन्स्टन साहेबाची कारकीर्द. लोक इंग्रजी

कायद्याचे गोडवे गाऊं लागले. वेळच्या वेळीं काम, वेळच्या वेळीं सुटी, सर्वत्र व्यवस्था, सर्व कायदेशीर. लोक म्हणत हे रामाच्या काळचे वानर आहेत. रामानेंच ह्यांना राज्य करायला पाठविलें आहे. पण किती दिवस टिकलें हें ? ७५ वर्षें लोटलीं नाहींत तों कॉंग्रेस स्थापन झाली. लोकांना इंग्रजी राज्यापासून होणारे दुष्परिणाम जाणवूं लागले. तें बदलण्याच्या ते मागें लागले. सारांश, मनुष्य नेहमीं चालू दुःखांतून आपली सुटका करून घेण्यासाठीं फेरबदल करीत च असतो. त्याचें कसल्या एका शासन-पद्धतीशीं कांहीं नातें नाहीं. आपण दुःखी आहों, दुःखांतून सुटूं पहात आहों. म्हणून आपल्याला आपल्यापेक्षां पशुपक्षी सुद्धां सुखी दिसूं लागतात. मुलांनीं मघां गाईलें कीं, ‘पहा ते पक्षी कसे स्वतंत्र आहेत, आनंदी आहेत.’ हें रे तुला कसें कळलें ? तुझ्या दुःखाचा तुला अनुभव येतो म्हणून तूं आपणाला दुःखी म्हणवतोस हें ठीक. पण ते पक्षी आनंदी आहेत, स्वतंत्र आहेत, हें तूं कोठून काढलेंस ? व्हायचें आहे तुम्हां कोणाला पक्षी ? पक्षी किती भयभीत आणि त्रस्त असतात, घ्यायचा आहे अनुभव ? परवां या येथील बंगल्यांत एक पक्षी आला. सर्व दारें व खिडक्या उघडीं होतीं. पण तो असा गोंधळला कीं त्याला घराबाहेर पडतां येईना. त्याला वाटे आपण जाळ्यांत सांपडलों आहों. तो वरच्यावर घिरट्या घाली, खालीं येईना. अखेर दमून खालीं पडला. दगडूनें त्याला धरलें आणि खिडकीबाहेर झोकून दिलें, त्याबरोबर तो भुर्र उडून गेला. तो आपल्या कल्पनेच्या जाळ्यांत सांपडला होता. अज्ञानानें घेरला होता. पक्षी, माणसा-पेक्षां सुखी असणें कसें शक्य आहे ? आपण आपल्या दुःखामुळें तसें बोलतों इतकें च. मला सांगायचें हें होतें कीं ही किंवा ती प्रथा, पद्धति, स्थिति, व्यवस्था, संस्था सर्वोत्तम असें कायमचें ठरलेलें नाहीं. वेळोवेळीं आवश्यकते-नुसार पद्धति बदलणें ही च सर्वोत्तम पद्धति. कधींकाळीं. मालगुजारीप्रथा असेल हि चांगली. आज ती तशी नाहीं. म्हणून ती बदलायला च पाहिजे. तसें करण्यांत कोणाचें च नुकसान नाहीं. हें सर्वांना पटवून दिलें पाहिजे. तें पटवण्याचा हा पहिला प्रयत्न समजा. कोणाला कांहीं शंका असल्यास त्यानें मला मागाहून भेटावें.

वर्ग नसतां वर्ग कल्पून त्यांच्यांत पुन्हां वर्गविग्रह मानायचा ही एक मोठी विलक्षण चूक आहे. मला येथें बिरबल आणि बादशहा यांची गोष्ट आठवते. बादशहानें एकदां जांवयांवर रुष्ट होऊन सर्व जांवयांना सुळीं द्यायचें ठरविलें. आणि बिरबलाला त्यांच्यासाठीं सूळ तयार कर म्हणून फर्माविलें. त्यानें एक सोन्याचा, एक चांदीचा आणि कित्येक लोखंडाचे तयार करून ठेविले. सोन्याचांदीचे सूळ पाहून बादशहानें विचारलें, हे कोणासाठीं? बिरबल म्हणाला, सोन्याचा आहे तो आपणासाठीं आणि हा चांदीचा माझ्यासाठीं. कारण आपण हि जांवई च आहों ना? तसें च मालगुजारीबाबत झालें आहे. मालगुजारी इतकी वांटली गेली आहे कीं शेतकरी तो च मालगुजार अशी जवळ जवळ आज स्थिति आहे. मालगुजाराला सुळावर द्यायचें झाल्यास शेतकरी हि सुळावर जायचा. आतां हें खरें कीं उद्यां मालगुजारी नष्ट करण्याबाबत चळवळ सुरू झाली तर कांहीं असमंजस मालगुजार एक गट करतील. पण चार जणांनीं थोडा वेळ गट केल्यानें तो वर्ग होत नाहीं. आणि तुम्हांला मी सांगतों, हें तुम्हीं निश्चित समजा, कीं दुर्जनांचा वर्ग म्हणून कधीं होऊं च शकत नाहीं. स्वार्थासाठीं कांहीं काळ ते एकत्र येतील, पण त्याचमुळें त्यांची फाटाफूट झाल्याशिवाय राहाणार नाहीं. त्यांचा कायमचा असा सहकार होऊं च शकत नाहीं. तेव्हां दुर्जनांच्या वर्गाचें भय बाळगण्याचें कारण नाहीं. वर्ग सज्जनांचा च होऊं शकतो. शिवाय आमजनतेच्या विरुद्ध, शेतकऱ्यांच्या विरुद्ध, कोणता हि गट टिकूं च शकत नाहीं. आज मालगुजारी काढून टाकणें जरूरीचें आहे. ती गेल्यानें कोणाचें च नुकसान नाहीं. सर्वांचें हित च आहे.

पण सदोष पद्धतीशीं झगडण्याची रीत कोणती हें हि पाहिलें पाहिजे. आम रीत ही कीं त्या पद्धतींतील जें विष असेल तें प्रथम काढून टाकावें. तसें करतांना ती पद्धति दोषमय च असेल तर विष काढल्याबरोबर तिचा हि अंत होईल. तिच्यांत कांहीं निर्दोष भाग असेल तर ती विशुद्ध रूपांत टिकून राहील. एखादी सुधारणा करतांना अति दूरच्या काळांतील काल्पनिक भविष्याचा विचार करूं नये. त्यामुळें प्रत्यक्ष दुःखाचें निवारण तसेंच राहून

जातें. म्हणून नेहमीं वस्तुस्थितीवर उपाय योजना करीत जावी. कल्पनांत तरंगत राहूं नये. आपला मुख्य लढा इंग्रज सरकारशीं आहे. इंग्रजी राज्य अद्याप येथून गेलें नाहीं. अशा स्थितींत पुढें डॉक्टर, प्रोफेसर, सावकार, मालगुजार, मिलमालक इत्यादि एक वर्ग बनतील याची आज चिंता करण्याचें कारण नाहीं. ते वर्ग बनतील तर आणि तेव्हां पाहून घेऊं. आज आपल्या-समोर मुख्य प्रश्न इंग्रजांना तोंड द्यायचा आहे; म्हणून आपलें मुख्य लक्ष तिकडे च असायला पाहिजे.

शेतीसुधारणा इत्यादि बाबींसंबंधीं मी आतां थोडक्यांत बोलून संपवितों. शेती सुधारणेच्या तशा शेंकडों गोष्टी आहेत. पण आज मी तुम्हांला एक लहानशी बाब सुचवितों. शेतांत तुम्ही मध्यप्रांताचे शेतकरी जी पऱ्हाटी तीन महिने विनाकारण उभी राखतां ती काढून कां टाकीत नाहीं? अखेरची वेंचणी संपतां च हिंवाळ्यांत च ती काढून टाकली पाहिजे. ती तेथें शेतांत स्वस्थ बसत नाहीं. ती जमिनीचा कस शोषीत असते. एकेक एकरांत पऱ्हाटीचीं ७०-७५ हजार झाडें असतात. त्यांना जर वेळीं च काढून टाकलें नाहीं तर तीं जमिनीला निकस केल्याशिवाय कशीं राहतील? एवढें जरी तुम्हीं केलें तरी मी माझें आजचें अध्यक्षत्व सफल समजेन. शेतीसुधारणेची योजना केल्याशिवाय शेतकऱ्याला सुस्थिति यायची नाहीं. वायदा कमी होऊन होऊन तो कितीसा कमी होणार? तेवढ्यानें शेतकऱ्याची स्थिति कशी काय सुधारणार? वायदा कमी व्हायला नको असा याचा अर्थ नाहीं. शेंकडा ५० टक्के वायदा कमी झाला पाहिजे अशी कॉंग्रेसची घोषणा प्रसिद्ध च आहे. ह्या वर्षी वायदा सर्व च माफ व्हायला पाहिजे हें हि मीं सांगितलें च आहे. पण एवढ्यानें भागत नाहीं. माझें म्हणणें असें कीं नुसत्या वायदामाफीच्या मागणीवर सरकारची सुटका करूं नका. शेतीची उत्पादकशक्ति वाढेल, पुढें पीक चांगलें येईल अशा कांहीं योजना सरकार-पाशीं मागा. स्नानाशिवाय जसा मनुष्य शोभत नाहीं, त्याप्रमाणें विहिरी-शिवाय शेती शोभत नाहीं. दर दहा एकरांत एक विहीर पाहिजे. धोंडा हा वृत्र आहे. त्यानें जलाचा प्रवाह अडवून धरला आहे. त्याला फोडून पृथ्वी च्या पोटांत अडकून पडलेलें पाणी वर आणलें पाहिजे. सरकारचें लक्ष इकडे

कां वेधीत नाहीं ? तुम्हीं हें कां मागत नाहीं ? नुसता वायदा कमी होऊन संपत्ति थोडी च निर्माण व्हायची आहे ? पीक थोडें च वाढायचें आहे ?

शेतकऱ्याला शेतीबरोबर जोडधंद्याची मदत लागेल. त्याशिवाय हिंदुस्थानचा शेतकरी शेतींत सुधारणा करून हि जगूं शकायचा नाहीं. सरकारचें त्या कामीं लक्ष वेधलें पाहिजे. आमच्या गांवीं तेलघाणा सुरू करायचा आहे, विणकाम सुरू करायचें आहे, त्यासाठीं इतक्या इतक्या मुलांच्या शिक्षणाची मोफत सोय पाहिजे, अशी सरकारपाशीं मागणी करा. असें तुम्ही कां मागत नाहीं ?

आणि ह्या सर्व गोष्टींबरोबर कांहीं जीवनांत हि सुधारणा केली पाहिजे. चंद्रग्रहणाच्या दिवशीं आणि सोमवती अमावास्येला लोक येथें नदीवर स्नानाला आले होते. त्यांनीं भक्तिभावानें नदींत स्नानें केलीं. भोजनें हि येथें च केलीं. त्यांचें हें वनभोजन–'पिकनिक' च–म्हणा ना. पण ह्यावर धार्मिक ठसा होता. पिकनिकला तसा नसतो. हें सर्व ठीक. पण लोक जेथें स्नानभोजनें करीत तेथून थोड्या अंतरावर च शौचविधि हि उरकून घेत. नदींत स्नान करणें हिंदुधर्मांत पुण्यकृत्य मानलें आहे. वेदांत म्हटलें आहे :
**'उपह्वरे गिरीणां संगथे च नदीनाम् । धिया विप्रो अजायत ।'**
–पर्वतांच्या गुहांत आणि नद्यांच्या संगमावर ज्ञानप्राप्ति होते. तीर्थस्नानाचें असें माहात्म्य आहे; पण तेथें हा प्रकार ! येथील ब्राह्मण हि नदीकांटीं खुशाल शौचाला बसतात. त्यांचें नांव काढल्याबद्दल त्यांनीं रागावूं नये. त्यांना नमस्कार असो. ब्राह्मणांचें नांव अशासाठीं घेतलें कीं ते सर्व वर्णांचे गुरु, स्वच्छ, सोवळे, समजले जातात. बरें, यावर कांहीं उपाय ? होय, उपाय आहे. रामाचें धनुष्य कांहीं व्यर्थ नाहीं. दुरून बाण मारतां येईल, कारण जवळ जाण्याची सोय च नाहीं ! हा विनोद झाला. पण मला गंभीरपणें सांगायचें आहे कीं हें एकेरी नाहीं, दुहेरी नाहीं, तिहेरी पाप आहे. वाटेल तेथें उघड्यावर मळ टाकण्यामुळें बहुमोल सोनखत वायां जातें; हें आर्थिक पाप झालें. मळ उघडा पडल्यामुळें जमीन, हवा, पाणी हीं दूषित होतात त्यामुळें आरोग्यनाश; हें दुसरें पाप. आणि धर्महानि तर उघड च आहे, तें तिसरें पाप.

सुरवातीला येथें आम्हांला दरिद्रावस्थेंतून सोडवण्याबद्दल ईश्वराची करुणा भाकणारीं गाणीं मुलांनीं गाइलीं. मला नाहीं आवडलीं तीं. अशीं दीन गाणीं मुलांकडून कां म्हणवून घ्यावीं? आम्ही दुर्बळ आणि दीन कसे? जें समजूं तसें करूं शकूं. दीनवाणेपणा नको. ईश्वरापाशीं मागायचें तर असला दीनवाणेपणा आमच्यांत नसो, हें च मागावें.

ग्रा. से. वृ. ३-१, २.

---

# १७ श्रमदेवाची उपासना

ह्या वर्षी खादीयात्रेस यात्रेच्या खऱ्या पद्धतीनें येऊन जाण्याची इच्छा होती. शारीरिक कारणासाठीं सध्यां मी पवनारला पडून आहें. ह्या विश्रांतींत कर्मांत कमी भंग करून खादीयात्रेंत मुख्य भागापुरतें म्हणजे तकलीउपासनेपुरतें हजर रहावें असा विचार होता. पण थोडेंसें बोलावें असें ऐकणारांचें मत पडल्यामुळें नाइलाजानें बोलत आहें. आणि तें हि माझ्या दृष्टीनें खादीयात्रेंत मुख्य वस्तु कोणती ह्यावर.

पुष्कळदां मनुष्याला वरवरचें अनुकरण करण्याची संवय लागते. आकाशांतील नक्षत्रें पाहून आपण देवळांत हंडया झुंबरें लावतों. आकाशांतलीं नक्षत्रें आनंद देतात. पण हंडया झुंबरें घरांतली चांगली हवा जाळतात. चार महिन्यांच्या पावसाळ्यानंतर धुऊन निघालेल्या आकाशांतील असंख्य तारा पाहून आपण दिवाळी सुरू केली. आम्ही लहानपणीं कोरांटीच्या फळांत खोबरेलाचे दिवे लावीत असूं. हल्लीं खेडयांतून सुद्धां मातीच्या तेलाचे भयानक धूर काढणारे दिवे लावण्यांत येतात. मोठ्या काँग्रेसचें अनुकरण म्हणून आम्ही सुरवातीला संगीत ठेवतों. तें समजत हि नाहीं. अमुक गेट म्हणून दरवाजे करतों. पण अनुकरण आंतून झालें पाहिजे.

वरचें अनुकरण

सी. इ....६

काँग्रेसच्या ठिकाणीं राष्ट्राचें वैभव दिसो. पण खादीयात्रेंत राष्ट्राचें वैराग्य प्रगट झालें पाहिजे. हिमालयांतून निघालेली गंगा गंगोत्रीजवळ लहान पण स्वच्छ आहे. प्रयागच्या गंगेंत अनेक नद्या, नाले, मोऱ्या मिळून ती वैभवशाली झालेली आहे. दोन्हीं ठिकाणीं एक च पवित्र गंगा. पण गंगोत्रीची गंगा जर प्रयागचें अनुकरण करूं लागेल, तर प्रयागची विशालता तर तिला येणार च नाहीं, पण ती अस्वच्छ होऊन बसेल. काँग्रेससारख्या मोठया परिषदांत राष्ट्राचें वैभव व सिद्धी प्रगट होतात. छोटया खादी-यात्रेंत वैराग्य व शुद्धि दिसावयास पाहिजे. काँग्रेसचें वैभव केवढा हि प्रयत्न केला तरी खेडयांत आपण आणूं शकणार नाहीं. तेथें खेडयांतल्या लोकांचा कस आणि ताकद प्रगट झाली पाहिजे.

**वैभव आणि वैराग्य**

खादी-यात्रेंत आपण कशासाठीं जमतों? व्याख्यानें, खेळ, पोवाडे ह्यांसाठीं जमत नाहीं. कोणा हि यात्रेकरूस विचारा. यात्रेच्या ठिकाणीं बाजार असतो, गमती असतात, दुसऱ्या हजार वस्तु असतात. पण तो तेथें कां जातो? तर देवतेच्या दर्शनासाठीं. कोणी म्हणतात दगडांत काय ठेवलें आहे हो. पण यात्रेला जाणाऱ्या मनुष्यास तो दगड नसतो. उमरेडजवळच्या गांवच्या महाराचा मुलगा पंढरपुरला जातो. त्याला आंत प्रवेश हि मिळत नाहीं. पण देवतेचें दर्शन व्हावें म्हणून तो गेला. त्याला आपण वेडा म्हणूं. पण त्याच्या दृष्टीनें तो वेडा नसतो. त्याला विचारलें, "इतक्या दूर पायीं पायीं धंदा टाकून कशाला जाऊन आलास?" तो उत्तर देतो. "घरीं जरा वैताग आला. वाटलें देवाला भेटून येऊं!" उलट आम्हांला पंढरपुरच्या देवाशीं कांहीं कर्तव्य नसतें. पण आम्हीं तेथें यात्रेला जमणाऱ्या लोकांचा फायदा घेण्यासाठीं खादी-ग्रामोद्योगाचें प्रदर्शन ठेवतों. पण उद्देश सफल होत नाहीं. चांगल्या कां हेतूनें होईना, पण जनता गांठायची असेल तर मी सरळ सरळ माझ्या मुद्दयावर तिला गांठीन. आम्हांला खादी-ग्रामोद्योग ह्याचें स्वतंत्र मंदिर कां करतां येऊं नये? दुसऱ्या यात्रांचा फायदा कशासाठीं घ्यावा लागतो?

**मुख्य वस्तु देवता-दर्शन**

खादी-यात्रेंत खादी, ग्रामोद्योग आणि अहिंसा ह्यां विषयीं प्रेम राखणारे आपण कशासाठीं जमतों? कोणाला माझ्याप्रमाणें दोन दिवस राहण्यास फुरसत नसते, त्यांनीं कोणच्या मुख्य वस्तूसाठीं येथें यावयाचें? तर सर्वांनीं मिळून एकत्र सूत कांतण्यासाठीं. परिश्रम ही आमची देवता आहे तिच्या दर्शनासाठीं. गांधीसेवासंघाच्या सभेला मी बहुतेक जात नाहीं, पण मनांतून जाण्याची इच्छा होते, ती एका च कारणासाठीं कीं तेथें सामुदायिक शरीरपरिश्रमाचा कार्यक्रम चालतो. खादी-यात्रेंत ही गादी कशाला? खादी आणि गादीचा तर लढा आहे. त्यांत गादी जिंकणार असेल तर खादी आपण सोडून देऊं. अशक्त आणि म्हातारे ह्यांच्यासाठीं गादी राहो बिचारी. येथें जमीन स्वच्छ सारवून आपला मुख्य कार्यक्रम झाला पाहिजे. दुसरे च कार्यक्रम मुख्य व्हावयाला लागले तर एखादा शेतकरी घरीं यावा, सुंदर रांगोळी घातलेलें ताट मांडलें असावें, ताटांत चटण्या कोशिंबिरीचे ढीग असावे. पण भाकरी मात्र २ तोळे असावी तसा प्रकार व्हावयाचा. तो शेतकरी म्हणेल माझी काय चेष्टा केली? आम्ही मजुरीच्या कामासाठीं येथें येतों. आमच्या खेडयांतल्या लोकांची चेष्टा करतां काय?

**परिश्रम ही देवता**

दुसरे लोक आम्हांला म्हणतात, काय तुमचा धर्म? श्रीकृष्णाच्या नांवाचा लोक जयजयकार करतात. पण शेंकडा ९० लोकांना गीता सुद्धां माहीत नाहीं. मला ही तितकी दुःखाची गोष्ट वाटत नाहीं. गोपाळकृष्णाचें नांव सर्वांना परिचित आहे कीं नाहीं, त्याचें जीवन सर्वांना माहीत आहे कीं नाहीं? कृष्णाचें महत्त्व त्यानें गीता सांगितली म्हणून नाहीं. कृष्णाच्या जीवनावर तें अवलंबून आहे. द्वारकेचा राणा झाल्यानंतर सुद्धां श्रीकृष्ण सर्व कामें संभाळून मधून मधून गवळयांत येऊन राही. गायी चारी, शेण काढी. ह्या कामाचा त्याला इतका जिव्हाळा वाटत होता, म्हणून लोकांना हि त्याचा जिव्हाळा अजून वाटतो, व त्याचें स्मरण चाललें आहे. भगवान् श्रीकृष्ण मजुरांचा प्रतिनिधि म्हणून जें करीत होता, तें आपणांस मुख्यतः करावयाचें आहे. बाकी काय करावयाचें तें करा. पण त्यांत अनुकरणाचें नाटक नको.

**श्रीकृष्ण-प्रतिनिधि**

गांधीजी अगदीं टेकीला आले आहेत. अहिंसेच्या बळावर आपण येथपर्यंत येऊन पोंचलों. पण आतां आमच्या सरकारला हिंदुमुसलमान दंग्यांत पोलिस आणि मिलिटरी बोलवावीं लागतात. अहिंसेच्या बळावर दंगे मिटवितां येत नाहींत हा एकप्रकारें अहिंसेचा पराजयच आहे. दुर्बळांची अहिंसा काय करूं शकणार ? कोणीं म्हणतात दिवाणांचा काय दोष ? मी म्हणतों काडीचा हि दोष नाहीं. पण आम्हीं आज दिवाण होऊन जर इंग्रज लष्कराचें आवाहन करायचें तर मागें इतिहासांत हेंच करून आम्ही इंग्रजांचें राज्य इथें कायम केलें आहे. तोच उद्योग पुन्हा कशाला ? गांधीचे देशभक्त अनुयायी आपलें लष्कर बोलावतात ह्याचा इंग्रजांना केवढा आनंद वाटून राहिला असेल ! लष्कराशिवाय जर तुमचें चालत नसेल तर तुमचें लष्कर उभारा. हल्लीं लष्करांत अगदीं गाळीव तामस लोक दाखल करतात. तसें तरी तुम्ही करणार नाहीं. देशस्थिति जाणणारे चांगले लोक तुम्ही लष्करांत घ्याल.

वीरांची अहिंसा

गांधीजींनीं आपल्या दोन लेखांत ही गोष्ट स्पष्ट केली आहे कीं ह्यापुढें आपल्याला वीरांची अहिंसा पाहिजे. दुबळ्यांची नको. ज्ञानदेवांनीं म्हटल्याप्रमाणें '**जे वेळीं लोह मांसातें घाटे**' त्या वेळीं वीराची परीक्षा होते. अहिंसेचें नांव घेऊं आणि मरायला तयार होणार नाहीं, तर अगदीं शेवटच्या प्रसंगीं आपण भित्रे आहोंत असें आपणांस दिसून येईल.

कॉंग्रेसचे ३१ लाख सभासद झाले. पण संख्येला काय करायचें आहे ? रोज १ वेळ जेवणाराला कॉंग्रेसचा सभासद करून घेतलें तर ३५ कोटी सभासद होतील. दोन वेळ म्हटलें तर मात्र ४।५ कोटी तरी कमी करावे लागतील ! शिंद्यांजवळ साठ हजार लष्कर. होळकरांजवळ चाळीस हजार. पण वेलस्लीनें आपल्या पांच हजारानें त्यांचा धुव्वा उडवला. वेलस्ली आला त्या वेळीं शिंद्यांचे दहाहजार परसाकडे गेले होते. तर दहाहजार निजून होते. आणि दहाहजार डोळे चोळीत होते. अशा बाजारबुणग्यांनीं काय होणार ? अहिंसेनें जेथें लढावयाचें आहे तेथें तर बाजारबुणगे मुळींच चालणार नाहींत. वडाच्या झाडाखालीं जमलेले लोक त्याच्या छायेचा फायदा घेतील. पण त्याच्या कोणी उपयोगी पडणार नाहींत.

दिवाणगिऱ्या घेण्यानें काय फायदा झालेला असेल तो असो. पण एक अत्यंत वाईट गोष्ट झालेली दिसते. लोकांची स्वावलंबनाची उमेद कमी झाल्यासारखी दिसते. जनतेची स्वावलंबनाची उमेद कमी होणें, प्रत्येक बाबतींत सरकारच्या मदतीची आणि रक्षणाची अपेक्षा राहणें, म्हणजे अहिंसेचा आधार च तुटला. मग लष्कराचा आणि हिंसेचा च मार्ग ठरला. पण आम्हांला हिंसेचा च मार्ग पतकरायचा असता तर गेलीं अठरा वर्षे आम्ही आमच्या उत्तमांतल्या उत्तम लोकांना अहिंसेचें शिक्षण देण्याचा मूर्खपणा कशाला केला असता ! ह्या तरुणांना जर्मनी-इटलीप्रमाणें उत्तम लष्करी शिक्षण दिलें नसतें काय ! म्हणून गांधी सांगतात माझा मार्ग शूराचा म्हणून पटत असेल तर घ्या, नाहींतर सोडून द्या.

**गरिबांच्या हातांत सत्ता**

पवनारला मजुरांबरोबर मी बसतों, बोलतों. मीं मजुरांना सुचविलें, तुमची सर्वांची मजुरी एकत्र करून सारखी वाटून घ्या. तुम्हांला आश्चर्य वाटेल. पण मजूर म्हणाले, ‘ कांही हरकत नाहीं. ’ पण हा ठराव अमलांत कसा यायचा ? मी अलग राहून ? मी त्यांच्यांत दाखल होईन तेव्हां त्यांच्या माझ्यासकट तो अमलांत येईल. तुमच्या लाख चळवळी सोडून ह्या खऱ्या राजकारणाकडे तुमचें लक्ष पाहिजे. मजुरांच्या मजुरीची ताकद प्रगट झाली पाहिजे. तुम्हांला गरीबांच्या हातांत सत्ता पाहिजे ना ? मग त्यांचे हात वापरले गेले पाहिजेत. लहानपणीं आम्हीं श्लोक म्हणत असूं— **कराग्रे वसते लक्ष्मीः** ” बोटांच्या अग्रभागीं लक्ष्मी राहते. मग हीं बोटें चांगलीं वापरलीं जावयास नकोत ? त्यांच्यांत उत्तम कलाकौशल्य यायला नको ? आम्ही विदेशी–वस्त्र–बहिष्कार कमिटी काढतों. तिच्या कचेरींत हजार वस्तु असतात. पण चरखा–पिंजण नसतें. गांधीसेवासंघांत महिन्याला हजार वार कांतण्याचा नियम आहे. पण तो हि नीट पाळला जात नाहीं, अशी तक्रार आहे. स्वराज्य मिळविण्याचे हे ढंग नव्हेत. तुमचें स्वराज्य स्वप्नांतलें स्वराज्य आहे. आम्ही मजुरांबरोबर परिश्रम करण्यास तयार होत नाहीं तोंपर्यंत त्यांचा आमचा गोपाळ–काला कसा होईल ? त्यांच्यासारखे बनेपर्यंत आमच्या अहिंसेची शक्ति प्रगट होणार नाहीं.

कांतण्याच्या मजुरीचे दर वाढविण्यांत येणार आहेत त्याबद्दल कांहीं मंडळींची तक्रार आहे. मजुरीचे दर पाहिजे तर वाढवा पण खादी स्वस्त राहूं द्या, असें कांहीं लोक म्हणतात. ह्या पुढें अर्थशास्त्रज्ञांनीं काय रडावें ? कांतण्याचे भाव वाढवून खादी स्वस्त कशी करायची ? ह्याचा हि मेळ घालतां येईल. पण यंत्रें, तोफा, विमानें ह्यांचें साहाय्य घ्यावें लागेल. शहरचे लोक म्हणतील खादी स्वस्त रहावी तर म्हणोत. पण खेड्यांतली मंडळी तेंच म्हणतात हें आश्चर्य आहे. कांतण्याच्या जुन्या दरांत हि मजुरांना जगायची सोय आहे असें तुम्ही म्हणतां. पण नुसतें जगलें म्हणजे झालें कां ? इंग्रज सुद्धां मनापासून इच्छितात कीं आम्ही हिंदुस्थानच्या लोकांनीं जगावें आणि जन्मभर त्यांची मजुरी करावी !

**कांतण्याचे भाव**

खादीकामाचा व्यवस्थापक ३० रु. पगार घेत असला तर त्यागी समजला जातो. तें योग्यच आहे. पण त्याच्या हाताखालीं काम करणाराला मजुरी दीड आणा ! कामानिमित्त किंवा आजारानिमित्त सुट्ट्या नाहींत. मजुरी न घेतां वाटेल तितक्या सुट्ट्या घेण्याची मात्र सोय आहे. ह्या मजुरांना खादी-यात्रेंत यावयाचें तर आपलें रोजचें उत्पन्न बुडवून यावें लागतें आणि शिवाय येथचा खर्च द्यावा लागतो. ही तुलना कडू आहे. पण कडूगोडाचा प्रश्न नाहीं. सत्यदर्शनाचा प्रश्न आहे.

**मजूर आणि व्यवस्थापक**

कांहीं मंडळी म्हणतात, समाजवादी लोकांनीं मजुरांना बगलेंत मारलें आहे. म्हणून आम्ही आतां मजुरांत मिसळलें पाहिजे. बाबांनो ! समाजवाद्यांच्या स्पर्धेनें कशाला, मजुरांच्या प्रेमानें च मजुरांत मिसळा. पण तुम्ही मजुरांत कोणत्या पद्धतीनें मिसळणार ? अहिंसक पद्धतीनें त्यांच्यांत मिसळायचें तर व्यवस्थापक आणि मजूर ह्यांच्यांतील अंतर कमी करीत गेलें पाहिजे. व्यवस्थापकांनीं मजुरांसारखें व्हावयास पाहिजे. आणि मजूरांची मजूरी वाढविली पाहिजे. मजुरांची मजूरी वाढवून तुम्ही त्यांचा एक खास वर्ग बनवाल असा आक्षेप घेण्यांत येतो. पण देशाची सेवा करणाऱ्या देशसेवकांचा खास वर्ग मी निर्माण करतां असा च माझ्यावर

आक्षेप कां घेत नाहीं ? मजुरीचे दर वाढविल्याखेरीज ते आणि मी एकरूप कसे होणार ? त्यांचा आणि माझा गोपाळ-काला कसा होणार ?

किशोरलालभाईचा आग्रह होता कीं नईतालीमच्या प्राथमिक शिक्षकांना कमींत कमी २५ रुपये पगार मिळाला पाहिजे. आमच्या पवनारला

श्रमाची प्रतिष्ठा

मास्तराला १६ रुपये च पगार मिळतो, पण त्याचा मजुरांना हेवा वाटतो. तीन वर्षांपूर्वी माझा जीव उडून गेला होता, तो कांतण्याचे भाव थोडे वाढल्यामुळें ह्या देहांत येऊन बसला. दहा दहा घंटे कांतून जेमतेम ४ आणे मिळायचे आणि माझा खर्च कमींत कमी ६ आणे. मी मजुरांत कसा मिसळणार ?

सध्यां श्रमाला नुसत्या वाङ्मयांत प्रतिष्ठा आहे. तिचा उपयोग नाहीं. श्रमाला जास्त मजुरी देणें म्हणजे च त्याची खरी प्रतिष्ठा वाढविणें आहे. ह्याचा आरंभ तुम्हीं आम्हीं सर्वांनीं मिळून करावयाचा आहे.

इतके खादीधारी लोक येथें येतात. पण सर्वांजवळ तकल्या किंवा चरखे नसतात. येथें मंडळींना तकल्या द्याव्या लागतात. खादी यात्रेंत येणारानें तकल्या विसरून येणें म्हणजे हजामतीला येतांना हजामानें वस्त्रा विसरून येण्यासारखें च आहे. तेव्हां मंडळींनीं येथें यावयाचें तर आपल्या शस्त्रास्त्रांनीं सिद्ध होऊन आलें पाहिजे. आपण येथें मौज करण्यासाठीं जमत नाहीं. आपल्या खादीयात्रेंत वैराग्याचें वैभव व परिश्रमनिष्ठा प्रगट झाली पाहिजे.

ग्रा. से. वृ. २-८,९

---

# १८ आजच्या आज साम्यवाद

सोनेगांवच्या खादी-यात्रेंत शिष्टमंडळींसाठीं गादी घातली होती. शिष्टमंडळींसाठीं न म्हणतां विशिष्ट मंडळींसाठीं म्हटलें पाहिजे. कारण तिथें आलेली बाकीची मंडळी हि शिष्ट च होती. त्या प्रसंगीं मला म्हणावें लागलें होतें कीं " खादीचें आणि गादीचें जमत नाहीं. दोहोंचा लढा आहे.

आणि ह्या लढयांत जर गादी च जिंकायची असेल तर आपण खादी सोडून देऊं."

लोक म्हणतात, "खादीची हि गादी बनूं शकते." "होय, बनूं शकते. द्राक्षाचें हि मद्य बनूं शकतें." पण तें बनवूं नये. आणि त्याची गणना द्राक्षांत होऊं नये हें बरें.

भावार्थ लक्षांत घ्यायला पाहिजे. आजारी, अशक्त किंवा म्हातारे यांच्यासाठीं गादीची व्यवस्था करणें ही वेगळी गोष्ट. आणि शिष्ट मानलेल्या मंडळींसाठीं इतर समाजाहून भेददर्शक असें गादीचें आसन मांडणें ही वेगळी गोष्ट. ह्या दुसऱ्या प्रकारच्या गादीचा खादीशीं विरोध आहे.

ऐदी लोक आणि ढेंकूण यांच्या सहवासांत जिनें रहावें, ती गादी शिष्ट लोकांसाठीं मांडण्यांत वस्तुतः त्या शिष्टांचा मान न होतां अपमान होतो. पण दुर्दैव आहे, शिष्टांस हि तो तसा वाटत नाहीं. आम्ही तर शंकराचार्यांची हि 'गादी' बनवितों. शंकराचार्य तर बोलून गेले–'**कौपीनवन्तः खलु भाग्यवन्तः**'–लंगोटी लावणारा खरा भाग्यवान्–कोणास हें पटो वा न पटो, पण आचार्यभक्तांस तरी पटो.

राष्ट्रें वर येतात आणि खालीं जातात. पण ऐदीपणा, विलासीपणा किंवा गचाळपणा हा कधीं च वर जात नाहीं. शिवाजीमहाराज म्हणत, 'आम्हीं धर्मासाठीं फकिरी घेतली आहे.' पेशवे पानपतच्या लढाईला हि गेले ते सहकुटुंब सहपरिवार गेले आणि कार्यसिद्धि गमावून परत आले! गिबन म्हणतो—

**'रोम चढलें कां? साध्या राहणीनें. रोम पडलें कां? चैनबाजीनें.'**

मध्यंतरीं असहकारितेच्या जन्माच्या वेळीं राष्ट्रांतील तरुणांत आणि वृद्धांत, पुरुषांत आणि स्त्रियांत त्यागवृत्तीचा, वीरश्रीचा संचार होऊं लागला होता. सतरा सतरा आणे वार खादी—गोणपाटासारखी जाड—लोक अभिमानानें विकत होते आणि अभिमानानें विकत घेत होते. पुढें हळू हळू आम्ही खादीचें निराळें च गौरव गाऊं लागलों. खादी विकणारे अभिमानानें म्हणूं लागले, 'पहा आतां खादीची किती प्रगति झाली आहे! अगदीं अप्-टु-डेट–अद्यतन पोशाख–विलासी, भपकेदार, तलम, जसा पाहिजे तसा खादीचा होऊं शकतो. आणि पुनः पूर्वींच्या मानानें किती तरी स्वस्त!'

विकत घेणारे हि म्हणाले, 'हें गौरव उत्तरोत्तर असें च वाढो आणि मिलची पूर्ण बरोबरी खादी करो!' पण त्यांच्या लक्षांत येईना कीं मिलची पूर्ण बरोबरी जर खादीनें करावयाची तर खादी हवी कशाला? मिल च काय वाईट आहे? वैद्य स्तुति करूं लागला, 'स्वस्त औषध, पथ्य नाहीं, पाणी नाहीं.' रोगी हुरळला. पण बिचारा विसरला कीं 'गुण हि नाहीं.'

गैरसमज होऊं द्यायचा नाहीं. मजुरांना पूर्ण मजुरी देऊन खादी शक्य तितकी स्वस्त करणें हें कर्तव्य नाहीं असें नाहीं. तसें च सर्व लोकांच्या सर्व प्रकारच्या उपयोगांची सोय करणें गैर आहे असें हि नाहीं. पण गौरव काय गावें एवढा च प्रश्न आहे. बिघडलेल्या डोळ्यांसाठीं चष्म्याची सोय जरूर करावी. पण '**रूप पाहतां लोचनीं सुख झालें वो साजणी**' हें भजन गाण्याची ती जागा नाहीं.

ज्ञानदेवांचें हें वचन उच्चारतां च एक प्रसंग ओघानें आठवला. एक रसिक दृष्टीचा कलाधर पंढरपूरला जाऊन आला आणि विटेवरच्या टोंब्याचें दर्शन घेऊन आला. मला सांगूं लागला, 'रूप पाहतां लोचनीं', 'सांवळें सुंदर रूप मनोहर' इत्यादि स्लोगन्स म्हणजे उद्घोष हे लोक मोठमोठ्यानें करतात, पण मला तर 'मूरत' पाहून त्याचा कांहीं प्रत्यय आला नाहीं. ओबड धोबड आकार, नुसता दगड! शिल्पकार आणि भक्तगण दोघे हि यदृच्छालाभानें संतुष्ट झाले असें म्हणण्याशिवाय गत्यंतर नाहीं. पंचतंत्रांतील तीन धूर्तांनीं ज्याप्रमाणें बोलून बोलून बोकडाचा कुत्रा बनविला त्याप्रमाणें या लोकांनीं ओरडून ओरडून ओबड धोबड पाषाणांत सौंदर्य निर्माण करायचें ठरविलेलें दिसतें. मी म्हणालों, 'होय. संसाराच्या भीमा नदींत गोते खाणाऱ्या लोकांना बाहेर काढायला ज्यानें कंबर कसली त्याचें मजबूत, चिकट, चिवट, टणक असण्यांत च सौंदर्य आहे. शेषशय्येवर लोळणाऱ्या किंवा पंचायतनाचें ठाण मांडून फोटोसाठीं तयार झालेल्या देवतेच्या सौंदर्याचें जर तो अनुकरण करता तर त्याची शोभा नसती झाली? रामदासांनीं शिकविलें '**चातुर्यें शृंगारे अंतर। वस्त्रें शृंगारे शरीर। दोहींमध्यें कोण थोर। बरें पहा॥**' म्हणून शिवाजीला कणखर मावळे लाभले.

माझा समाजवादी मित्र म्हणेल, "तुम्ही गेलांत आपल्या वळणावर, आणि लागलांत दरिद्रनारायणाची पूजा करायला. आम्ही नाहीं दारिद्र्याचे पूजक. आम्ही आहों वैभवाचे पूजक." मी म्हणतों, "ए मित्रा! अगदीं च पोकळडोक्या बनूं नकोस. आपण 'दारिद्र्या'ला कां नारायण म्हणतों? 'दरिद्रा'ला नारायण म्हणतों. आणि दरिद्राला नारायण म्हटलें म्हणजे श्रीमंत नारायण नाहीं असा का त्याचा अर्थ? मी ब्रह्म आहें, असें म्हटलें म्हणजे तूं ब्रह्म नाहींस असा त्याचा अर्थ होत नाहीं. तूं हि ब्रह्म आहेस. झालें तुझें समाधान? दरिद्र हि नारायण, श्रीमंत हि नारायण. दरिद्रनारायणाची पूजा त्याचें दारिद्र्य दूर करण्यानें होते आणि श्रीमंतनारायणाची पूजा खऱ्या श्रीमंतीचा त्याला अर्थ समजावून त्याग करायला लावल्यानें होते आणि तुझ्यासारखा मूर्खनारायण भेटला म्हणजे त्याची पूजा अशा प्रकारें फोड करून सांगण्यानें होते. नाहीं का?"

पण हा यथार्थ विनोद आपण सोडून देऊं. समाजवादी मित्राला वैराग्य न पटलें तर वैभव च सही. वैभव कशाला म्हणतात आणि तें कसें मिळवावें लागतें हे हि प्रश्न आपण सोडून देऊं. पण समाजवादी हा साम्यवादी तरी आहे ना? चार दोन लोकांना गादी आणि बाकीच्या लोकांना रकटें नाहींतर धूळ. हें तर त्याला पटत नाहीं? आणि खादीचा गादीशीं लढा आहे हें म्हणतांना हा हि अर्थ प्रामुख्यानें माझ्या डोळ्यांसमोर होता. सर्व लोकांना गादी मांडली असती तर तो अगदीं च वेगळा मुद्दा झाला असता. पण हें शक्य नव्हतें. आणि शक्य नव्हतें तर तें मुळीं च इष्ट नव्हतें हें लक्षांत यायला पाहिजे होतें.

आमच्या कांहीं मंडळींत सांप्रत एका बाजूनें साम्यवाद आणि दुसऱ्या बाजूनें विषम वागणूक या दोहोंचा जोर चालला आहे. दोन्हीं सुखासमाधानानें एकत्र नांदूं लागलीं आहेत. फैजपूरच्या कॉंग्रेसपेक्षां हरिपुऱ्याच्या कॉंग्रेसमध्यें विषमतेनें प्रगति केली. अध्यक्ष, विशिष्ट पुरुष, शिष्ट पुढारी, सामान्य पुढारी, प्रतिनिधि, माननीय प्रेक्षक, आणि खेडवळ जनता या सर्वांची वर्गवार सोय तिथें करण्यांत आली होती. आणि गांधींच्या तीव्र दुःखाचा तो विषय झाला होता, हें आतां सर्वांना अवगत आहे. पण ही

वागणुकीची विषमता विशिष्ट प्रसंगीं च प्रगट होते असें नाहीं. आमच्या जीवनांत आणि मनांत च तिचा वास आहे. मजुरांना पूर्ण मजुरी द्यावी का हा वाद निघूं शकतो. व्यवस्थापकांना पूर्ण वेतन द्यावें कां हा वाद निघत नाहीं. ज्यांना आम्ही खेडयांत काम करायला पाठवतों त्यांनीं ग्रामीण जीवनानुकूल रहावें असें आम्ही म्हणतों. त्यांना खेडेगांवांत पाठविणारे आणि असें म्हणणारे जे आम्ही त्यांनीं स्वतः तसें वागण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे, ह्याचें तीव्र भान–आणि कधीं कधीं मुळीं च भान हि–आम्हांला नसतें. साम्याची भेदाशीं दुष्मनी असली तरी विवेकाशीं तर नाहीं च. म्हणून म्हाताऱ्यांसाठीं गादी तर आपण मान्य केली च आहे, तसा खेडेगांवांत जाणारे तरुण कार्यकर्ते आणि त्यांना तिथें पाठविणारे वडील नेते ह्यांच्या जीवनांतला थोडाफार फरक अर्थात् विवेकाला पटणारा आहे, आणि म्हणून साम्यतत्त्वाची हि त्याबद्दल तक्रार राहणार नाहीं. पण जो फरक असतो तो थोडाबहुत नसतो. प्रायः अत्यंत ढोबळ, डोळ्यांत सहज भरणारा किंबहुना डोळ्यांत सलणारा असतो. ह्या विषम वैभवाला मी गादी म्हणतों; आणि तिचा खादीशीं उभा दावा आहे असें माझें म्हणणें आहे.

परवां आमच्या येथें गोष्ट चालली होती. आश्रमची वसाहत वाढून राहिली आहे. त्यासाठीं नवीन जागा घेऊन ग्रामरचनेच्या शास्त्राप्रमाणें आतां सुयोग्य आंखणी करावयाची आहे. विणकर, कांतणारे, सुतार इत्यादि मजूर; व्यवस्थापक मंडळी, कुटुंबीजन, दफ्तरचे कार्यकर्ते, आश्रमवासी, मेहमान इत्यादिकांसाठीं कसकशा प्रकारचीं घरें बांधायचीं, असें विचारणारा मला विचारीत होता. तो स्वतः साम्यपूजक तर होता च, आणि मी साम्यवादी आहे हें हि तो जाणत होता. मी स्वगत आणि प्रगट म्हटलें, ‘मला डाळ पचत नाहीं म्हणून मी दहीं खातों. आणि मजुराला दहीं रुचत असलें तरी तो डाळ पचवूं शकत असल्यामुळें डाळीवर भागवितो. एवढी विषमता आम्ही विवेकाच्या नांवानें जिरविली समजा. पण घरें सुद्धां आम्हांला वेगवेगळ्या प्रकारचीं पाहिजेत का ? मजुरासारखें घर मला कां चालूं नये ? अथवा माझ्यासारखें घर त्याचें का बांधूं नये ?’

वैराग्याचें नांव घ्या किंवा वैभवाचें नांव घ्या. पण वैषम्य सहन करणें

नका. ह्याला च आत्मौपम्य म्हणायचें. खरा साम्यवाद हा च. आणि तो आजच्या आज अंमलांत आला पाहिजे. नुसता साम्यवाद महत्त्वाचा नाहीं. ‘आजच्या आज साम्यवाद’ महत्त्वाचा आहे. आजच्या आज साम्यवाद कसा अमलांत आणायचा ह्याच्या युक्तीला अहिंसा म्हणतात. अहिंसा म्हणते, तुझ्यापासून आरंभ कर म्हणजे आजच्या आज आरंभ होईल. अहिंसेची खूण खादी. ती च जर भेदभाव सहन करील तर तिनें आपला गळा आपण कापून घेतला असें नाहीं म्हणावें लागणार ?

‘खादीचें गादीशीं बनत नाहीं’ हें वरील सर्व अर्थांचें संग्राहक सूत्रवाक्य आहे.

ग्रा. से. वृ. २–१४.

---

# १९ विधायक कार्यक्रम

हल्लीं हिंदुस्थानांत स्वातंत्र्याच्या लढाईची गोष्ट बोलली जात आहे. आतां ही लढाई व्हायची ती शेवटची च व्हायची असें कांहीं लोक म्हणतात. आणि द्रष्ट्यांचें तर भाकीत आहे कीं स्वराज्य अनेक कारणांमुळें दृष्टीच्या च नव्हे पण हाताच्या हि आटोक्यांत आल्यासारखें आहे.

अनेक कारणांमुळें स्वराज्य जवळ आलेलें असो पण ‘स्व’च्या कारणामुळें तें किती जवळ आलें आहे हा स्व–राज्याच्या बाबतींत मुख्य प्रश्न असतो. स्वराज्य अनेक कारणांमुळें मिळत नाहीं; तें एका च स्व–कारणानें मिळतें.

तिकडे युरोपांत एक महायुद्ध चालू आहे. लांडग्याच्या घशांत गेलेलीं कोंकरें शक्य तर जिवंत, नाहींतर मेलेलीं कां होईना, बाहेर काढण्यासाठीं हें महायुद्ध आम्हीं स्वीकारलें आहे, असें विरुद्ध बाजूचे लांडगे म्हणताहेत. तूर्त ह्या आठ महिन्यांत घशांत गेलेलीं जुनीं कोंकरें बाहेर पडण्याचा बेत अजून सुरु झाला नसून नवीन कोंकरें आंत दाखल होण्याचा बेत च चालू

आहे. इकडे विरुद्ध बाजूच्या लांडग्यांच्या पोटांत अगाऊ च अडकून पडलेलीं भली मोठीं अर्धमेलीं कोंकरें उभयविध लांडग्यांच्या ह्या झटापटींत अवश्य आपण बाहेर ओकून फेंकलीं जाऊं असें आशाळभूतपणें मानीत आहेत.

अशी ही इसापनीति कथा आहे. तिचें तात्पर्य इसापावर सोंपवून आपण पुढें जाऊं. युरोपांतील लढाई हिंसेच्या साधनांनीं आणि हिंसक उद्देशासाठीं चालली आहे. आमची लढाई अहिंसक साधनांनीं आणि अहिंसक उद्देशासाठीं व्हायची आहे. असा दोहोंत मोठा फरक असला तरी आम्हांला घेण्यासारख्या त्या हिंसक लढाईंत हि पुष्कळ गोष्टी आहेत. साधनें कशीं हि असलीं तरी आजकालची लढाई म्हणजे एक सामुदायिक आणि सर्वांगीण सहकारितेचा प्रचंड प्रयत्न असतो. या प्रयत्नाचें फलित जरी विध्वंसक असलें आणि उद्देश हि विध्वंसक मानला तरी हा प्रयत्न स्वतः बहुतेक सर्व विधायक असतो. जर्मनीनें सत्तर लाख फौज उभी केली आहे असें म्हणतात. ८ कोटीच्या राष्ट्रानें एवढी मोठी फौज उभी करणें, तेवढ्या च प्रचंड प्रमाणांत लढाईचीं हत्यारें, अवजारें आणि साधनसामग्री उत्पन्न करणें, निवडक लोक फौजेंत दाखल केल्यानंतर उरलेल्या लोकांकडून राष्ट्रीय जीवन-संसार चालविणें, संपत्तीचा झरा वहाता ठेवण्यासाठीं औद्योगिक योजना शक्य तितक्या अखंड चालू ठेवणें, शाळा इत्यादि तमाम सर्व बंद करणें, नित्याच्या जीवन सामग्रीचा व्यक्तिगत मालकी हक्क सरकारजमा करणें, विश्वरूप दर्शनांत ज्या प्रमाणें डोळे, कान, हात, पाय, शिरें, मुखें अनंत असलीं तरी हृदय एक च दाखविलें आहे त्याप्रमाणें संपूर्ण राष्ट्राचें जणूं एक हृदय करणें हा सर्व एक इतका विशाल आणि सर्वतोमुख विधायक कार्यक्रम आहे कीं तो जरी संहारप्रवण असला तरी आम्हांला त्यांतून घेण्यासारखें पुष्कळ आहे.

लोक विचारतात कीं गांधी लढाईची तयारी करा म्हणतात आणि तिच्याशीं विधायक कार्यक्रमाचा काय संबंध जोडतात? हिंदु-मुसलमान-ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, खादी आणि ग्रामोद्योग; दारूबंदी, ग्रामसफाई आणि नई तालीम हा सारा विधायक कार्यक्रम झाला! यांत लढाईचें काय तत्त्व आलें? असा लोक प्रश्न करतात. कोण? जे आपल्याला लढाई

अहिंसक साधनांनीं लढायची आहे असें कबूल करतात ते च. त्यांच्या हें कसें लक्षांत येत नाहीं कीं हिंसक लढाईला सुद्धां पुष्कळसा विधायक कार्यक्रम च लागतो. शिपायांसाठीं बिस्किटें बनविण्यापासून, नव्हे शेतांत बटाटे लावण्यापासून, टॉरपेडोनें शत्रूचें जहाज फोडण्यापर्यंत सगळा च एक अखंड लढाईचा कार्यक्रम असतो आणि त्यांतला शेवटला भाग वगळला तर बाकीचा बहुतेक सारा विधायक असतो. आणि त्या बाकींच्या विधायकाच्या आधारावर तो शेवटचा विनाशक घडूं शकतो. आणि तो मागचा जर तुटला तर हा पुढचा शिल्लक च रहात नाहीं. किंबहुना हें मर्म जाणून शत्रु सुद्धां समोरच्या पक्षाचा अंतिम विनाशक कार्यक्रम हाणून पाडण्याचा उत्तम उपाय म्हणून त्याचा तो मागचा विधायक कार्यक्रम कसा लुला पडेल याची काळजी घेत असतो. हिंसक लढाईंत सुद्धां जेथें ही स्थिति तेथें अहिंसक लढाईचें विधायक कार्यक्रमाशिवाय कसें चालेल ? स्वराज्य म्हणजे सर्व-राज्य म्हणजे प्रत्येकाचें राज्य. हें असलें स्वराज्य सामुदायिक सहकार्याशिवाय, उत्पादक कार्यक्रमाशिवाय, सर्वोपयोगी राष्ट्रीय शिस्तीशिवाय कसें मिळवायचें? कॉंग्रेसचे ३० लाख सभासद आहेत. त्यांनीं राष्ट्रासाठीं रोज अर्धा तास कांतलें तरी केवढी संघटना निर्माण होईल ? आणि ह्यांत न करतां येण्या-सारखें काय आहे ? आपण वर्धा तालुक्याचा च विचार करूं. ह्या तालुक्यांत कॉंग्रेसचे ६००० सभासद आहेत. एवढे २० गटांत वांटून दिले तर प्रत्येक गटांत ३०० सभासद येतील. प्रत्येक गटानें ३०० सभासदांना सालाभरांत सूत कांतणें शिकवून द्यायचें असें ठरवलें तर तें काम फार कठिण नाहीं. पण आम्हांला मुख्य नडते आमची अश्रद्धा. लोक शिकायला तयार होतील का ? शिकले तरी पुढें कांततील का ? त्याची नोंद ठेवतील का ? ती कॉंग्रेसकडे पाठवतील का ? अशा अनेक शंका आम्ही काढीत बसतों. त्याच्या ऐवजीं कामाला च लागलें तर एकेक गोष्ट अनुभवानें उकलूं लागेल.

निदान वर्धा तालुक्यांत हा एवढा कार्यक्रम करून पाहण्यासारखा आहे. कॉंग्रेस-कमिटी, चरखा-संघ, ग्रामसुधार-केन्द्रें, आश्रमीय आणि अन्य संस्था, आणि त्या त्या गांवांतील अनुभवी माणसें ह्यांच्या सहकार्यानें हें काम व्हावें. कामाची व्यवस्थित नोंद व्हावी. वेळोवेळीं कांतण्याच्या

प्रगतीची माहिती सर्वांना मिळत जावी. कांतणें शिकवायचें म्हणजे त्यावरून इतर हि गोष्टी समवायानें शिकवतां येतात आणि शिकवाव्या. ह्या सूचनेचा मंडळींनीं विचार करावा. अति जड जाणार नाहीं. लाभदायी होईल. करून पहावें.

ग्रा. से. वृ. ४-२ पवनार ७-५-४०

---

# २० भारतीय जन-दर्शन

ह्या वेळीं खानदेशमध्यें पंधराएक दिवस थेट खेडयांमध्यें फिरण्याची संधि मिळाली. त्यांतून लोकांचें एक वेगळें च दर्शन मला लाभलें. मधल्या जेलच्या काळांत लोकांचा माझा संबंध बाह्यतः तुटला होता. तो पुनः सांधला गेला. सृष्टीचे सर्गप्रलय झाले, तरी ज्ञानी अडोल असतो, असें गीतेंत म्हटलें आहे. तीच स्थिति हिंदुस्थानच्या खेडयांची आहे. "**माणसांनो या आणि माणसांनो जा, मी आपला अखंड वाहतों च आहें**" हें टेनिसनच्या झऱ्याचें रूप आमच्या जनतेंत अक्षरशः पहावयास सांपडतें. हिंदुस्थानची जनता इतकी महान् आहे, कीं तिची महत्ता तिला हि माहीत नाहीं.

इतकी भयानक लढाई हिंदुस्थानच्या दाराशीं येऊन ठेपली आहे. वस्तूंच्या महागाईमुळें तिची झळ थेट खेडयांतल्या बिनशिकलेल्या माणसाला हि स्पर्श तर करीत च आहे. तथापि किसान एकंदरींत बेफिकीर पडलेला दिसतो. ह्यांत अज्ञानाचा भाग भरपूर च आहे, आणि तो च दुःखाचा विषय आहे. तथापि ह्यांत हि मला आमच्या जनतेची महत्ता प्रतीत होते. अनेक राज्यें, अधिराज्यें, साम्राज्यें आणि वैराज्यें जेथें उदयास आलीं आणि लोपलीं, त्या हिंदुस्थानची ही अनुभवी जनता आहे. म्हणून तत्त्वज्ञान्याची बेदरकारी इथें सहज च पहायला सांपडते.

अज्ञान जर उडवितां आलें, तर अंतर्यामांत वाहणारी ही अनुभवाची स्थिरता पुष्कळ च कामाला येईल. खेड्यांची स्थिति ह्या वेळीं मला जी दिसली त्यानें माझी आशा वाढविली, असें म्हटलें पाहिजे. कठिण प्रसंगीं थोड्याशा च संघटनेनें आमचीं खेडीं आपलें संरक्षण करून घेतील, असा मला भास झाला. अजून खेड्यांतली हिंमत गेलेली नाहीं. अज्ञानामुळें वाटणारें भय वेगळें. धीर देणाऱ्या ज्ञानाचा तेवढा पुरवठा झाला, तर खेडीं आपलें काम रेटून नेतील, असा भरंवसा वाटतो.

संरक्षणाचा प्रश्न खेड्यांत जड वाटत नाहीं. पण स्वावलंबन मात्र आमच्यां कार्यकर्त्यांच्या गाफीलपणामुळें आणि गैरवाकबगारपणामुळें विनाकारण जड होऊन बसलें आहे. कार्यकर्त्यांना विचारावें, "तुमच्या गांवांत किती चरखे चालत आहेत?" त्यांनीं उत्तर द्यावें, "दहा-बारा." पुनः विचारावें, "आतां ह्या वर्षीं किती चरखे कराल?" तर म्हणतात, "पंधरा-वीस-पंचवीस, तीस हद्द झाली." मग त्यांना म्हणावें, "हा नेहमींचा सामान्य काळ नव्हे. आपण एका विशेष कठिण काळांतून पसार होत आहोंत. जुन्या सत्ता डळमळत आहेत, नव्या घडपडत आहेत, असला हा संधिकाळ आहे. हा च क्रांतीचा काळ असतो. अशा वेळीं एकवट्टून प्रयत्न केला पाहिजे. नेहमींच्या काळांत दहा चरख्यांचे कोणीं वीस चरखे केले, तर तो कौतुकाचा विषय झाला असता. पण ह्या वेळीं गांवचे गांव खादीधारी झाले पाहिजेत. गांवांत धान्य तयार होतें, तसें च गांवचें कापड गांवांत निघालें पाहिजे. गांव सर्व प्रकारें स्वयंपूर्ण बनविला पाहिजे. उद्यां मिला धडाधड बंद पडूं लागल्या तर कसें होईल? मालाची ने आण मंदावली किंवा थबकली तर कसें होईल? हें सर्व लक्षांत घेऊन, व्यक्तिगत नव्हे पण सामूहिक उठावणी ह्या वेळीं झाली पाहिजे. असें स्वावलंबन ह्या वेळीं जड हि जाण्याचें कारण नाहीं. परिस्थिति भयानक खरी. पण ती अशा स्वावलंबनाला एक प्रकारें प्रोत्साहक च आहे. तेवढें जर आपल्याला करतां आलें, तर महापुरांत ज्याप्रमाणें प्रचंड झाडें उन्मळून पडतात, पण लव्हाळे वांचतात, त्याप्रमाणें सांप्रतच्या जगड्व्याळ आणि उलट्या काळजाच्या ह्या महायुद्धांत जिथें प्रचंड शक्तिशाली राष्ट्रें चूर

होऊन जातील तिथें गरीब हिंदुस्थान तग धरूं शकेल." हें ऐकून कार्यकर्ते क्षणभर उत्साहतात, मग थोडा वेळ अवाक् होतात आणि शेवटीं म्हणतात, " इतकें एकदम आमच्याच्यानें कसें होईल? हळू हळू, करूं."

कराल हळू हळू. तर मग काय स्वस्थ बसाल जोरानें? 'जोरानें करूं' तर म्हणा! होईल परिस्थितीच्या च वेगानें. करणारे आम्ही झालों, तर करविणारा कालात्मा सज्ज च आहे. स्वराज्य वेगानें आमच्याकडे धाव घेत आहे. आम्ही हि आम्हांला साधेल तितका सर्व वेग एकवटून त्याला भेटायला जाऊं या. शेवटीं तें तर त्याच्याच वेगानें आम्हांला भेटणार आहे. पण आम्हीं आमच्या बाजूनें हि जोर केला,-तर तें आम्हांला भेटेल, एवढें च नव्हे तर आमच्या जवळ स्थिरावेल. थोडी कल्पनाशक्ति आणि किंचित् समुदायवृत्ति एवढी च आजची गरज आहे.

ग्रा. से. वृ. ६-१ पवनार १, ४. ४२

---

# २१ ग्रामसेवकांना

मीं आज इथें येण्याचें स्वीकारलें, तें मुख्यतः मगनवाडींतील विद्यार्थ्यांच्या दर्शनाच्या लोभानें. प्रमाणपत्र द्यायला मी आलोंच नाहीं. कारण, त्यावर माझी श्रद्धा नाहीं. ज्या विषयांत मला प्रमाणपत्रें मिळालीं, त्यांचें ज्ञान मला नसल्यासारखें च आहे. आणि ज्या विषयांची मी परीक्षा दिली नाहीं, त्यांचें ज्ञान मला चांगलें आहे. परंतु इथें दिलेलीं प्रमाणपत्रें केवळ परीक्षेचीं नाहींत; म्हणून तीं निरर्थक ठरणार नाहींत, अशी मी आशा करतों.

*परीक्षा आणि प्रमाणपत्रें*

---

मगनवाडी, वर्धा येथें ता. २९-४-४२ ला ग्रामसेवक-विद्यालयाच्या पदवीदानप्रसंगीं प्रमाणपत्र-वितरणानंतर विनोबांनीं केलेलें अध्यक्षीय भाषण. मूळ हिंदी भाषणावरून मराठी.

येथून निघून विद्यार्थी खेड्यांत जातील. खेड्यांच्या सेवेसाठीं च त्यांना शिक्षण मिळालें आहे. खेड्यांतील आपल्या लोकांच्या जीवनाचें मान जरी अल्प असलें, तरी सेवेचें त्यांचें मान फार मोठें आहे. खेड्यांत आजवर संतांनीं सेवा केली आहे. त्यामुळें तेथें सेवेचें प्रमाणपत्र सहजासहजीं मिळायचें नाहीं. तेथें आम्हाला दिवस आणि रात्र अतंद्रित राहून कार्य करावें लागेल. खेड्यांतील लोक निरक्षर, म्हणून आपल्या अल्पस्वल्प विद्येनें काम चालून जाईल, असें समजूं नका. खेड्यांतील लोकांना विद्या जरी कमी असली, तरी ते आपल्या कास्तकारीच्या उद्योगांत चांगले हुशार असतात. तेथें विद्यार्थ्यांच्या विद्येची कसोटी होईल. दुसरी हि एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. खेड्यांतील लोक वेळ आळसांत घालवतात, असें बोलण्याची रीत पडून गेली आहे. शहरांतल्याप्रमाणें खेड्यांत-हि कांहीं लोक रिकामटेकडे असतात. पण जे काम करतात, ते प्रायः इतकें काम करीत असतात, कीं त्यापेक्षां अधिकाची अपेक्षा च करतां येणार नाहीं. अशा स्थितींत खेड्यांत जर आमची उद्योगशीलता कमी पडली, तर आम्ही नापास झालों म्हणून समजा.

**खेड्यांत विद्या आणि उद्योग तुटपुंजा चालणार नाहीं**

खेड्यांत जाल, तेव्हां तुमच्या समोर विराट् जग खुलें होईल. अनेक स्त्रीपुरुषांशीं संबंध येईल. त्यांच्या गुणांकडे च नेमकी नजर गेली पाहिजे. दोषांकडे प्रवृत्ति होतां कामा नये. मनुष्याच्या चित्ताला मी घराची उपमा देतों. घराला भिंती असतात आणि दरवाजे असतात. माणसाचे गुण हे त्याच्या चित्ताचे दरवाजे म्हणावयाचे, दोष भिंती. अगदीं गरिबाच्या हि घराला एक तरी दरवाजा असायचा च. तसें च, अगदीं गुणहीन म्हणवलेल्या माणसांत हि एखादा तरी गुण असायचा च. त्या गुणाच्या द्वारा च मनुष्याच्या चित्तांत प्रवेश केला पाहिजे. दरवाजांतून सहज शिरतां येतें. भिंतींतून घुसूं गेल्यास कपाळ फुटावयाचें. दोषाच्या वाटेनें माणसाच्या चित्तांत प्रवेश करूं पाहणाराची ती गत व्हावयाची. म्हणून गुणग्राहक वृत्ति हवी. वास्तविक, आम्हांला सर्व स्त्रीपुरुष भगवंताच्या मूर्ति दिसावयाला पाहिजेत. तसें झालें, तर आमचें काम सुकर होईल.

**गुणग्राहक वृत्तीची गरज**

आमच्यासाठीं दोन च पक्ष : स्वामी आणि सेवक

आपण जगांत नाना वाद ऐकतों. अनेक पक्ष पाहतों. पण सेवकांनीं सर्व वादांपासून आणि पक्षांपासून अलग राहिलें पाहिजे. आमच्यासाठीं संबंध जगांत पक्ष दोन च आहेत. एक, सेवक आणि दोन, स्वामी. सेवक आम्ही स्वतः आणि स्वामी बाकीचे सर्व लोक. स्वामीची सेवा करून सुटावयाचें, हा च सेवकाचा धर्म. सेवकाला पक्षभेदाशीं काय काम? खेड्यांत पक्ष भरपूर च असतात. त्यांच्या मुळाशीं कांहीं तत्त्व असतें असें हि नाहीं. प्रायः द्वेष आणि स्वार्थ असतो. अशा कोणत्या च पक्षांत सेवकानें सांपडतां कामा नये. त्यानें निःपक्ष राहून सेवा केली पाहिजे सेवा करणें एवढें च त्याचें काम. आपल्या सेवेनें कोण राजी झाला आणि कोण नाराज, ह्याशीं आम्हांला काय कर्तव्य? हृदयस्थ ईश्वर प्रसन्न असला म्हणजे पुरे.

रोज कांहीं वेळ प्रत्यक्ष उद्योगाचें अगत्य

आणखी एक गोष्ट. उद्योग आणि विद्या अलग नाहींत. तीं जेथें अलग केलीं जातात, तेथें दोन्ही निरुपयोगी होतात. विद्या हें शिर म्हटलें, तर उद्योग धड म्हणावयाचें. दोन्ही अलग करणें, म्हणजे दोन्ही मारून टाकणें. म्हणजे राहूसारखी गत. पण तुम्हांला येथें उद्योग आणि विद्या एकत्र लाभलेलीं आहेत. उद्योगाबरोबर च विद्या तुम्हांला दिली गेली आहे. म्हणून तुमची विद्या वीर्यहीन असणार नाहीं. तथापि, ह्यापुढें खेड्यांत जाल तेव्हां तुम्हांला अनेक वेगवेगळीं कामें करावीं लागतील. व्यवस्था पाहणें, हिशेब लिहिणें, शिकवणें, प्रसंगीं व्याख्यान देणें इत्यादि अनेक गोष्टी ग्रामसेवेच्या अंगानें कराव्या लागतात च. पण त्या करीत असतांना तुम्हीं रोज कांहीं वेळ प्रत्यक्ष उद्योगांत घालवला पाहिजे, असें माझें म्हणणें आहे. त्यानें तुमची विद्या ताजी राहील. नवीन होणारे शोध कळत राहतील, आणि तुम्हांला हि नवीन शोध सुचत राहतील. पुष्कळदां असें आढळून येतें, कीं चांगले उद्योगांत प्रवीण झालेले लोक मग प्रत्यक्ष सेवेला लागले, म्हणजे शरीरपरिश्रम करायचें विसरतात. वेळ मिळत नाहीं म्हणतात. पण त्यामुळें कार्यकर्त्यांची आणि त्यांच्या कार्याची हानि झालेली

दिसते. उद्योगाशीं नित्य परिचय न राहिल्यामुळें ज्ञान मागासतें. मग जुन्या ज्ञानावर च काम भागवतात, हें बरें नाहीं. ह्यासाठीं ग्रामसेवकानें प्रतिदिन कांहीं वेळ – माझ्या मतें शक्य तर अर्धा दिवस – उद्योगाला दिला पाहिजे. ग्रामसेवेचें तें अंग च समजलें पाहिजे.

खेड्यांत जाल,- पण तेथें जमीन टणक राहील. येथें संस्थेंत तुमच्यासाठीं सर्व सोई हजर आहेत. खेड्यांत सर्व गैरसोई असतील. पाचर तुटली, वाढ्याचें काम येत नाहीं, वाढी ( सुतार ) मिळत नाहीं. धागा अडकून पडला. त्यामुळें खचून जातां कामा नये. धीर धरला पाहिजे.

**धीराचें काम आणि लहान गोष्टींचें महत्त्व**

बारीकसारीक गोष्टींचें पूर्ण ज्ञान करुन घेतलें पाहिजे. मोठ्या गोष्टींइतकें च लहान गोष्टींना महत्त्व दिलें पाहिजे. किंबहुना, लहान गोष्टींना च अधिक महत्त्व दिलें पाहिजे. मोठ्या गोष्टी सहसा कोणी विसरणार नाहीं. कारण, त्या मोठ्या च. म्हणून लहान वाटणाऱ्या गोष्टींकडे च अधिक लक्ष पुरवायला पाहिजे. नाहीं तर त्यांच्या ज्ञानाच्या अभावीं गाडें अडकून पडायचें. विणकामांत चांगला तयार होऊन एकजण खेड्यांत माग घालून बसला. पण त्याला विणणें जरी उत्तम येत होतें, तरी माग कसा बसवावा, हें नीट अवगत नव्हतें. त्यामुळें त्याच्या मागावर कपडा, यावा तसा येई ना. जो म्हणून त्या मागावर विणी त्याचें कापड विघडावयाचें. हा परिणाम कशाचा ? माग कसा बसवावा, ही बाब क्षुल्लक म्हणून दुर्लक्षिली त्याचा.

मला सांगायचें, तें मीं थोडक्यांत सांगितलें. तुम्हांला आज इथें संस्थेकडून प्रमाणपत्रें तर मिळालीं. पण खरीं प्रमाणपत्रें जनतेकडून च मिळावयाचीं आहेत. आणि तीं आपल्या खऱ्या सेवेच्या गुणामुळें च तुम्हांला मिळतील. शेवटीं मी इतकी च आशा करतों, कीं खेड्यांत जाऊन आणि जनतेची उत्तम सेवा करुन त्या वास्तविक प्रमाणपत्रांचे तुम्ही अधिकारी व्हाल.

**खरीं प्रमाणपत्रें**

ग्रा. से. वृ. ६–२

# २२ खेडेगांवची जागृति

आपणां सर्वांना येथें जमलेले पाहून मला आनंद होत आहे. माझा नेहमींचा असा अनुभव आहे–आणि जो येथील भाषणें व मतदान पाहून येथें हि आला आहे–कीं खेड्यांतील लोक हे शहरच्या लोकांपेक्षां जास्त बुद्धिमान आहेत. शहरचे लोक जड आहेत. जड संपत्ति वागवीत असल्यामुळें जड झालेले आहेत. मराठे लोक हे आधीं च राजकारणासंबंधीं जागरूक आहेत. कॉंग्रेसच्या सत्तेमुळें ते जास्त जागृत झालेले दिसत आहेत.

मी आज खेडेगांवच्या जागृतिसंबंधानें दोन गोष्टी सांगणार आहें. सध्यां किसानसभा वगैरे स्थापून शेतकऱ्यांची संघटना केली जात आहे. लोक विचारतात, किसानसभा होत आहेत हें पाहून तुम्हांला काय वाटतें ? मी म्हणतों, किसानसभा होत आहेत ह्याबद्दल आनंद न वाटण्याइतका मी का जड आहें ? किसानसभा झाल्या पाहिजेत, खेडोपाडीं झाल्या पाहिजेत. पण ह्या बाबतींत मंडप सजविण्यासाठीं लावलेल्या ह्या डाहळ्यांपासून एक गोष्ट शिकण्यासारखी आहे. ह्या डाहळ्या आज सुंदर दिसत आहेत. उद्यां त्यांची काय दशा होईल ? झाडाची फांदी झाडाला चिकटून असली तर तिला पोषण मिळतें. ती अलग झाली तर सुकून जाते. आणि झाडाचें हि नुकसान करते. पन्नास वर्षांपूर्वी लावलेल्या ज्या झाडाच्या छायेखालीं ही सभा भरली आहे, त्या झाडाला सोडून किसानसभा अलग होतील तर त्यांचें हि नुकसान होईल; कॉंग्रेसचें हि नुकसान होईल. म्हणून किसानांच्या सर्व संघटना कॉंग्रेसला धरून झाल्या पाहिजेत. कॉंग्रेसला धरून म्हणजे आपल्या नांवांत नुसता कॉंग्रेस शब्द घातला असें नको. इतर्की 'स्वराज्य' शब्दाला महत्त्व आहे

---

ता. १२-१-३८ रोजीं [illegible] वर्धा जिल्हा केन्द्रीयपरिषदेमध्यें झालेलें विनोबांचें भाषण.

म्हणून निरनिराळ्या संस्था ' वर्णाश्रम-स्वराज्य-संघ ' सारखीं नांवें घेतात. त्याप्रमाणें नको. काँग्रेसला धरून ह्याचा अर्थ काँग्रेसचें बळ आपल्या चळवळीनें वाढवावयाचें आहे ही वृत्ति, दृष्टि पाहिजे.

काँग्रेसच्या हातीं सत्ता आली आहे ह्याचा अर्थ काय आहे ? दह्यांतील लोणी काढून घेतलेलें आहे आणि ताकाचा चवथा हिस्सा आपणासाठीं ठेवलेला आहे. ह्या चार आणे ताकाची वाटणी ११ प्रांतांत झालेली आहे. त्यांपैकीं आपली सत्ता असलेले प्रांत ७ आहेत म्हणून २।। आणे ताक आपल्या पदरांत पडलें आहे. तुम्ही म्हणाल मग ही स्थिति कां स्वीकारली ? तर पाचर ठोकण्यासाठीं. हिंदुस्थानच्या थोर पुरुषांनीं ठरविलें कीं ब्रिटिश सत्तेच्या तुळईला ही जी थोडी फट पडली आहे तिच्यांत पाचर ठोका. पाचर ठोकण्यास गेलें तर तेंच तुटून जाईल असा संशय असता तर ही स्थिति कधीं हि स्वीकारली नसती. आपलें पाचर पोलादी आहे अशी खात्री आहे.. पण नुसतें पाचर लावून चालत नाहीं. वर घणांचे घाव मारावे लागतात. आमच्या चळवळी हे घणांचे घाव आहेत.

ह्यासाठीं आपण आपल्या चळवळी फार कुशलतेनें केल्या पाहिजेत. ज्यांना आपण मतें देऊन पाठविलें त्यांना आपल्या कामामुळें मदत होईल अशी काळजी घेतली पाहिजे. मागण्या अशा व अशा पद्धतीनें मागितल्या पाहिजेत कीं आपल्या प्रतिनिधींना झोंप घेण्याची तर सोय राहूं नये, पण त्यांचें बळ हि कमी होऊं नये.

मी हि रागीट माणूस आहें. रागीट आणि कळकळीच्या माणसाचें तोंड बहुधा खवळतें. ह्याचा मला अनुभव आहे. तुकारामांचें असें च झालें होतें. ' तुका म्हणे माझें खवळलें तोंड ' असें म्हणून त्यांनीं देवाला खूप शिव्या दिल्या होत्या. किसान सभावाल्यांनीं कमी जोरानें बोलावें असें मी म्हणत नाहीं. पण तुकारामाप्रमाणें त्यांचा जोर प्रेमाचा असावा. म्हणजे त्यांचा जोर हें त्यांच्या प्रेमाचें लक्षण असावें. प्रेम न ठेवतां जोर दाखविण्यानें ज्यांच्याशीं आम्हांला एकजुटीनें झगडावयाचें आहे ते सुरक्षित राहतील व त्यांना आम्हीं मतें देऊन पाठविलें त्यांच्याशीं आम्हीं भांडत बसूं.

कळकळ पुष्कळ आहे पण बुद्धि गेली तर सर्व गेलें. बोलण्यांत विवेक सुटतां कामा नये. पुराव्यानिशीं आंकडे मांडून बोललें पाहिजे. स्वराज्याचा लाडू खरा. पण तो मेथीचा लाडू आहे. जबाबदारीचा कडूपणा त्यांत आहे. आम्हांला स्वराज्य कां पाहिजे ? तर अडचणी आल्या म्हणजे त्यांतून मार्ग कसा काढावयाचा ह्या बाबतींत आमची बुद्धि चालावी म्हणून. सध्यां आम्हांला कांहीं करावें लागत नाहीं त्यामुळें आम्ही जड झालों आहोंत. उद्यां इंग्रजांनीं आपलें लष्कर काढून घेतलें तर कदाचित् आम्हांला जड जाईल. पण तरी तें आम्हांला हवें. कारण त्यानें आमच्या बुद्धीला वाव मिळेल. आम्हांला सध्यांचा गुरगुट्या भात नको. कणखर भाकर पाहिजे. बुद्धिमत्तेचीं क्षेत्रें जीं आम्हांला अजीबात बंद होतीं तीं आतां किंचित् खुलीं झालीं आहेत इतकें च म्हणून स्वराज्याच्या जबाबदारीची जाणीव राखून किसानांनीं आपल्या चळवळी अभ्यासपूर्वक व आपल्या तोंडून निघणाऱ्या शब्दांचा तोल संभाळून केल्या पाहिजेत. ब्रह्म-वाक्याप्रमाणें किसान-वाक्य ही म्हण झाली पाहिजे. किसानाच्या तोंडून निघणारें वाक्य बेजबाबदार किंवा असत्य असणार च नाहीं अशी सर्वांची खात्री झाली पाहिजे. सरकारचा हात आज कमी मजबूत नाहीं. चांगला मजबूत आहे. पण तो धरण्याची हिंमत आज आम्ही लोकांच्या बळावर केली आहे. म्हणून लोकांच्या चळवळी आवेशपूर्ण, उत्साहवर्धक पण प्रेमयुक्त आणि विवेक व सत्य ह्यांना धरून, आपल्या प्रतिनिधींचें बळ वाढविण्याच्या दृष्टीनें, झाल्या पाहिजेत.

मीं पूर्वीं सांगितलेली गोष्ट लक्षांत ठेवा. मुळाला लागून फांदी पाहिजे. नसल्यास दोघांचें हि नुकसान आहे. सर्व शेतकऱ्यांनीं आणि इतरांनीं काँग्रेसचे सभासद झालें पाहिजे. चार आणे वर्गणी जास्त आहे अशी तक्रार करूं नका. एक वर्ष चार आणे द्या. पुढें बहुमत करून वाटल्यास वर्गणी कमी करून घ्या. सभासदांची संख्या दोनपट वाढली तर वर्गणी कमी होण्याला काय अडचण आहे? पण किसान काँग्रेसचे सभासद होणार नाहींत तर त्यांच्या चळवळी फुटून जातील.

बापूसाहेब मला म्हणाले, आज तुम्हांला सभेंत बसण्याची चांगली शिक्षा मिळाली आहे. ते बोलले निराळ्या अर्थानें पण मी शिक्षा हा शब्दाचा

संस्कृत अर्थ घेतला. आणि खरोखर च आज मला पुष्कळ शिक्षण मिळालें आहे. रामदासांचें वचन आहे: '**सामर्थ्य आहे चळवळीचें.**' पण आमचा विश्वास "सामर्थ्य आहे वळवळीचें" ह्यावर दिसतो. हल्लींच्या आमच्या सभा मला वळवळी दिसतात. एका काळीं कॉंग्रेस ही सरकार पुढें गाऱ्हाणीं मांडणारी संस्था होती. त्या वेळीं तें शोभून जात होतें. बाळ्या लहान होता तेव्हां त्याच्या चुरचुर बोलण्याचें कौतुक होत होतें. पण मोठेपणीं? चाळीस वर्षांनंतर पुन्हां आपण अमुक द्या, तमुक द्या, अशी गाऱ्हाणीं च सरकारपुढें रडत बसलों तर पूर्वींची आणि आजची स्थिति सारखी च समजली पाहिजे. हें द्या, तें द्या, पण द्या कोठून? खरी सत्ता म्हणजे लोकांची शक्ति. लोकांची शक्ति वाढली पाहिजे. रड्यासारखें मागून ती वाढणार नाहीं. हिंदुस्थानचें आर्थिक नुकसान इंग्रजांच्या व्यापारामुळें झालेलें आहे. खेडेगांवची संपत्ति वाढविल्याशिवाय हिंदुस्थान श्रीमंत कसा होईल? माफी द्या, माफी द्या, म्हणून काय होतें? कॉंग्रेसच्या चळवळीमुळें आम्हांला चळवळ करण्यास आधार, आश्वासन, संधि मिळाली इतकें च. आम्ही मुक्कामावर जाऊन पोंचलों असें आपण जणूं मानायला लागलों आहोंत. वनचराई माफ झाली, खादीसाठीं राजाजींनीं २ लाख रुपये दिले. झालें. आम्हांला वाटलें आम्हीं मुक्काम गांठला. ह्याला मी वळवळ म्हणतों. खादीसाठीं २ लाख? मला २०० कोटि पुरणार नाहींत. सर्व हिंदुस्थानला खादीमय करायचें तर २ लाख पुरतील? पण कोणतें हि सरकार हें करूं शकणार नाहीं. लोकांनीं केलें पाहिजे.

आमचे खेडेगांवचे लोक शहरच्या लोकांशीं नीट झगडत हि नाहींत. हिंदुस्थानच्या खेड्यांतल्या जिनसांची किंमत फार खालावली आहे. शहरांतल्या जिनसा महाग आहेत. खेड्यांतल्या लोकांनीं शहरच्या दुकानदाराला म्हटलें पाहिजे, 'घड्याळ २० रुपये म्हणतोस ना, २ रुपयांस दे. नाहीं तर तुझ्या यंत्र विद्येची काय करामत? माझें लोणी ६ आणे शेर मागतोस? १ रुपया शेर घे. मला त्यासाठीं इतकी इतकी मजुरी व खर्च आला आहे.' खेडेगांवांनीं सहकार्यानें भांडवल उभारून निरनिराळे उद्योग उभे केले पाहिजेत. ह्याला आतां अडथळा राहिलेला नाहीं.

सरकारकडून तुम्हांला योग्य संरक्षण मिळण्याची सोय आहे. असें कांहीं आपण करूं, तर आपण चळवळी केल्या. नाहींतर आपल्या चळवळी ह्या चळवळी च. प्रत्येक खेडेगांव हें एक राष्ट्र समजून तेथली संपत्ति कशी वाढेल ह्याचा सामुदायिक दृष्टीनें विचार झाला पाहिजे. गांवच्या आवक-जावकीवर गांवची चौकी पाहिजे. हें आपण केलें तर आजच्या सरकारला बळ दिलें, नाहीं तर आपल्या चळवळींचा कांहीं उपयोग नाहीं.

ग्रा. से. वृ. २-२

# २३ गांवलक्ष्मीची जोपासना

माझ्या खेडेगांवांतील प्रेमळ बंधूंनो,

आपला हा देश फार मोठा आहे. त्या देशांत सात लाख खेडीं आहेत. आपल्या देशांत शहरें थोडीं आहेत आणि खेडीं फार आहेत. ठोकळ मानानें दहा माणसांतील एक मनुष्य शहरांत राहतो व नऊ खेड्यांत राहतात. ३५ कोटि लोकांतील जास्तींत जास्त ४ कोटि लोक शहरांत आहेत. ३१ कोटि खेड्यांत आहेत. परंतु या एकतीस कोटींचें लक्ष त्या शहरांकडे सारखें आहे. पूर्वीं असें नव्हतें. खेडीं दीनवाणेपणें शहरांकडे पहात नसत. परंतु आज सर्व स्थिति पालटली आहे. आज शेतकऱ्याला दोन देव झाले आहेत. आतांपर्यंत एक च देव होता. त्याच्यासाठीं शेतकरी आकाशाकडे डोळे लावी. पाऊस पाडणाऱ्या देवाकडे पाही. परंतु आतां भाव ठरवणाऱ्या देवाकडे हि पहावें लागतें. याला च अस्मानी सुलतानी म्हणतात? अस्मानानें वांचविलें पाहिजे व सुलतानानें हि वांचविलें पाहिजे. देवानें पिकविलें पाहिजे आणि शहरानें भाव दिले पाहिजेत. असे हे दोन देव एक आकाशांतला व दुसरा अमेरिकेंतला—शेतकऱ्याला भजावे लागतात. परंतु असे दोन दोन देव कामाचे नाहींत. वरचा देव ठेवा व

[विनोबांनीं मागें खानदेशांतील दौऱ्याचे प्रसंगीं कासारें येथें एक प्रवचन दिलें होतें. त्यांतून वरील भाग घेतला आहे.]

गांधी म्हणतात, दुसरा देव सोडा. एक देव बस्स आहे. आतां या दुसऱ्या म्हणजे शहरी देवाची भक्ति कशी सोडून द्यायची तें मी सांगतों.

आपल्या खेड्यांतील सारी लक्ष्मी येथून उठून शहरांत जाते. मालकाच्या वरून उठते व बाहेर चालती होते. ह्या गांवलक्ष्मीचा पाय खेड्यांत ठरत नाहीं. ती शहरांकडे धांव घेते. जसें डोंगरावर पाणी भरपूर पडतें परंतु तें टिकतें का तेथें? तें चारी बाजूंनीं धांवत सुटतें. पुन्हां डोंगर कोरडा चा कोरडा. खेड्यांतील लक्ष्मी अशी चार दिशांनीं धांवत सुटते. हिला जर पायबंद घालतां आला तर खेडें सुखी होईल.

ही खेड्यांतील लक्ष्मी कोणत्या वाटांनीं धांवत जाते तें बघा. त्या वाटा बंद करा म्हणजे ही अडकेल. हिचा जाण्याचा पहिला मार्ग म्हणजे बाजार, दुसरा लग्न-व्यवहार, तिसरा सावकार, चौथा सरकार आणि पांचवा व्यसनें. या पांची वाटा बुजवावयास आरंभ करूं या.

प्रथम लग्नाची गोष्ट घेऊं. कारण ती माझ्या दृष्टीनें अगदीं च सोपी आहे. तुम्ही लग्नांत कांहीं थोडाथोडका पैसा खर्च करीत नाहीं. त्या साठीं कर्ज देखील काढतां. मुलगी मोठी होते, सासरीं नांदायला जाते. परंतु लग्नाच्या वेळच्या कर्जांतून आईबाप मुक्त होत नाहींत. ही वाट कशी बुजवावयाची तें मी सांगतों. तुम्ही म्हणाल, "खर्च कमी करा, जेवण देऊं नका, समारंभ कशाला पाहिजे?" असें कांहीं तरी सांगाल, तर तसें नाहीं. समारंभ खूप करायचा. थाट कमी करायचा नाहीं पण कमी खर्चांत माझ्या पद्धतीनें पूर्वींपेक्षां मोठा थाटमाट मी तुम्हांला देतों.

मुलामुलींचें लग्न आईबापांनीं ठरवावें परंतु तेवढें च त्यांचें काम. लग्न लावणें, समारंभ करणें हें सर्व काम गांवचें. आईबापांनीं लग्नांत एक पै हि खर्च करावयाची नाहीं. जे करतील त्यांना दंड बसेल असा कायदा च खेड्यांत करायचा.

समजा माझ्याकडे लग्न आहे. तर गांवांतील प्रत्येकानें दोन-दोन चार-चार आणे जे ठरवाल ते माझ्याकडे आणून द्यावयाचे. जणूं मला तो सर्वांनीं अहेर केला. सर्व गांवाला त्यांतून जेवण देतां येईल. पैसा न सांठवतां

कर्ज न काढतां लग्न होईल. दरवर्षी खेड्यांत २०-२५ लग्नें लागत असतील. तर मला दोन आण्यांप्रमाणें २५×२=५० आणे म्हणजे टोकळ मानानें तीन रुपये द्यावे लागतील माझ्याकडे दहा वर्षांनीं लग्न करण्याची वेळ आली. मला दरवर्षी ३ रुपये याप्रमाणें दहा वर्षांत तीस रुपये द्यावे लागले. आतां माझ्याकडे लग्नाची वेळ आली. मला खर्च नाहीं. माझ्याकडे लोक अहेर आणतील, सारे जमतील, समारंभ मोठा होईल आणि खर्च काय तर गेल्या दहा वर्षांत जे तीस रुपये मीं दिले एवढा च. म्हणजे माझ्या घरचें लग्न ३० रुपयांत झालें. आणि त्यांत सारा गांव, सारी जात सामील. सारे भोजन समारंभाला हजर. मुलांमुलींना किती आनंद होईल! त्या वधूवरांना सर्वांचे आशीर्वाद मिळतील. सर्वांचे आशीर्वाद मिळणें ह्याहून अधिक भाग्य तें कोणतें? लग्नांत लोक बोलवावयाचे, याचा उद्देश हा च कीं सर्वांची सदिच्छा सर्वांचा आशीर्वाद मिळावा. या मुलांमुलींच्या संसाराबद्दल सर्वांनीं सहानुभूति च आशा व्यक्त करावी. मुलें फक्त आईबापांचीं नसतात. तीं साऱ्या समाजाचीं असतात. मुलांनीं बरें केलें तर साऱ्या गांवचें भलें होतें. वाईट केलें तर साऱ्या गांवचें वाईट होतें.

कोणीं आपल्या पैशानें लग्न केलें तर पाप माना. तो गांवकऱ्यांनीं स्वतःचा अपमान समजावा. आईबापांचीं मुलें तशीं सर्व समाजाचीं. आई-बाप मेले तर उकिरड्यावर मुलें फेकून देतां कां? गांव संभाळ करतो, मदत करतो, गांव लग्न हि लावील. तुम्ही या मार्गानें जाऊन पहा. प्रयोग करून पहा. सावकाराचें कर्ज हटतें कीं नाहीं तें पहा. तुमचा कर्जबाजारीपणा कमी होईल. भांडणें कमी होतील. सहकार्य व आत्मीयता नांदतील.

दुसरी वाट म्हणजे बाजाराची. तुम्ही खेडेगांवचे लोक कापूस पिकवितां. परंतु तो सारा विकून टाकतां आणि कापड बाहेरून विकत घेऊन येतां. पेरणीसाठीं सरकी सुद्धां शहरांतून विकत घेतां! ऊस येथें करतां. तो विकून साखर बाहेरून विकत घेऊन येतां. गांवांत भुईमूग, तीळ, जवस होतो. परंतु तेल आणावयाचें शहरांतील गिरणीचें. आतां धान्य पाठवून भाकरी मुंबईहून मागवायची एवढें च शिल्लक

राहिलें आहे! तुम्हांला बैल सुद्धां बाहेरून विकत आणावे लागतात. असें सारें बाहेरून आणाल तर कसें निभणार?

बाजारांत कां जावें लागतें? ज्या गोष्टी लागतात, त्या गांवांत च शक्य तों तयार करावयाच्या असा निश्चय करा. स्वराज्य म्हणजे स्वदेशाचें राज्य. स्वतःच्या खेड्याचें राज्य. तुम्ही घरीं जा व आपल्या गांवांत काय काय करतां येईल तें पहा. स्वतःला काय काय लागतें तें पहा. तुमच्या शेतीला उत्कृष्ट बैल हवेत. ते विकत कोठवर घेणार? तुम्ही च उत्कृष्ट बैल गांवांत तयार केले पाहिजेत. गाईचें चांगलें पालन करा एक दोन चांगले वळू त्या गाईंत सोडा. बाकीचे खच्ची करा. यानें गायींची प्रजा सुधारेल, बैल चांगले मिळतील. बैलांचे दोर, नथा वगैरे लागतील. गांवांत च आंबाडी, सण, ताग यांचे ते करून घ्या. तुम्हांला कपडा पाहिजे. तर तो गांवांत च तयार करवा गावांत विणकर नसेल तर दोन मुलांना शिकवून आणा. प्रत्येकानें घरीं कांतलें पाहिजे. वर्षामध्यें थोडासा वेळ सहज मिळेल. भुईमूग गांवांत आहे. तेलाचा घाणा येथें च सुरू करा म्हणजे ताजें तेल मिळेल. ऊस गांवांत होतो. त्याचा गूळ करा. साखरेची मुळीं जरूर च नाहीं. गूळ हा उष्ण मानतात. परंतु पाण्याशीं मिळतां च थंड होतो. गुळामध्यें प्रकृतीला पोषक द्रव्यें आहेत. गूळ करा. चिपाडें वरीं जळणाला होतील. गांवांतील चांभाराकडून च जोडे करून घ्या. अशा रीतीनें गांवांत च सारें निर्माण करावयाचें. पूर्वी आपलीं गांवें अशीं च स्वावलंबी होतीं. खरें स्वराज्य त्यांच्याजवळ होतें.

गांवांत धान्य, गांवांत वस्त्र, गांवांत गूळ, गांवांत तेल, गांवांत जोडे, गांवांत दोर, गांवांत बैल, गांवांत घरीं च दळलेलें पीठ अशा रीतीनें वागूं लागा. म्हणजे तुमची खेडीं कशीं भरारतील तें पहा. तुम्हीं म्हणाल हें महाग पडेल. ही निव्वळ कल्पना आहे. मी उदाहरण देऊन समजावून सांगतों. तुमच्या गांवांत एक रंगारी आहे, एक विणकर आहे, एक तेली आहे, एक चांभार आहे असें समजा. आज चांभार काय करतो? तो म्हणतो कीं तेल्याकडचें तेल मी घेणार नाहीं. तें महाग पडतें. मी शहरांतलें घेईन. तो तेली काय म्हणतो? माझ्या गांवच्या चांभारानें

केलेला जोडा महाग आहे. मी शहरांतला घेईन. विणकर म्हणतो मी खेड्यांतील सूत घेणार नाहीं. मिलचें चांगलें असतें. मग शेतकरी म्हणतो मी विणकरानें विणलेलें घेणार नाहीं. मिलचें च विणलेलें विकत घेईन. तें स्वस्त असतें. अशा रीतीनें आज आपण एकमेकांस मारण्याचा धंदा चालविला आहे. परस्परांस सांभाळणें हा धर्म, तो सोडून परस्परांस धुळींत मिळवीत आहोंत. पण गंमत पहा. तेल्यानें चांभाराकडचा चार आण्यांनीं महाग जोडा घेतला. तेल्याच्या खिशांतील आज चार आणे गेले. पुढें तो चांभार हि तेल्याकडे चार आण्यानें महाग असलेलें तेल घेईल. म्हणजे ते गेलेले चार आणे परत येतील. तें महाग पडलें नाहीं. जेथें परस्पर व्यवहार आहेत तेथें महाग हा शब्द च येत नाहीं. ते गेलेले पैसे अन्य रूपानें परत येतात. त्यानें माझें महाग घेतलें व मी त्याचें महाग घेतलें कीं हिशेव सारखा. ह्यांत बिघडलें कोठें? महारानें खादी काढली, ती तेल्यानें घेतली. तेल्यानें तेल काढलें. तें महारानें घेतलें. तेल्याला खादी महाग, महाराला तेल महाग. एकूण एकच. तेलांत गेलें तें खादींत परत मिळालें व खादींत गेलें तें तेलांत परत मिळालें. एका हातानें द्यावयाचें व दुसऱ्या हातानें घ्यावयाचें; असा हा खेळीमेळीचा सहकार्याचा प्रकार खेड्यांत पूर्वी होता. परंतु तो आज लोपला आहे.

खेड्यांत प्रेम असतें, बंधु-भाव असतो. खेडयांतील लोक एकमेकांच्या गरजा पहाणार नाहींत तर तें खेडें च नाहीं. तें शहरासारखें होईल. शहरांतील लोक कोणी कोणाला विचारीत नाहींत. सारे स्वार्थासाठीं तेथें जमलेले असतात, जसा एखादा शेणाचा पुंजका असला कीं शेंकडों किडे तेथें जमतात; त्या सडू पहणाऱ्या शेणावर शेंकडों किडे लवलव करितात. ते किडे तेथें कां जमा झाले? त्या किडयाला विचारा, येथें कां रे आलास? तुझे कोणी वहीण भाऊ येथें आहेत का? तो किडा म्हणेल, मी शेण खाण्यासाटीं येथें आलों आहे आणि शेण खाण्यांत दंग आहें. मला जास्त वोलावयास सवड नाहीं. वर्फी, गूळ यांवर माशा जमतात त्या का एकमेकांच्या प्रेमामुळें? त्याप्रमाणें शहरांत माशांसारखीं जीं माणसें घोंगावत असतात तीं का प्रेमानें? शहरांत स्वार्थ व लोभ आहे. खेडें प्रेमामुळें वनतें. खेडयांत आग लागली

तर सारे कामें टाकून धांवत येतील. घरांत कोणी बसून राहील काय? परंतु मुंबईला काय होईल स्थिति? 'बंब जाईल, मला आहे काम.' असें सगळे म्हणतील. म्हणून एका कवीनें म्हटलें आहे,

"खेड्यांस देव निर्मी
नगरास निर्मि मनुज"

खेड्यांना देव बनवितो. शहरांना माणूस बनवितो.

आपले पूर्वज खेड्यांत रहात. आज जो उठला तो चालला शहरांत. आहे काय तेथें? तेथें पिवळे दगड असतात आणि धूळ असते. खरी लक्ष्मी खेड्यांत आहे. झाडांना फळें येतात, मळ्यांत गहूं होतो, ऊंस होतो, ही खरी लक्ष्मी. ही खरी लक्ष्मी विकून पांढरे पिवळे गोटे घेऊं नका. तुम्ही शहरांत जाऊन तेथून स्वस्त माल घेऊन येतां परंतु सारे च असें करूं लागले व खेडीं भयाण दिसूं लागलीं. खेडीं जर सुखी व्हावयास पाहिजे असतील तर हा शहरचा बाजार सोडा. खेड्यांतील वस्तु घ्या. खेड्यांत जी वस्तु नाहीं च होणार ती दुसरीकडून घ्यावयाची. परंतु दुसरीकडून घेतांना सुद्धां आधीं दुसऱ्या खेड्यांत तयार होत असेल तर तेथून घ्यावयाची हें विसरूं नका. समजा येथें बांगड्या होत नाहींत. त्या सोनगीरच्या घ्या. येथें लोटी चांगली होत नाहीं, सोनगीरची घ्या. येथें रंगारी नसेल तर मालपुरहून रंगवून आणा. मालपुर खेड्यांतील रंगारी तुमच्या खेड्यांतून सूत नेईल व तुम्ही त्याच्या गांवाहून रंगवून आणा. ज्या वस्तु होत नसतील त्यांच्यासाठीं इतर खेडीं शोधा. शहरांत कांहीं वस्तु आणावयास गेलां च तर हा प्रश्न विचारीत जा, खेड्यांत तयार झालेली आहे का? हातांनीं बनविलेली आहे का? आधीं ह्या वस्तु पसंत करायच्या. यंत्रांनीं बनलेला शहरचा तो माल होतां होई तों निषिद्ध मानावयाचा.

तुमच्या ग्रामपंचायतींनीं हीं कामें हातीं घेतलीं पाहिजेत. पंचायतीनें गांवचीं भांडणें सोडवावयाचीं हें काम आहे च. परंतु गांवांत काय काय बाहेरून येतें, गांवांतून काय काय बाहेर जातें ह्याची नोंद हि पंचायतीनें केली पाहिजे. चौकी ठेवून यादी करावी. नंतर ह्या वस्तु बाहेरून काय म्हणून

येतात, ह्या इथें च झाल्या पाहिजेत अशी खटपट करावी. विणकर नाहीं ? कापडण्याहून आणूं दोन मुलें शिकवून. माझ्या गांवांतील च वस्तु खरिदीन. माझ्या गांवांत होत नसेल ती गांवांत बनविण्याचा प्रयत्न करीन. असें प्रत्येकानें ठरविलें पाहिजे. गांवच्या पुढाऱ्यांनीं ह्यांत लक्ष घातलें पाहिजे. कसें होईल, काय होईल असें म्हणत बसूं नका. उठा व कामाला लागा कीं झट सारें होईल. तुमचे तुम्ही मग गांवांतील भाव ठरवाल. तेल्यानें तेल कसें विकावें, चांभारानें जोडा किती पैशांत शिवावा, विणाई विणकराची काय असावी, तुमचें तुम्ही ठरवाल. एकमेकांनां एकमेकांचें खरेदी केलें म्हणजे सारें च स्वस्त. स्वस्त व महाग हा शब्द च राहणार नाहीं.

तुमच्या गांवांत काय होणार नाहीं ? सांगा. एक, मीठ होत नसेल. ठीक. मीठ घ्या बाजारांतून. दोन, रॉकेल. वास्तविक रॉकेलशिवाय चालवितां आलें पाहिजे. पण नसेल च चालत तर तें घ्या. तिसरी गोष्ट म्हणजे कांहीं मसाल्याचे पदार्थ. मिरची तर होते च येथें. वास्तविक मिरची बंद च करा. मिरचीची शरीराला गरज नाहीं. काडयाची पेटी घ्यावी लागेल, शिवाय अवजारें घ्यावीं लागतील. तीं हि गांवांत तयार करण्याच्या उद्योगाला लागलें पाहिजे. पण तूर्त तीं घेतल्याशिवाय सुटका नाहीं. या वस्तु घ्या. रॉकेल एरंडी लावून हळूहळू कमी करा. परंतु या शिवाय बाकीच्या वस्तु गांवांत च करा. खादी गांवांत झाली पाहिजे. खादीच्या कपड्याला बटणें तीं तुताची खेड्यांत च करतां येतील. तीं दुसरीं बटणें कशाला ? तीं बटणें छातीवर नसतील तर तळमळेल कीं काय जीव ? नाहीं ना ? तर द्या तीं फेंकून. ती सांखळी कशाला ? तिच्या शिवाय चालेल ना ? जरूर नाहीं अशा वस्तु गांवांत आणाल तर त्या सांखळ्या सारवळदंडाप्रमाणें पायांत चसतील. गळ्याला गळफांस होतील. ह्या असल्या बाहेरच्या सांखळ्या आणून नटूं नका.

भगवान् श्रीकृष्ण कसा नटत असे ? तो का बाहेरच्या सांखळ्या घालीत असे ? वृंदावनांत मोरांचीं जीं पिसें गळलेलीं सांपडत त्यांनीं तो नटे. मोरांचीं पिसें तो उपटून आणीत नसे. मोरांचीं पिसें तो लावी, तर त्याला काय पिसें लागलें होतें ? तो का वेडा होता ? माझ्या गांवचे हे मोर, त्यांच्या

पिसांनीं मी नटलों तर हरकत नाहीं. त्यांत त्या मोराची हि पूजा आहे. तो डोक्यावर मोरमुकुट घाली आणि गळ्यांत काय घाली ? वनमाळा. माझ्या यमुनेच्या तीरावरचीं फुलें. तीं सर्वांना मिळतील. गरिबांस मिळतील, श्रीमंतांस मिळतील. ती स्वदेशी वनमाळा, खेड्यांतील वनमाळा, गळ्यांत घाली. आणि वाजवो काय ? मुरली. खेड्यांतील वांबूची नळी. तो वांबूचा पावा, ती बांसरी, हें त्यांचें वाद्य.

एक गृहस्थ जर्मनींत गेले होते. ते तिकडचा एक प्रसंग सांगत होते : " आम्ही सारे विद्यार्थी एकत्र जमलों होतों. फ्रेंच, जर्मन, इंग्लिश, जपानी, रशियन सारे एकत्र बसलों होतों. सर्वांनीं आपापल्या देशांतील राष्ट्रीय वाद्यें वाजवून दाखविलीं. फ्रेंचांनीं व्हायोलिन वाजविलें, इंग्लिशांनीं आपलें वाजवलें. मला हिंदुस्थानचें वाद्य वाजवून दाखवा असें सांगण्यांत आलें. मी गप्प बसलों. ते मला विचारूं लागले, 'तुमचें भारतीय असें वाद्य कोणतें ?' मला सांगतां आलें नाहीं. " मीं त्यांना म्हटलें, अहो, बांसरी हें आपलें राष्ट्रीय वाद्य. लाखों खेड्यांत तें आहे. साधें परंतु गोड. कृष्ण भगवानानें तें पवित्र केलेलें. घेतली वांबूची नळी, पाडलीं भोकें कीं झालें तयार ! असें हें वाद्य श्रीकृष्ण वाजवी. तें गोकुळांतील, स्वदेशी खेड्यांतील वाद्य होतें. बरें, श्रीकृष्ण काय खात असे ? बाहेरची साखर आणून का खात असे ? तो आपल्या गोकुळांतील दूध, लोणी खाई. इतरांना खायला शिकवी. गोकुळांतील ही लक्ष्मी मथुरेस गवळणी घेऊन जात. परंतु ही गांवची अन्नपूर्णा कृष्ण बाहेर जाऊं देत नसे. तो ती लुटून सर्वांना वाटी. सर्व गोकुळांतील मुलें त्यानें धष्ट पुष्ट केलीं. गोकुळावर ज्यांचे हल्ले आले, त्यांना आपल्या मित्रांना बरोबर घेऊन नाहीसें केलें. गोकुळांत राहून करी काय, गाई चारी. त्यानें वणवे गिळले म्हणजे काय केलें ? खेड्यांना जाळून टाकणारीं भांडणें तीं मिटविलीं. सर्व मुलें एकत्र जमविलीं. प्रेम वाढविलें. असा हा श्रीकृष्ण गोपाल कृष्ण आहे. तो तुमच्या गांवचा आदर्श आहे. गोपाल कृष्णानें खेड्यांचें वैभव वाढविलें. गाईंची सेवा केली. खेड्यांवर त्यानें प्रेम केलें. खेड्यांतील पशुपक्षी, खेड्यांतील नदी, खेड्यांतील गोवर्धन डोंगर, त्यांच्यावर त्यानें प्रेम केलें. खेडें म्हणजे त्याचा देव होता. पुढें ते द्वारकेचे राणे झाले

तरी पुन्हां गोकुळांत येत, पुन्हां गाई चारीत, शेणांत हात घालीत, गोठे झाडीत, वनमाला घालीत, बांसरी वाजवीत, मुलांत गोपवालांत खेळत. व्रजकिशोर हें त्यांचें आवडतें नांव. गोपाळ हें त्यांचें आवडतें नांव. गोकुळांत अपार आनंद व सुख त्यानें निर्माण केलें.

**गोकुळींच्या सुखा। अंतपार नाहीं देखा॥**

गोकुळाच्या सुखाला सीमा नव्हती. अशा त्या गोकुळांतील चार शितांचे कण मिळावे म्हणून देव डोकावत. यमुनेच्या पाण्यांत प्रेम-मस्त गोपाळबाळ जेवून दहीकाला खाऊन हात धुवावयास जात, तर देव मासे होऊन तीं शितें खात. त्यांच्या स्वर्गांत तें प्रेम होतें का ? त्या देवांना कांहीं कमी नव्हतें, परंतु प्रेम नव्हतें त्यांच्याजवळ. शहरें म्हणजे तुमचे स्वर्ग ना ? अरे तेथें प्रेम नाहीं. तेथें भोग आहेत, पैसे आहेत. परंतु आनंद नाहीं. तुमचीं खेडीं गोकुळासारखीं करा. मग ते शहरांतील नगरशेठ तुमच्या खेड्यांतील मीठ-भाकर मिळावी म्हणून धांवत येतील. खेडीं म्हणजे भरलें गोकुळ करायचें आहे. स्वावलंबी, आरोग्यसंपन्न, उद्योगशील, प्रेमळ, अशीं करावयाचीं आहेत. उंसाचें गुन्हाळ चाललें आहे, चरखा चालला आहे, पिंजारी पिंजीत आहेत, तेलाचा घाणा कुर्र करीत आहे, विहिरीवर मोट चालली आहे, चांभार जोडा शिवीत आहे, गुराखी गाय राखीत आहे व पांवा वाजवीत आहे, असें भरलेलें गांव दिसूं द्या. आपल्या चुकांनीं आपण खेड्याचा मसणवटा केला, आतां फिरून त्याचें गोकुळ करूं या.

कागद एरंडोलचा च घ्या. दंतमंजन राखुंडीचें च करा. ब्रश बाभळीच्या काडीचे बनवा. परदेशी कागदाच्या माळा आणि पताका नकोत. आपल्या गांवांतील झाडांचे पल्लव, आम्र-पल्लव, त्यांचीं तोरणें करा. गांवांतील झाडांचा अपमान कां करतां ? बाहेरच्या गांवांतील तोरणें लावाल तर गांवांतील झाडें रागावतील. त्यांना हि समारंभांत भाग घ्यायचा असतो. त्यांचे पल्लव आणा. आपल्या धार्मिक मंगल कार्यांत कागदांचीं का तोरणें सांगितलीं आहेत ? आंब्याचीं शुभ पानें पाहिजेत. आणि घडा पाहिजे, कलश पाहिजे. तो कशाचा असे ? तो टिनपॉटचा चालेल का ? तो पवित्र कलश मातीचा च पाहिजे. तुमच्या गांवच्या कुंभारानें बनविलेला तो च तेथें पाहिजे. पूर्वजांनीं गांवांतील

वस्तूंना च पहा कसें महत्त्व दिलें होतें! ही दृष्टि घ्या म्हणजे सारें गाडें वदलेल. निराळी सृष्टि सभोंवतालीं दिसूं लागेल. समृद्धि व आनंद दिसूं लागेल.

आपण लग्नाची गोष्ट पाहिली. वाजाराची पाहिली. आतां आधीं व्यसनांची गोष्ट घेऊं. आपल्या हातच्या गोष्टी आधीं विचारांत घेऊं. सरकार व सावकार मागाहून पाहूं.

कोणी सारखे फुंक फुंक विड्या च फुंकीत बसतात. म्हणतात, विड्या घरच्या आहेत. त्या कांहीं बाहेरच्या नाहींत. विष घरचें असेल तर तें खाल का? घरचें विष खाऊन अगदीं १०० नंबरी स्वदेशी मरण घ्याल वाटतें? विष घरचें काय किंवा बाहेरचें काय त्याज्य च. त्याचप्रमाणें व्यसनें तेवढीं वाईट. तीं सर्व सोडलीं पाहिजेत. तीं मारणारीं आहेत. दारूविषयीं म्हणाल तर पूर्वीं महाराष्ट्रांत दारू नव्हती. एल्फिन्स्टन साहेब होता पहिला गव्हर्नर महाराष्ट्राचा. त्यानें महाराष्ट्राचा इतिहास लिहिला आहे. त्यांत तो म्हणतो, "पेशव्यांच्या राज्यांत दारूचें उत्पन्न होत नसे" परंतु आतां दारू पिणारे गांवोगांव झाले आहेत. सरकार उलट त्यांची सोय करून देतें. पण सोय करून दिली म्हणून आपण दारू प्यायची कीं काय? हिंदुस्थानांत मुख्य दोन धर्म आहेत. हिंदु व मुसलमान. या दोन्ही धर्मांत दारू पिणें महापाप मानलें आहे. मुसलमान-धर्म दारू पिणें हराम मानतो. हिंदु धर्म दारू पिणें पंचमहापातकांतील एक पातक मानतो. दारू पिण्यानें आपण साधतों तरी काय? प्राणाचा, कुटुंबाचा, धनाचा व सर्वांहून प्रिय धर्माचा – सर्व वस्तूंचा – नाश !

विडी, दारू व तिसरें व्यसन म्हणजे ऊठवस भांडण करणें. कृष्णानें भांडणाचे वणवे गिळले. तंटा करूं नका. तंटा झाला च तर तो गांवांतल्या गांवांत चार सभ्य मिळून सोडवा. कोर्ट-कचेऱ्यांकडे धांव घेऊं नका. कोर्ट-कचेऱ्या तुमच्या गांवांतल्या गांवांत च पाहिजेत. वस्तु गांवांतील तसा न्याय हि गांवांत च. तुमच्या गांवांत सारें पिकतें, परंतु न्याय पिकत नसेल तर कसें होईल? गांवांत वस्त्र, तसें गांवांत न्याय. बाहेरचीं कोर्टें काय कामाचीं? वस्तूंच्या बाबतींत जसें परावलंबन नको तसें न्यायाच्या बाबतींत हि नको. प्रेमानें नांदा. थोडें कमी जास्त दुसऱ्याकडे गेलें तरी तें गांवांत च

आहे. परंतु तिकडे लांब गेलें तर 'नाहीं मला, नाहीं तुला,' अशी स्थिति होईल. गांवांत च पांचामुखीं परमेश्वर आहे. त्याची कास धरा.

भोजनें वगैरे इतर चाली यांचा येथें ऊहापोह करीत नाहीं. जीवन निर्मळ व विचारपूर्वक चालवा. प्रत्येक गोष्ट विवेकानें, विचारानें करीत चला.

आतां चौथी गोष्ट सावकार. तुम्ही घरीं च कापूस रेचून बियांपुरती सरकी ठेवलीत, घरीं च कपडा केला, भुईमुग, जवस घरीं ठेवून गांवांतील घाण्यावरून च तेल काढून घेतलें, कोर्ट-कचेऱ्या बंद केल्या आणि भांडणें गांवांत च मिटवलीं, लग्न मीं सांगितलें त्या प्रकारानें लावलें, म्हणजे सावकाराची गरज वरी च कमी लागेल. परंतु असें करून हि सारे सावकारांच्या पाशांतून मुक्त होतील असें नाहीं. कर्जबाजारीपणा राहील. त्याला आळा बसेल एवढें खरें.

तुमच्या कर्जबाजारीपणाचा संपूर्ण प्रश्न स्वराज्याशिवाय सोडवितां येणार नाहीं. स्वराज्यांत सगळ्या सावकारांचे हिशेब तपासण्यांत येतील. ज्या सावकारांना मुद्दलाइतकें व्याज मिळालें असेल, त्यांचें देणें संपलें असें ठरूं शकेल. ज्या सावकारांचें मुद्दल हि घरांत गेलें नसेल–व्याजाच्या रूपानें मुद्दल घरांत गेलें नसेल–त्यांच्याशीं तडजोड करूं. अशा कोणत्या तरी मार्गानें तो प्रश्न सोडवावा लागेल. तटस्थ पंच नेमून, चौकशी करून, काय तें करावें लागेल. तोंपर्यंत आज सांगितलेल्या उपायांनीं जावयाचें व हळूंहळूं आनंग होऊन सावकारापासून दूर रहावयाची खटपट करावयाची. परंतु कर्ज द्यायचें म्हणून मुलाबाळांची आबाळ करूं नका, मूलाबाळांना, दूध-तूप द्या. नीट खायला द्या. मुलें साऱ्या समाजाचीं. मी माझ्या सावकाराला सांगेन, 'मुलांना थोडें दूध देऊं का ? माझ्या मुलाबाळांना गरज आहे.' मुलें जशीं आईबापांचीं तशीं तीं सावकाराचीं पण आहेत. तीं साऱ्या देशाचीं आहेत. तुम्ही मुलांना देत असतांना सावकाराला च देत असतां. म्हणून पोटाला आधीं पोटभर द्या. मुलाबाळांस द्या. वरच्या गरजा भागवून मग कर्ज द्यावयास जा. कर्ज द्यावयाचें च आहे. चैन करून नव्हे; खाऊन पिऊन उरलें तर आणून देऊं असें सावकाराला सांगा.

अशा रीतीनें चार गोष्टी मीं सांगितल्या. खेड्यांतील लक्ष्मी बाहेर जाण्याचे चार मार्ग सांगितले व त्यांना बंद कसें करतां येईल त्याची दिशा हि दाखविली. आतां पांचवी गोष्ट सरकार. हें सरकार कसें बंद करावयाचें ? तुम्ही स्वतःच्या वस्तु बनवूं लागा. आपल्या खेड्यांत बनवूं लागा. म्हणजे सरकार आपोआप ताळ्यावर येईल. सरकार येथें कां राहिलें आहे ? इंग्लंडचा माल सोपेपणानें आम्हां मूर्खांवर लादतां येतो म्हणून. परंतु उद्यां शहाणे होऊन गांवें स्वावलंबी करूं तर सरकार आपोआप नरम येईल. वस्तु लागेल ती खेडयांत च बनवायची. आपल्या खेडयांत जी बनणार नाहीं ती दुसऱ्या खेडयांतून घ्यावयाची. शहरांतील कारखान्यांवर बहिष्कार व परदेशी वस्तु तर नाहीं च नाहीं. परदेशी व देशी कारखान्यांना आपल्या खेड्यांतून तुम्हीं जें खाद्य देऊन राहिलां आहांत तें बंद करा. त्याचप्रमाणें एकी करा, भांडूं नका. भांडले तरी गांवांत च त्याचा निकाल करा. कोर्ट-कचेऱ्यांचें तोंड पहावयाचें नाहीं असें ठरवा. गांवांतील च वस्तु, गांवांत च न्याय, असें जर कराल तर एका दगडानें दोन कामें होतील. दारिद्र्याचा त्रास सरेल व सरकार पळेल. तुम्ही असे स्वावलंबी, निर्व्यसनी, उद्यमी व एकोप्यानें वागणारे व्हा. मग तुमचे हक्क सरकार दिल्याशिवाय राहणार नाहीं. तुमची इतकी ताकत वाढली असून हि सरकार ज़र हक्क देणार नाहीं तर मग आहे च सत्याग्रह. तो जो सत्याग्रह होईल तो थोड्याथोडक्यांचा सत्याग्रह होणार नाहीं. त्यांत सारी च जनता सामील होईल.

तुम्हीं शेतसारा दहा हजार देतां. परंतु कापडासाठीं २५ हजार देतां. आतां असें समजूं या कीं हें सरकार कांहीं लवकर जात नाहीं. त्याचा शेत-सारा कमी होत नाहीं. स्वराज्य मिळाल्यावर कमी करूं. ती पुढची गोष्ट. परंतु तूर्त कपडा गांवांत च तयार करायचा असें ठरविलें तर काय होईल ? प्रत्येकाला सरासरी ३ शेर रुई लागेल. ३ शेर रुई प्रत्येकाला ह्याप्रमाणें घरांत ५ माणसें धरलीं तर १५ शेर रुई लागेल. पेरायला लागणाऱ्या सरकीपुरता चांगला कापूस शेतांतून वेचून वरीं च रेचा. उत्कृष्ट सरकी पेरायला मिळेल. जी रुई होईल तींतून घराला लागणाऱ्या कापडापुरती राखून ठेवावी व बाकी विकून टाकावी. प्रत्येक माणसाला पक्की तीन शेर

रुई म्हणजे माणशीं १। रुपयाची. ३२०० माणसांना ४–५ हजाराचा कापूस ठेवावा लागेल. २५ हजाराचा कपडा लागेल. त्यांतून हे ५ हजार रुपयें वजा केले म्हणजे बाकी २० हजार रुपये गांवांत राहिले. सरकार शेतसारा दहा हजार नेईल परंतु तुम्ही २० हजार वांचवाल. म्हणून तर गांधी म्हणतात कीं खादी म्हणजे च स्वराज्य. एका खादीनें च २० हजार रुपये गांवांत राहिले. उद्यां समजा स्वराज्य मिळालें तर काय होईल ? शेतसारा निम्मा म्हणजे १० हजाराचा ५ हजार होईल. म्हणजे तुमचे ५ हजार रुपये वांचतील. पण खादी वापरल्यानें २० हजार रुपये वांचतील. तेव्हां आतां खरें स्वराज्य कशांत आहे हें ओळखा. पूर्वी इतर राज्यें आलीं तरी हें खेड्यांतील खरें स्वराज्य कधीं गेलें नव्हतें. म्हणून आपण भिकेस लागलों नाहीं. परंतु या राजवटींत हें खादीचें स्वराज्य, खेड्यांतील उद्योगधंद्यांचें स्वराज्य, गेलें व म्हणून खेडीं भयाण दिसूं लागलीं. इंग्लंडला तुमच्या करापेक्षां, शेतसाऱ्यापेक्षां, या कोट्यवधि रुपयांचा जो व्यापार त्याचा आधार आहे. शेतसाऱ्यांतून त्याला दहा हजार मिळतील. परंतु तुम्हांला कपडा देऊन तो २० हजार नेईल. साखर, रॉकेल, वगैरे शेंकडों अशा च वस्तु आहेत. म्हणून खरें स्वराज्य ओळखा. सरकार पराक्रम करून केव्हां घालवितां येईल तें मग पाहूं. परंतु तोंपर्यंत या मीं सांगितलेल्या मार्गानें आपापलीं खेडीं स्वावलंबी, उद्यमी, प्रेमानें नांदणारीं अशीं करा. त्यांत च सारें कांहीं आहे.

ग्रा. से. वृ. ५ ४

---

# २४ खेडेगांवचें आरोग्य

परवां पवनारचा एक मुलगा रस्त्यांत भेटला. म्हणाला, "मला खांडकें झालीं आहेत, काय करावें ?" तेव्हां त्याला थोडक्यांत मंत्र सांगितला, "रोज सकाळीं गाईचें ताजें ताक पीत जा, म्हणजे तुझा रोग जाईल." खेडेगांवच्या माझ्या एकूण अनुभवावरून मी अशा निर्णयावर आलों आहें, कीं गाईचें

ताजें ताक हें खेडेगांवचें एक मोठें तारक तत्त्व आहे. त्यासाठीं मीं संस्कृतांत एक सूत्र रचलें आहे : "तक्रं तारकम्."

खेडेगांवांत खांडकें, खरूज, गजकर्ण इत्यादि चर्म-रोग लहान मुलांपासून म्हाताऱ्यांपर्यंत सर्वांना दिसून येतात. त्यांचीं कारणें मला आढळलीं, तीं उपायांसह नमूद करतों.

१ **अस्वच्छ राहणी**— त्यांतल्या त्यांत स्नानाची हेळसांड. स्नान रोज न करणारे आहेत च. पण जे रोज करणारे आहेत, त्यांचें हि स्नान 'स्नान' म्हणतां येणार नाहीं. त्याला मराठींत 'आंघोळ' शब्द रूढ झाला आहे, तो कदाचित् शोभेल. कारण 'आंघोळ'चा अर्थ मी समजलों आहे, "अंग ओलें करणें." पण पुष्कळवेळां तर असें दिसून येतें, कीं देहाचा कांहीं भाग तर पुरता ओला सुद्धां होत नाहीं. ह्यासाठीं घरांत नीट आडोसा असलेली एक स्नानाची जागा पाहिजे. आणि तिथें नग्न-स्नान करण्याची पद्धति रूढवली आणि शिकविली पाहिजे. गुह्य अवयव स्वच्छ धुतले पाहिजेत. हा एक सार्वत्रिक शिक्षणाचा विषय आहे.

२ **पिण्याचें अस्वच्छ पाणी**—विशेषतः नदीकांठच्या गांवांत आणि त्यांत हि पावसाळ्यांत, लोकांच्या पिण्यांत जें पाणी येतें, तें अति च घाणेरडें असतें. ह्याला कमींत कमी उपाय उकळून पाणी पिणें हा आहे. हरिजन-वस्तींत तर स्वच्छ पाणी लाभायचें च नाहीं. हरिजनांच्या पाण्याचा प्रश्न, हा अगदीं सामान्य भूतदयेचा प्रश्न आहे. असल्या साध्या प्रश्नाकडे हि जो समाज दुर्लक्ष करील त्याची स्वराज्याची पात्रता कशी सिद्ध व्हावयाची?

३ **आहारांतील उणिवा आणि चुका**—ह्या सदराखालीं तीन मुख्य दोष आढळून येतात. ह्यांना मी खेड्याच्या आहारांतील त्रिदोष म्हणतों.

(अ) आहारांतील चूक ज्याला म्हणतां येईल, ती म्हणजे सडलेली किंवा किडलेली वस्तु वापरणें. खेड्यांत मांस आणि मासळी, जी विकत घेऊन खाल्ली जाते ती, बहुतेक 'सडलेली' म्हणतां येईल. महारोग वाढून राहिला आहे. त्याच्या कारणांचा पुरता छडा अजून तज्ज्ञांना लागलेला नाहीं. परंतु एक कारण सडलेली किंवा घाणेरडी मासळी खाणें, हें आहे.

'किडलेलें' म्हणजे मजुरांच्या पदरांत पडणारें धान्य, हें पुष्कळवेळां रद्दींतलें रद्दी असतें. ह्या बाबतींत खेडेगांवच्या महाजनांनीं लक्ष दिल्याशिवाय सुधारणा होणें अशक्य आहे.

( आ ) खेड्यांच्या आहारांतली एक मोठी उणीव, म्हणजे नित्याच्या जेवणांत भाजी नसणें. भाजीच्या महत्त्वाविषयीं अधिक लिहिण्याची गरज नाहीं. कारण, ती एक सर्व–मान्य बाब आहे. शेतकऱ्यांच्या आहारांत कांहीं ऋतूंत तर मुळीं च भाजीचें नांव नसतें. "धान्याच्या चौपट भाजी खाल्ली पाहिजे" असें म्हणण्यापर्यंत कांहीं छांदिष्टांची मजल आहे. असलें कांहीं मला म्हणावयाचें नाहीं. उलट, भाजीचें प्रमाण सामान्यतः अल्प च बरें, असें मी मानतों. तथापि रोजची माणशीं दहा तोळे भाजी तरी शेतकऱ्यांच्या भोजनांत अवश्य आहे, असें समजलें पाहिजे.

( इ ) आहारांतील दुसरी उणीव, म्हणजे ह्या लेखाच्या आरंभीं उल्लेखिलेलें गाईचें ताक. रोजच्या जेवणांत कांहीं तरी पाचक अम्ल तत्त्व अवश्य आहे. गाईचें ताजें ताक, हें थोड्या प्रयत्नानें सर्वांना आणि रोज मिळण्यासारखें उत्तम अम्ल आहे. पण त्याशिवाय दुधांतलें सर्व ओज (प्रोटीन) ताकांत आहे. खनिजें हि त्यांत भरपूर आहेत. वऱ्हाड-नागपूरकडच्या ग्रामीण आहारांत अम्ल बहुतेक नसतें च. ज्वारीची भाकर आणि मीठ व हळद टाकलेलें साधें वरण, ह्या दोन उत्तम् वस्तु त्यांच्या जेवणांत असतात. त्याशिवाय बेसनाचें पिठलें, ज्याला ते 'चून' म्हणतात आणि ज्यांत मिरची इत्यादि जिह्वादंश टाकलेले असतात, ती एक गौण वस्तु ते आवडीनें खातात. त्यामुळें खरूज इत्यादि रक्तदोषाचे रोग फार आढळतात. असे अनेक रोग सकाळच्या न्याहरींत पावशेर ताजें ताक देऊन तेवढ्यानें च दुरुस्त होतात, असें मीं पाहिलें आहे.

इतकें ताक सर्वांना थोड्या प्रयत्नानें मिळण्यासारखें आहे, म्हणून वर म्हटलें. पण तेवढा प्रयत्न तरी, केला तर व्हायचा ना ?

ग्रा. से. वृ. ६-१

# २५ खादीचें समग्र-दर्शन

जेलमध्यें थोडाफार तटस्थ चिंतनाला अवकाश मिळतो. तेथें आपल्या चळवळीसंबंधीं त्या च प्रमाणें हिंदुस्थानच्या आणि एकूण जगाच्या परिस्थितीसंबंधीं विचार चांगला झाला, चर्चा हि झाली. एकंदर परिस्थिति कठिण झालेली दिसत होती. अशा वेळीं कोणते उपाय करण्यासारखे आहेत हा विषय आम्ही तिथें चिंतीत असूं. परंतु जेलमधून सुटून आल्या-नंतर थोडया च दिवसांत जपान आणि अमेरिका युद्धांत पडून आधींची च कठिण परिस्थिति अधिक च कठिण झाली. त्यामुळें जेलमध्यें करून ठेवलेले कांहीं विचार अपुरे पडले, तर कांहीं दृढावले. ह्या युद्धाला विरोधी कारणें देतांना पहिलें कारण युद्धाची हिंसकता, दुसरें कारण उभयपक्षीं न्यूनाधिक पण साम्राज्यवादी तृष्णा, तिसरें हिंदुस्थानची संमति न घेणें, अशी तीन कारणें आम्ही देत असूं. परंतु जपान आणि अमेरिका यांच्या प्रवेशानंतर आतां बहुतेक सबंध जग च युद्धांत पडल्यासारखें झालें. अर्थात् आतां हें युद्ध मानवाच्या हातांत न राहतां उलट युद्धाच्या च हातांत मानव गेला असल्यामुळें हें युद्ध स्वैर किंवा मूढ आहे हा एक नवा मुद्दा निर्माण झाला. वासुदेव कॉलेजमध्यें* बोलतांना त्यावर च मीं मुख्य उभारणी केली होती.

परंतु अशा रीतीनें जगांतील सगळीं मोठीं राष्ट्रें युद्धांत सामील झाल्या-नंतर हिंदुस्थान, जो मूळचा च दरिद्री आणि विषम परिस्थितींतला, तो अधिक च विषम परिस्थितींत आतां जात आहे. इंग्रजी राज्य येण्यापूर्वी हिंदुस्थान स्वावलंबी होता. इतकें च नव्हे तर आपली गरज पुरवून पर-देशाला हि तो थोडाफार पुरवठा करीत होता. परंतु आज पक्क्या मालाच्या

---

* 'युद्धाचें टोणपें लक्षण' हें तें व्याख्यान होय.

बाबतींत हिंदुस्थान जवळ जवळ पूर्ण परावलंबी झालेला आहे. राष्ट्रीय रक्षणाचीं साधनें, युद्धविषयक सरंजाम वगैरे बाबतींतल्या परावलंबनाची गोष्ट मी बोलत नाहीं—यद्यपि अहिंसेचा मार्ग मोकळा नसल्यास राष्ट्र-बुद्धीनें विचार करायचा तर ही हि बाब चिंतावी लागते च—परंतु जीवनोपयोगी नेहमींच्या मालासंबंधीं मी बोलत आहें. असा माल आज हिंदुस्थानांत होत नाहीं आणि बाहेरून तो तूर्त कमी च येऊं शकेल. लढणारीं राष्ट्रें युद्धोपयोगी सामान च निर्मिण्याच्या फिकरींत असणार, त्यामुळें बाहेर पाठविण्यासाठीं माल त्यांच्यापाशीं कमी तयार होणार, आणि इतक्याउपर जो माल तयार होईल तो दुसऱ्या राष्ट्रांना न पोंचावा अशी व्यवस्था शत्रु-राष्ट्रें करणार ! अमेरिकेचा माल येऊं लागल्यास जपान तो बुडवीत राहील आणि जपानचा माल तर येऊं च शकणार नाहीं. अशा रीतीनें बाहेरचा पक्का माल येण्याचें मंदावलें किंवा थांबलें तर हिंदुस्थानची दशा अतिशय दीनवाणी होईल. नवीन पक्का माल इथें च बनविण्यासंबंधीं सरकार कदाचित् हेतुपूर्वक न म्हटलें तरी परिस्थितीच्या निमित्तानें पण उदासीन राहील. लढाईंत सर्व चित्त गुंतल्यामुळें दुसऱ्या गंभीर योजना सुचणें कठिण. जो कांहीं गांभीर्य-पूर्वक विचार व्हायचा तो युद्धविषयक च व्हायचा. हिंदुस्थानचें कसें तरी रक्षण – आणि रक्षण म्हणजे इंग्रजांच्या हातांत तो टिकून राहणें – झालें म्हणजे पुरें, अशी च सरकारची मनोवृत्ति राहिली तर त्यांत कांहीं नवल वाटायला नको.

अशा स्थितींत आम्हां कार्यकर्त्यांवर मोठी जबाबदारी येऊन पडते. एरवीं, खादीचा खप फारसा होत नाहीं, त्यासाठीं लोकांची मनधरणी करावी लागते, असा लोकांवर आक्षेप होता. आतां हल्लींच्या युद्धाच्या परिस्थितींत, आम्ही लोकांना खादी पुरवूं शकत नाहीं, असा आक्षेप आमच्यावर येणार आहे. अशा संकटकाळांत जर खादीला आपण चालना देऊं शकलों नाहीं, तर खादीविषयीं भविष्यकाळीं आशेला फार थोडी जागा उरणार आहे. जाजूसाहेबांनीं 'खादी-जगत्' मध्यें नुकती च एक योजना मांडली आहे. तींत त्यांनीं हें पटवून दिलें आहे कीं सरकारला दुसरे जे कांहीं उद्योग बेकारांना देतां येतील ते देऊन हि शक्ति हार खाईल आणि मूक शिल्लक

उरेल तर तितक्या अंशानें खादीला वाव देणें सरकारचें कर्तव्य आहे. कसल्या हि सरकारला खादीचें हें कार्यक्षेत्र प्रायः कबूल करावें लागेल. पण ही योजना म्हणजे उघड च जिथें आपला प्रवेश होत नाहीं अशा ठिकाणीं हिकमतीनें आपलें गांठोडें ठेवून देण्यासारखें आहे. आमचें घर बळकावून बसलेल्या माणसाला म्हणायचें कीं "बाबा! घर तुझें च सही, पण तें तुला अगदीं भरलेलें वाटतें तसें नाहीं. ती त्या पलीकडच्या कोपऱ्यांत थोडी रिकामी जागा दिसते आहे. हें माझें गांठोडें तिथें राहूं दे." आणि कमींत कमी अपेक्षित सद्‌गुणांवर हा हल्ला असल्यामुळें त्याचा परिणाम व्हायला च पाहिजे.

परंतु अशा रीतीची दुष्काळी खादी हा खादीचा पाया नव्हे. आज जी खादीची उत्पत्ति-विक्री चालली आहे, तो हि तिचा पाया नव्हे. तो एक इमारतीचा भाग जरूर आहे. खादीच्या अंतिम योजनेमध्यें हि उत्पत्ति-विक्रीचा भाग राहील आणि आजच्यापेक्षां तो पुष्कळ च जास्त राहील. परंतु संपूर्ण योजनेंतलें तें एक अंग झालें. तसें च आज जें ठिकठिकाणीं वस्त्रस्वावलंबन चाललें आहे, कुठें या गांवांत चार वस्त्रस्वावलंबी लोक, कुठें त्या तालुक्यांत शेंदोनशें, असें ठिकठिकाणीं करीत जायचें, त्यानें हि आपलें मुख्य काम होत नाहीं. तें म्हणजे ठिकठिकाणीं चौकांत म्युनिसिपालिटीचे दिवे लावल्यासारखें आहे. त्याचा हि उपयोग आहे च. त्यानें सगळीकडचें वातावरण प्रकाशित राहील. परंतु चौकांतले दिवे घरांतल्या दिव्यांचें काम करीत नाहींत. म्हणून हें असलें विखुरलेलें वस्त्रस्वावलंबन हि खादीचें मुख्य कार्य नव्हे. शेतकरी आपल्या शेतांत धान्य काढतो तसा आपला कपडा त्यानें घरीं च काढावा, हा खादीचा पाया आहे.

सुरवातीला च हें काम कदाचित् जमलें नसतें म्हणून आपण वेगळ्या रीतीनें खादीची उभारणी केली, तें हि ठीक झालें. त्यानें खादीला चालना मिळाली. आणि थोडीफार खादी आपण देऊं शकलों. परंतु आतां लोकांची खादीची मागणी वाढेल. आपण ती आजच्या पद्धतीनें पुरवूं शकणार नाहीं. अशा स्थितींत जर आपण लाचार होऊन स्वस्थ बसलों तर आपल्यावर दोष येईल आणि तसा तो आला तर न्यायानें च येईल. कारण खादीला वीस वर्षांचा

अवकाश मिळून चुकला आहे. हिटलरनें वीस वर्षांत पडलेलें राष्ट्र उभें केलें. १८ सालीं जर्मनीचा पुरा पराभव झाला आणि ३८ सालीं तें पहिल्या दर्जाचें राष्ट्र म्हणून उभें झालें. रशियानें जें बळ कमावलें तें हि गेल्या वीस वर्षांत च कमावलें. एवढ्या काळांत त्यानें एक नवीन विचाराची आणि आचाराची जगाला आकर्षिण्यासारखी प्रणाली रचली. खादीला हि अशीं च वीस वर्षें संधि मिळाली असें मानलें जाईल. एवढ्या अवकाशांत खादी विशेष चमत्कार करूं शकली नाहीं याला कारणें पुष्कळ आहेत. आणि म्हणून जर्मनीशीं किंवा रशियाशीं तोलून आपण आपणाला हिणवून घ्यायची जरूर नाहीं. तरी पण अशा संकटाच्या काळीं जर आपण लाचार झालों तर मग मीं मघां म्हटल्याप्रमाणें खादीसाठीं एक कोपरा दाखवून तेवढ्यावर संतुष्ट व्हावें लागेल. पण मग खादीची मुख्य दृष्टि—जिला अहिंसेच्या योजनेंत केंद्रस्थान आहे—सोडल्यासारखी होईल. खादीचें आणि अहिंसेचें नातें हिंदुस्थानांत तरी अतूट समजलें पाहिजे.

खादीची लोकांची मागणी वाढली म्हणजे आपण लोकांना सांगणार—'सूत कांता'. तर ते म्हणतील, 'आम्हांला पेळू पुरवा'. आणि आपल्या चळवळींतला पेळू हा एक मोठा द्वाड भाग आहे. पेळूच्या पुढचे भाग त्या मानानें सोपे आहेत. परंतु पेळूचा प्रश्न शास्त्रीय किंवा लौकिक रीतीनें हि आपण अजून सोडविला नाही. मग लोकांना सांगावें लागणार कीं 'तुम्ही पिंजून घ्या.' म्हणजे तांतीचा प्रश्न आला. मजबूत तांतीची व्यापक मागणी एकदम पुरविणें शक्य होणार नाहीं. म्हणजे काम अडलें. याचा जसजसा मी विचार करतों तसतशी माझी नजर त्या दशयंत्र-पिंजणावर जाते. पांच आणि पांच मिळून दहा बोटांनीं जें काम होतें त्याला दशयंत्र म्हणतात. सोमरस दहा बोटांनीं पिळला जातो म्हणून वेदांत "दशयंत्राः सोमाः" असा उल्लेख येतो. तसें हें खांडण-विंचरणाचें दशयंत्र-पिंजण आहे. तें फार लाभदायी आणि बहुतेक सर्व आपत्तींतून बचावणारें ठरणार आहे. परवां मी खरांगण्याला गेलों असतां तिथें हें दशयंत्र-पिंजण करून दाखविलें. प्रेक्षकांपैकीं एकानें 'मी करून पाहतों' म्हणून बघतां बघतां १५–२० मिनिटांत उत्तम जरी नाहीं तरी बऱ्यापैकीं पेळू बनविला. शिकण्याला हें इतकें

सोपें आहे. ह्याची गति हि व्यवहार-सुलभ झाली आहे. तत्संबंधीं कांहीं बोधक आंकडे वल्लभस्वामींच्या लेखांत आले असून ह्याहून अधिक आकर्षक नवे आंकडे हि हातीं आले आहेत. नागपूर जेलमध्यें केलेल्या प्रयोगांच्या आधारावर मीं जेलमधून एक लेख हि यावर लिहिला होता. रामदासजी गुलाटी यांना खांडण-विंचरण करून दाखविलें तेव्हां त्यांनीं तर सांगितलें कीं मिलच्या पेळूमधील बहुतेक सर्व अंगें या पेळूंत येतात आणि शास्त्रीयदृष्ट्या हा जवळ जवळ निर्दोष पेळू आहे. हें दशयंत्र-पिंजण सार्वत्रिक करण्यासाठीं ह्या विषयीं आणखी शोध, प्रयोग इथें ग्रामसेवामंडळांत झाले पाहिजेत. त्या च प्रमाणें गांधीसेवासंघ, चरखासंघ यांनीं हि याला चालना दिली पाहिजे. ह्यानें खादीच्या कामांतली फार मोटी अडचण दूर होण्याचा संभव आहे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट विणकरवर्गानें स्वतः कांतून त्याची च खादी तयार करावी, ही आहे. जाजूसाहेबांनीं इकडे सर्वांचें लक्ष वेधलें च आहे. हिंदुस्थानांत विणकरांचा मोठा वर्ग आहे. युद्धाच्या काळांत त्यांची सोय कोठें च होणार नाहीं. म्हणून या खादीच्या कामांत त्यांना लावणें अवश्यक आहे. विणकर जर स्वतः कांतून विणील तर आज त्याला इतरांनीं कांतलेलें बेरंवाईट आणि कसेंबसें सूत विणण्यांत जी मजूरी मिळते त्यापेक्षां कमी मजूरी पडणार नाहीं, हें अनेक आंकडे काढून मीं पाहून घेतलें आहे. त्याला स्वतःचें कांतलेलें विणणें अधिक सुखावह तर होणार च आहे. ह्या बाबतींत हि व्यापक प्रयोग होण्याची गरज आहे.

या बरोबर च त्या त्या ठिकाणच्या वस्त्रस्वावलंबी लोकांचें सूत त्या त्या ठिकाणीं विणण्याची सोय लागेल. त्यासाठीं स्वावलंबी लोकांचें सूत सुधारलें पाहिजे. सूत सुधारायचें म्हणजे पुनः दशयंत्र-पिंजणाकडे च लक्ष जातें. सामान्य यंत्रपिंजण एरवीं उपयुक्त मानलें तरी युद्धाच्या काळांतील व्यापक योजनेंत तें कुचकामाचें आहे. त्या यंत्रांत जितका शास्त्रीय पेळू होत नाहीं तितका तो ह्या दशयंत्रांत होतो असा माझा दावा आहे. परंतु हें दशयंत्र-पिंजण उर्फ खांडण-विंचरण कापसापासून व्हायला पाहिजे ही गोष्ट यांत गृहीत आहे. आज सर्वत्र प्रायः रुईपासून पुढच्या क्रिया होतात त्याऐवजीं

कापसापासून च त्या केल्या पाहिजेत. शेतकऱ्यानें आपल्या शेतांतला उत्तम मोठ्या बोंडाचा स्वच्छ कापूस राखून ठेवला पाहिजे. तो कापूस मग सळी-फळी सारख्या साधनानें रेचून घेतला पाहिजे. सळीफळीच्या रेचांतली प्रायः एक हि सरकी वायां जाणार नाहीं आणि उत्तम वेचक बोंडें निवडून घेतल्यामुळें निर्भेळ असें सुंदर बीं शेतकऱ्याला मिळून त्याचें शेत भरारेल. कापसापासून आरंभिण्याचे असे अनेक लाभ आहेत. ते रुईपासून आरंभिण्यांत आपण गमावून बसतों. खादीचें समग्र-दर्शन वस्तुतः इतक्या मजबूत अर्थ-शास्त्रावर उभें आहे कीं त्याहून अधिक स्वस्त कांहीं च सिद्ध होणार नाहीं. पण त्याऐवजीं खादीच्या नांवानें मधली च एक तुटक प्रक्रिया समजणें म्हणजे खादीला विनाकारण बदनाम करून घेणें आहे.

समग्र-दर्शनाचा हा विचार कार्यकर्त्यांनीं नीट लक्षांत घेण्यासारखा आहे. गिरण्या स्वस्त पडतात असें बोललें जातें. आम्ही हिशोबानें त्या महाग आहेत हें दाखवितों. त्यांत व्यवस्थापकवर्गाचा भारी खर्च, यंत्र, घसारा, वाहतूक, मालकांचा अजस्र नफा इत्यादि अनेक आपत्ति उघड आहेत. परंतु इतक्या सर्व आपत्ति मिळून हि गिरणी स्वस्त वाटते तर त्यांत कांहीं जादू तरी असली पाहिजे किंवा आम्ही मांडतों ते आक्षेप खोटे असले पाहिजेत. परंतु आक्षेप तर खोटे म्हणतां येत नाहींत. म्हणून त्यांत जादू आहे हें च खरें. आणि ती जादू ही आहे कीं गिरणी म्हणजे एका सबंध यांत्रिक रचनेच्या सांखळींतला एक दुवा आहे. मोठ्या कारखान्यांत मुख्य उद्योगाबरोबर तत्संबद्ध दुसरे हि लहानसहान उद्योग करविले जातात. त्यासाठीं म्हणून तो कारखाना चालत नसतो. म्हणून त्यांना गौण पैदास म्हणतात. अशा गौण पैदाशींतून मिळालेल्या फायद्याचा लाभ कारखान्याच्या मुख्य कामाला दिला जातो. आणि असें सगळें मिळून मग तो कारखाना परवडतो. गिरणीची अशी च स्थिति आहे. ती एका संपूर्ण विचार-शृंखलेचा दुवा आहे. गिरण्यांबरोबर आगगाड्या आल्या. शांततेच्या काळांत माल नेण्या-आणण्याचें त्यांचें मुख्य-कार्य. मग त्याबरोबर यात्रेकरूंना हि त्याचा लाभ दिला जातो. लोकांना दूर दूर जाण्याची संवय लागते. मग त्यांचे लग्नसंबंध हि दूर दूर होऊं लागतात. आणि अशा रीतीनें आगगाडी त्यांच्या जीव-

नांतली एक अवश्यक वस्तु होऊन बसते. मग तिचा लाभ घेऊन गिरणीवर स्वस्तपणाचा आभास निर्मितां येतो. आगगाडीचें हें एक उदाहरण दिलें. अशा अनेक गोष्टी गिरणीबरोबर उभ्या आहेत त्यामुळें गिरणी स्वस्त भासत आहे. एकटी गिरणी विचारांत घेतली तर ती फार च महाग ठरते. हा च न्याय खादीला लागू केला पाहिजे. खादीची केवळ एक च बाब विचारांत घेतली तर ती महाग वाटेल. पण असा तुटक विचार करतां येत नाहीं. एखाद्या सुंदर माणसाच्या शरीराचे वेगवेगळे अवयव कापून जर आपण सौंदर्य पाहूं लागलों तर कसें होईल? कापलेलें नाक का सुंदर होणार आहे? आरपार भोकें दिसतील त्यांत. पण असे पृथक् केलेले अवयव जरी स्वतंत्र-पणें सुंदर दिसले नाहींत तरी ते च सगळे मिळून शरीराला सौंदर्य देतात. समग्र जीवन लक्षांत घेऊन त्यांतला खादी हा एक दुवा आहे असा विचार केला, म्हणजे मग खादीजीवन हें मिलजीवनापेक्षां कितीतरी स्वस्त दिसेल.

खादींत वाहतुकीचा प्रश्न च नाहीं. ती जिथल्या तिथें च व्हायची. ती घरच्याघरीं व्यवस्थित असायची. म्हणजे व्यवस्थापकांचा छेद. कापडाच्या गरजेपेक्षां विनाकारण अधिक कापूस पेरावयाचा नाहीं. म्हणजे कापसाचा बाजारभाव आपल्या हातचा. निखळ बोंडें वेचून घेऊन तीं घरच्या घरीं रेचल्यामुळें पेरायला उत्तम सरकी मिळायची, आणि त्यामुळें शेती विशेष प्रफुल्लित आणि जोरदार व्हायची. बाकीची सरकी विकावी न लागतां सरळ गाईला मिळाली म्हणजे दूध, तूप, बैल उत्तम लाभायचे. वस्त्रस्वावलंबना-पुरतीं मोकळीं बोंडें सळीफळीच्या किंवा तत्सम गुण असलेल्या रेच्यावर रेचलीं म्हणजे त्यांतली ताजी स्वच्छ रुई पिंजायला सुलभ जायची. धनुर्यंत्रांत ती उत्तम पिंजली गेल्यामुळें सूत समान मजबूत निघायचें. सूत उत्तम झाल्यामुळें विणायला सोपें जायचें. उत्तम विणलें गेल्यामुळें तें शरी-रावर अधिक टिकायचें. आणि कपडा अधिक टिकल्यामुळें तितक्या प्रमाणांत कापसाच्या लागवडीच्या जमिनीची बचत व्हायची. आणि ह्या सगळ्याला तेलघाणा इत्यादि ग्रामोद्योगांची जोड देऊन मग ती खादी स्वस्त पडते कीं महाग पडते याचा विचार केला, म्हणजे ती मुळीं च महाग पडत नाहीं असें दिसायचें. खादीचें हें 'समग्र-दर्शन' डोळ्यांत भरलें म्हणजे

खादीकार्य कापसापासून न आरंभितां रुईपासून आरंभिण्यांत केवढी घातक भूल आहे हें तर लक्षांत येईल च, पण एकूण सर्व च खादीकार्य सांगोपांग करण्याची दृष्टि लाभेल.

आणखी एक गोष्ट सांगायची आहे. त्यानें समग्र-दर्शन अधिक स्पष्ट होईल. आणि तो एक स्वतंत्र मुद्दा हि आहे. ५-६ वर्षांपूर्वींची गोष्ट आहे. रेल्वेच्या प्रवासांत असतांना माझा चरखा उघडून मी कांतूं लागलों. आधीं च डोळे वाईट, त्यांत गाडीचे धक्के हि लागत होते त्यामुळें सावकाश कांतून हि थोडें तुटत होतें च. तुटल्यावरोवर माझ्या तत्त्वाप्रमाणें मी तें जोडून घेत होतों. माझ्या शेजारीं एक गृहस्थ वसले होते. बी. एस्सी. झाले होते ते. माझें हें सगळें ते लक्षपूर्वक पहात होते. थोडया वेळानें म्हणाले, " तुम्हांला थोडें विचारायचें आहे. " मी म्हटलें, " विचारा. " ते म्हणाले, " तुटलेलें जोडत वसण्यांत तुम्ही इतका वेळ घालवितां त्याऐवजीं तें तसें च जाऊं दिलें तर अर्थशास्त्रदृष्ट्या तें अधिक लाभाचें नाहीं का ठरणार ? " मीं त्यांना म्हटलें, " अर्थशास्त्र दोन प्रकारचें आहे : एक आंशिक अथवा एकांगी आणि दुसरें परिपूर्ण. पैकीं एकांगी अर्थशास्त्र न घेतां परिपूर्ण अर्थशास्त्राची कसोटी लावणें च योग्य आहे. " ते म्हणाले, "वरोवर आहे". मग मीं त्यांना विचारलें कीं " तुम्ही थोडें तुटलेलें वायां गेलें तरी चालेल म्हणतां तर त्याची मर्यादा काय ठरवितां ? किती टक्के माफ करतां ? " ते म्हणाले, " पांच टक्यांपर्यंत माफ करायला कांहीं हरकत नाहीं ". मग मी म्हणालों कीं जोडतां येत असून हि पांच टक्के सूत तुटूं देणें याचा अर्थ काय होतो तें पाहण्यासारखें आहे. याचा अर्थ असा आहे कीं असा कांतणारा वसल्या वसल्या कापसाच्या लागवडीच्या शंभर एकरांपैकीं पांच एकर लागवड जाळून टाकतो. तांतीच्या शंभर कारखान्यांपैकीं पांच कारखाने वेकार करतो. कांतणाऱ्यासाठीं बांधलेल्या शंभर इमारतींपैकीं पांच इमारती पाडून टाकतो. हिशोवाच्या शंभर वह्यांपैकीं पांच वह्या फाडून टाकतो, इत्यादि. शिवाय टक्यांचा न्याय ज्याला मानवला त्याच्या जीवनांतील सर्व च व्यवहारांना तो ग्रासणार. त्यांतून होणारी हानि किती भयानक ठरेल हें सहज समजण्यासारखें आहे. जेवतांना पात्रांत कोणीं अन्न टाकलें तर आपल्यांत त्याला माजोरी म्हणतात. कारण, पात्रांत

टाकणें याचा अर्थ शेतकऱ्याच्या बैलांपासून रसोय करणाऱ्या आईपर्यंत सर्वांची मेहनत तो बुडवितो असा आहे. म्हणून पात्रांत टाकल्यामुळें आई रागावते तेवढें च बस नाहीं. नांगरणाऱ्या बैलानें त्याला एक लाथ मारली पाहिजे आणि शेतकऱ्यांपासून पुढच्या सर्वांचा एकेक टप्पू त्याला मिळाला पाहिजे.

म्हणून कोणतो हि वस्तु सामग्र्यानें पहावी लागते. एवढ्यासाठीं च गीतेंत ईश्वर-ज्ञानाला हि '**असंशयं समग्रं**' हीं विशेषणें जोडलीं आहेत. खादीच्या आपल्या चळवळीला आणि योजनेला समग्र-दर्शनाची फार गरज आहे. समग्र-दर्शनपूर्वक जर आपण खादीला चालना देऊं तर आणि तर च ती व्यापक होऊं शकेल. आमच्या कसोटीचा हा काळ आहे. तसा तो खादीच्या व्यापक शक्यतेचा हि अवसर आहे. त्यासाठीं माझ्या सूचना मीं थोडक्यांत मांडल्या आहेत. त्याचा मंडळींनीं यथायोग्य उपयोग करावा.

ग्रा. से. वृ. ५-११

---

# २६ यंत्रयुग आणि खादी

माझ्या मित्रांनो,

नागपूरला मी कांहीं अगदीं अपरिचित नाहीं. तुमच्यांतील कांहीं चेहरे परिचित आहेत. तथापि बऱ्या च वर्षांत नागपूरला मी आलों नाहीं. ह्या वेळीं आलों तो हि नशिबानें च आलों. कारण मीं येण्याची मुळीं च कल्पना केली नव्हती. गांधी-सप्ताहाच्या निमित्तानें सुद्धां मी बाहेर विशेषसा जात नाहीं. परंतु आज येथें येण्याचें कोणतें कारण झालें, टाळू नाहीं. ज्या प्रांतांत आपण राहतों त्यांतील मुख्य शहरांत काय स्थिति आहे ती पहायला

---

[गांधी-सप्ताहनिमित्त ता. ६-१०-४० ला नागपूर येथें झालेलें व्याख्यान.]

मिळेल अशा कांहीं अस्पष्ट विचारानें आलों. आलों तरी बोलण्याची जबाबदारी पत्करली नाहीं. तुम्ही कांताल त्यांत आपण हि कांतूं अशा च अभिप्रायानें आलों. तथापि ज्याला तोंड आहे त्याचें मौनाचें व्रत च असेल तर गोष्ट वेगळी, एरव्हीं त्यानें बोललें पाहिजे!

येथें पाहतों, फारशी मंडळी कांततांना दिसत नाहींत. परंतु त्यामुळें मी निराश होत नाहीं. पुष्कळ लोक खादीचा प्रसार होत नाहीं म्हणून निराश होतात. पुष्कळ लोकांना खादीचा उत्साह नाहीं हें पाहून माझा उत्साह वाढतो, विश्वास दृढावतो. कांतण्याचा, खादीचा, प्रसार जर सोपा असता तर मला त्यांत उत्साह वाटता ना. चहाचें पहा ना. पाहतां पाहतां त्याचा प्रसार झाला! तशी खादी पसरली नाहीं. तशी ती पसरली असती तर चहा, बिडी, अफू इत्यादि पदार्थांच्या च लायकीची ती झाली असती. खादी ही केवळ बाह्य वस्तु नाहीं, तो एक विचार आहे. आणि विचाराचें असें असतें कीं पटल्याशिवाय तो कोणी घेत नाहीं. पटल्याशिवाय च जर कोणी विचार घेऊं लागला तर मानवपणा—विचारीपणा—त्याच्यांत कमी आहे, असें च म्हटलें पाहिजे. महाराष्ट्रांत चिकित्सकपणा जास्त आहे असें म्हणतात. पण हें खरें नाहीं. चिकित्सकपणा चांगला. पण महाराष्ट्रांत तो पुरेसा नाहीं, अशी माझी तक्रार आहे. अंध श्रद्धा असते तशी अंध अश्रद्धा हि असते. आंधळेपणाचा रोग एकट्या श्रद्धेला च होत नाहीं. तो अश्रद्धेला हि लागू होतो. आंधळी अश्रद्धा म्हणजे चिकित्सकपणा नव्हे.

या नागपूर शहरांत हजारों दुकानें आहेत. त्यांत खादीचें व ग्रामोद्योगाचें दुकान एक कीं दोन! असें कां असावें? म्हणे हें यंत्रयुग आहे. खादीग्रामोद्योगाचा टिकाव येथें कसा लागावा? कोठून आलें हें यंत्रयुग? जसे ते कलियुग मानणारे असतात ना—पुरुषार्थशून्य, बावळे कलियुग-वादी; तसे च हे कळयुगवादी यंत्र मानणारे! कोणीं लादलें आहे तें माणसावर? मी आश्रमांत असतों. रोज किती तरी आगगाड्या ये-जा करीत असतात. त्यांचा आवाज ऐकतों. हजारों मैल हजारों मणांची ने-आण त्या करीत असतात. पण मला तर ती गाडी माझ्या इच्छेविरुद्ध हलवूं

शकत नाहीं. चेतनाला मला ती अचेतन हलवणार कशी? माझ्या आवर्तींभोंवतीं, मागें-पुढें, खाली-वर,–सर्व अव्ययें वापरा तुम्हीं–यंत्रयुग आहे. पण मी त्याचा स्वीकार केल्याशिवाय तें यंत्रयुग मला करील काय? मला व्यापील कसें? दिव्याला जर कोणी सांगूं लागलें, कीं 'अहो, अंधाराचें युग पसरलें आहे, चोहोंकडे घनदाट अंधार पसरला आहे.' तर तो दिवा काय म्हणेल? तो म्हणेल 'तुम्ही काय बोलतां कांहीं समजत नाहीं. जरा दाखवा तर तो अंधार कसा असतो तो! पुरचुंडीभर घेऊन या तो अंधार. पाहूं द्या तो मला माझ्या नजरेनें.' पण तो अंधार दिव्यासमोर आपलें तोंड काळें करतो. नव्हे, त्याचें काळें तोंड पांढरें होतें. दिव्यासमोर तो येत च नाहीं. तसें च यंत्रयुगाचें. आपण करूं तसें युग होईल. युग काय आकाशांतून उतरत असतें?

हिंदुस्थान आणि चीन हे दोन प्रचंड लोकसंख्येचे देश आहेत. चाळीस व पंचेचाळीस कोटि लोक जुन्या रीतीनें शेती करतात. इतर सर्व मोठमोठीं राष्ट्रें यंत्रयुगी राष्ट्रें आहेत. त्यांच्यांत आतां हे ऊंस कोणी किती पिळावे ह्याची चढाओढ लागली आहे. जेव्हां चरकवाले थोडे होते आणि ऊंस पुष्कळ होते तेव्हां ठीक चाललें. आतां ऊंस झाले थोडे आणि चरक झाले पुष्कळ. आज त्यामुळें च युरोपांत आणि इतरत्र युद्ध, भयंकर युद्ध, चालू आहे. पुराणांत एक मजेदार कथा आहे. सुंद आणि उपसुंद नांवाचे दोन अति बलाढ्य राक्षस होते. दोघे सख्खे भाऊ होते. देवांना त्यांचा धाक पडला. तेव्हां देवांनीं तिलोत्तमा नांवाची एक बाई निर्माण केली. तिला पाहून दोघे हि राक्षस भुलले. प्रत्येकजण 'ही माझी' म्हणून म्हणूं लागला. बाई पडली एक व हे दोघे. दोघांत भांडण जुंपलें. दोघांनीं आपल्या गदा उचलल्या. ते युद्धांत भिडले. बाई पहात च राहिली. त्यांनीं क्रॉस केला गदांचा. ह्याची गदा त्याच्या डोक्यांत आणि त्याची ह्याच्या. कवि म्हणतो,—'**सुंदाची उपसुंदीं उपसुंदाची गदा पडे सुंदीं।**' हें दृश्य पहायला गणपति हजर होता. कवि पुढें म्हणतो,—'**तन्मरणमुदद्वयासें गणपतिच्या कळ नुटेल कां तुंदीं॥**' जे गणनायक आहेत त्यांना चालू युद्ध पाहून हसूं येत आहे.

नुकता च तीन राष्ट्रांत पॅक्ट झाला आहे. कशासाठीं झाला आहे हा पॅक्ट? जे यंत्रयुगांत, आपल्या चरकांत, सांपडले नाहींत त्यांना पिळण्यासाठीं. एका चोरानें विचार केला कीं मी आतां सर्वोत्तम धंदा करणार-चोरीचा. ह्या धंद्याला भांडवल लागतें दहा-बारा आण्यांचें आणि मिळकत होते लाखाची. ती हि थोडक्या च दिवसांत. एखाददुसरा हा धंदा करतो आणि बाकीचे सर्व तो करीत नाहींत म्हणून हें चालतें. पण सर्वांनीं च तो करायचें ठरविलें तर? तर चालायचें नाहीं. भिक्षेचा धंदा हि असा च. सिद्धान्त च आहे हा कीं जी वस्तु व्यापक केली म्हणजे आपला गळा कापून घेते, ती अभद्र होय. चोरी, भिक्षा व्यापक केल्या असतां मरतात. यंत्राचा धंदा हि असा च मरतो. ॲडम स्मिथनें अर्थशास्त्र लिहिलें आहे. अर्थशास्त्र म्हणजे त्याच्या व्याख्येप्रमाणें पैसे मिळविण्याचें शास्त्र. त्यानें सर्व जगाचा विचार केला नाहीं. आपल्या राष्ट्राचा तेवढा केला आणि दिलें ठोकून कीं यंत्रानें संपत्ति वाढते. पण कोणाची? आणि कां? जे यंत्रें वापरतात त्यांची. आणि इतर लोक वापरत नाहींत म्हणून. पण यंत्रानें संपत्ति वाढते हें खरें आहे का? आपल्या हिंदुस्थानांत माणशीं एक एकर जमीन पडते. कापूस-ताग, डाळ-दाणा, जवस एरंडी जें काय काढायचें तें त्या एका एकरांतून. मेल्यावर पुरायचें तें देखील त्याच्यांत च! आतां यंत्रानें का ह्या एक एकराची दीड एकर जमीन होणार आहे? पण तो म्हणतो पीक लवकर निघेल ना? पूर्वीं म्हणत होता यंत्रानें श्रीमंत होतो मनुष्य; आतां म्हणतो, काम लवकर होतें, माणसाला फुरसत मिळते. यंत्रानें मनुष्य श्रीमंत होत नाहीं. यंत्रानें हातचलाखीचे खेळ होतात. ह्या खिशांतील पैसा त्या खिशांत जातो इतकें च.

बरें, यंत्रामुळें काम लवकर आटोपून माणसाला करमणुकीला, मनोरंजनाला, अवकाश मिळतो, फुरसत मिळते, ह्यांत तरी कांहीं तथ्य आहे का? यंत्रावर तीन-चार तास काम करावें, बाकी म्हणे मौज करावी, चार घटका रेडियो ऐकावा. मी म्हणतों, तुझा तो रडया रेडियो रडला! म्हणे चार तास कावाड-कष्ट करा! अरे, मी चोवीस तास आनंद भोगणारा आनंदी जीव आहें. आणि तूं मला चार तास यंत्रावर चढवणार? राजा उदार झाला आणि हातीं भोपळा दिला! एक यंत्र आहे लोखंडाचें, त्यासमोर दुसरें

यंत्र उभें करायचें—माणसाचें. धागा तुटला कीं ह्यानें जोडून द्यायचें. कोठें खुट झालें कीं चट हा धावला च तेथें. क्षणाची फुरसत नाहीं जिवाला. बोलायची हि सोय नाहीं. तीव्र काम करा, मग तीव्र आनंद घ्या. असें हें तुमचें यंत्र-युगाचें तंत्र ! एकजण मला म्हणाला, 'सिनेमा पाहून फार आनंद होतो. टॉकी पाहून, ऐकून आनंद च आनंद होतो.' मीं म्हटलें, रोज पहात असशील तूं मग ?' तो म्हणाला, 'नाहीं. दोन तीन दिवसांआड पाहतों.' मीं म्हटलें, 'सालांतून तीनशें पासष्ट दिवस कां नाहीं पहात ? लाभ, दोन, तीन असें मोजीत च जा ना ! बरें, ज्या दिवशीं सिनेमा पाहतोस त्या दिवशीं झोप कशी येते ? गाढ येते का ?' 'नाहीं. सिनेमाचीं चित्रें दिसतात स्वप्नांत.' किती दुःखाची गोष्ट ! गाढ झोंप नाहीं. गाढ झोंपेहून दुसरें कांहीं अधिक आनंदाचें आहे काय ? झोंपेचें असें आहे कीं तिच्या पूर्वीचा कार्यक्रम अगदीं सौम्य असावा लागतो. म्हणजे ती चांगली लागते. सुई कशी असते निमूळती होत गेलेली एका टोकाला ! तशी कार्यक्रमाची तीव्रता झोंपेपूर्वी क्षीण होत, सूक्ष्म होत, सौम्य होत गेलेली पाहिजे. पुढें तो म्हणाला, 'तुम्ही च सांगा मला कां आवडतो सिनेमा ?' मीं म्हटलें बरोबर च आहे. तूं सिनेमा पहावास आणि तुझ्या आनंदाची मीमांसा मीं करावी ? धाग्यानें बिघडावें आणि माणसानें त्याला दुरुस्त करावें. तुला आनंद होतो सिनेमा पाहून; कारण तीव्र दुःखाचा कार्यक्रम असतो तुझा दिवसां. तीव्र दुःखाच्या कार्यक्रमामुळें तीव्र आनंदाचा विषय हवासा वाटतो. आम्ही आपला चोवीस तास आनंद भोगणार. आणि सावकाश काम हि करणार चोवीस घंटे. कांही घाई नाहीं. माझा कार्यक्रम असा राहील. मी आमच्या गांवठी नांगरानें सावकाश नांगरीन, मग बैलांना पाणी पाजीन, स्वतः भाकरी खाईन, मग जरा आंग टाकीन. मग चरखा कांतायला बसेन. या यंत्रयुगांत मी काम असें च सावकाश करणार. प्रत्येक काम माझा आनंद च असेल; तें नांगरणें, तें बैलांना पाणी पाजणें, तें चरखा कांतणें. अशा रीतीनें सकाळपासून संध्याकाळपर्यंत मी आनंद भोगीन. आत्म्याचें आनंद लक्षण आहे. मी अनात्मा होऊं इच्छीत नाहीं. चोवीस तास फुरसत, चोवीस तास आनंद, चोवीस तास काम, असें कां जमूं नये ? काम थोडक्यांत आटोपून टाकायचें

आणि हवा मात्र दिवसभर नाकानें आंत घ्या, पुन्हां बाहेर टाका, असा उपद्व्याप कां करायचा ? चोवीस तासांची हवा एकदम च घेऊन टाकूं असें कां म्हणत नाहीं ? प्राणायामवाले तर आणखी च सावकाश श्वासोच्छ्वास करा म्हणतात. हें यंत्रयुग आहे बाबांनो, घेऊन टाका भराभर हवा एकदांची ! पण तें जमत नाहीं ! मग चोवीस तास जसा आपण श्वासोच्छ्वास करतों, तसें चोवीस तास काम करून चोवीस तास फुरसत घ्या ना ! भिकारड्यासारखें थोडा वेळ फुरसत कां मागतां ? फुरसत मनाचा धर्म आहे.

काँग्रेसचीं मंत्रि-मंडळें आतां नसल्यामुळें फुरसत मिळाली आहे मंत्र्यांना. एक माजी मंत्री, कारभारी, आले होते माझ्याकडे. ते म्हणाले, 'आम्ही वीज पुरवूं शकतों. खेड्यापाड्यांना स्वस्तांत देऊं वीज. अगदीं खेडोखेडीं रेडियो लावून द्यावा. शेतकरी सुखी होतील. त्यांना आनंद मिळेल.' मीं ऐकून घेतलें व म्हटलें, 'आधीं द्या तर खरें.' मग पाहूं. पण माझी खरी अडचण आहे ती ही कीं तो शेतकरी इतका अरसिक असेल का रेडियो ऐकायला ? तो बेकार माणूस नाहीं रेडियो ऐकायला. त्याला आपल्या बायकोशीं, आपल्या मुलांबाळांशीं, संध्याकाळीं शेतांतून परत आल्यावर बोलायचें असतें, गोष्टी करायच्या असतात, आपल्या गाईगुरांच्या अंगावर प्रेमानें हांत फिरवायचा असतो. त्याचा हा सर्व आनंदाचा कार्यक्रम असतो. त्याच्या दृष्टीनें आपलें घरदार, आपलीं मुलेंबाळें, आपलीं गाईगुरें ह्या सर्व विश्वाचें केंद्र असतात. तो उपनिषदांतील ऋषि म्हणतो ना ? 'मी ह्या सगळ्या जगाचा मध्यबिन्दु आहें !' तसेंच त्या शेतकऱ्याचें आहे. इंग्लंडचे लोक म्हणतात, 'सर्व जगाचें केन्द्र इंग्लंड आहे. येथून सर्वत्र व्यापार होतो.' मीं म्हणतों, सगळ्या जगाचा मध्यबिन्दु पवनार आहे. त्या शेतकऱ्याचें मत आहे, ह्या सर्व जगाचा मध्यबिंदु मी आहें, माझी शेती आहे, माझें घरदार, माझीं गाईगुरें आहेत. आणि तुम्ही फ्रान्सच्या जगत्प्रसिद्ध चित्रशाळेंत गेलां तर तेथें तुम्हांला ह्याचा प्रत्यय येईल. काय दिसेल तुम्हांला तेथें ? एक लाकूडतोड्या, पाणी भरणारी एक बाई, नांगर थांबवून सूर्याला नमस्कार करणारा एक शेतकरी ह्यांचीं चित्रें तिथें टांगलेलीं दिसतील. उनसांतील

उत्तम चित्रें म्हणून मोठमोठे चित्रकार त्यांची वाखाणणी करतात. ज्याच्या दिवाणखान्यांत तसलीं चित्रें नाहींत त्याला अरसिक म्हणतात. मग ज्यांच्या जीवनांत हें सर्व प्रत्यक्ष आहे ते किती रसिक, किती आनंदी असतील बरें ? परंतु दयाळु लोक काय म्हणतात ? शेतकरी विचारा उन्हातान्हांत राबतो, किती कष्ट सोसतो, पण त्याला खायला भाकरी हि नाहीं ! ह्यांत शेतकऱ्यांचीं दोन दुःखें वर्णिलीं आहेत; (१) त्याला उन्हांत राबावें लागतें आणि (२) त्याला खायला मिळत नाहीं. पैकीं दुसरें, दुःख म्हणून मान्य. पण पहिलें तर सौख्य. ऊन मिळालें नाहीं तर झाडें फिकीं पडतात. उन्हांत आरोग्य लाभतें. शेतकरी शेतांत काम करतात, तेवढेंच त्यांना स्वातंत्र्य मिळतें, खुली स्वच्छ हवा मिळते. एरवीं त्यांचीं घरें कशीं असतात? घराला एक च दरवाजा. खिडकी एक हि नाहीं. कवाडें लावलीं कीं घराची पेटी होते आणि अशा पेटींत त्याला रात्र काढावी लागते. पण दिवसां तो मोकळ्या शेतांत काम करतो तेवढी त्याला अपार श्रीमंती लाभते. मुंबईचा श्रीमंत, १००० रुपये मासिक भाडें देणारा ! त्याच्या घराला सहा खिडक्या असतात. आणखी दोन खिडक्या किंवा जरा खुली गच्ची पाहिजे म्हटल्यास थैलीचें तोंड हि जास्त खुलें करावें लागतें. सहा खिडक्यांचें घर असलेला जर श्रीमंत, तर तो शेतकरी ज्याच्या शेताला, उर्फ त्या उन्हांतल्या घराला-बिन भिंतीच्या घराला-अनंत खिडक्या आहत तो किती श्रीमंत म्हणावयाचा ! त्याच्या त्या श्रीमंतीपासून त्याला दूर करूं नका. त्याचें तें खुल्या हवेंतील, ऊबदार प्रकाशांतील जीवनाचें भाग्य त्याला अंधाऱ्या कोंदट कारखान्यांत कोंबून हिरावूं नका. त्याच्या जीवनांत इतर सुधारणा करा. त्याला घरीं तयार केलेलें ताजें लोणी, नवनीत, खायला सांगा. उरलेलें श्रीमंतांना देत जा म्हणा. ते कांहीं वैरी नाहींत. त्यांना यज्ञावशेष देत जा. भाजी फळें खायला शिकवा. भाजी फळें खेड्यांत मिळत नाहीं म्हणे ! मग काय तीं नागपूरला गच्चीवर पिकतात ? शेतकऱ्याचें जीवन किती आनंदी आहे ! हे लोक त्याचें अनुकरण करतात. कुंड्यांत झाडें लावून तीं घरीं ठेवतात, कित्येक तर खोटीं फुलें घरांत ठेवतात.

मग ज्या जीवनाची तुम्ही नक्कल करतां तें अस्सल जीवन खरोखर

किती आनंदाचें असलें पाहिजे! यंत्रानें फुरसत कसली मिळते? तीनशें लोक-वस्तीचा गांव; त्यांत सहा शिवण्याचे सांचे. दोन सांच्यांना हि जेथें पुरें काम मिळणें नाहीं तेथें सहा सांचे काय करणार? ही-का फुरसत झाली? यंत्रानें संपत्ति वाढते हें पहिलें म्हणणें तर चुकीचें ठरलें च. यंत्रांतून का मोसंबी संत्रीं पडतात, का दूध निघतें? सर्वांनीं च यंत्र स्वीकारलें तर तें दोन गुंडांच्या शर्यतीसारखें होईल. जो मोठमोठ्यानें बोलतो तो सभा जिंकतो. पण हें असें कां? तर दुसरे सर्व शांत बसतात म्हणून! यंत्र हें असें च बोंब मारणारें साधन आहे. सर्वांनीं च तो कार्यक्रम आरंभिला म्हणजे मग कोणाचा च आवाज ऐकूं येणार नाहीं. पण यंत्रानें मनुष्य श्रीमंत होतो हें एक, थोडें तरी खरें आहे. दुसरा यांत्रिक उत्पादन करीत नाहीं तोंवर यंत्रोत्पादन करणाऱ्याला मिळतो पैसा. परंतु यंत्रामुळें फुरसत मिळते हें दुसरें तर सफाई खोटें आहे. फुरसत म्हणजे 'बेकारी' अशी व्याख्या असली तर गोष्ट वेगळी.

आजचें बॉंबचें युद्ध आहे. एकजण टनाचा बॉंब करतो तर दुसरा सव्वा टनाचा. हे असे मोठे आंकडे घेऊन गणित कां करतात न कळे! बळानें कधीं वादाचा निर्णय लागत असतो का? तें तर शुद्ध न्याय-बुद्धीचें काम आहे. पण बळानें च निर्णय लावायचा तर हे मोठमोठे अवाढव्य आंकडे कशाला? संक्षेपरूप द्या ना त्यांना. $\frac{३५}{२८}$ म्हणायच्या ऐवजीं $\frac{५}{४}$ म्हणा. ह्याचे ४० लाख आणि त्याचे ३० लाख मारायच्या ऐवजीं कुस्तीनें कां लावीत नाहींत निर्णय? ती भीम-जरासंधाची नव्हती झाली कुस्ती? त्यांत प्रजेचें कांहीं नुकसान झालें नाहीं. राजेराजे लढले. परंतु अशानें निर्णय होत नाहीं. हीं शस्त्रें एकमेकांना मारणार. मरणार हें यंत्रयुग. परंतु तुम्हीं च जगवायचें ठरविलें. तें तर तुम्ही धन्वंतरी अहां. तुम्ही चेतन अहां. तुम्ही तें सुरू करूं शकतां. म्हाताऱ्यांकडे मी लक्ष देत नाहीं. म्हातारे च ते. पण तरुण लोक यंत्रयुग आलें म्हणून म्हणतात! मी त्यांना विचारतों, तुम्ही कोण आलां? एक होता बाप. एक होता मुलगा. बाप सायकलवर हिंडे. मुलगा म्हणे, मला सायकल पाहिजे. बाप म्हणाला, कशाला हवी सायकल? पाय कशाला दिले तुला मग? मुलगा म्हणाला, सायकल चालवायला! मुलगा

यंत्रयुग च आला होता.

एकजण माझ्याकडे आला. त्याला विचारलें, कसा आलास? तो म्हणाला सायकलस्वार. पण खरोखर ही भ्रान्ति आहे. तो सायकलघोडा होता. गाडीला घोडा समोरून ओढतो. तो सायकलला वरून ओढतो इतकें च. बाकी आहे तो घोडा च. स्वार नव्हे. मोटरसायकलवाल्याला एक वेळ स्वार म्हणतां येईल. कारण, नैसर्गिक शक्तीनें ती चालत असते. रिक्षा मनुष्य ओढतो आणि त्यांत माणसें बसतात. खरोखर हें लाजिरवाणें आहे. मनुष्य-प्राणी गाडीला जुंपण्याजोगा नव्हे. सायकलचें हुबेहूब असें च आहे. सवा-सवाशें पौंड वजनाचीं माणसें दुसऱ्याच्या सायकलवर बसतात आणि बसवून हि घेतात. वस्तुतः सायकल चालविणाराच्या मागें जो सायकलवर बसतो तो त्याच्या खांद्यावर च बसतो. परंतु खोट्या मापेमुळें दोघांच्या हि हें लक्षांत येत नाहीं. उद्यां मी पुनमचंदजींच्याकडे आलों आणि म्हटलें, 'पुनमचंदजी, जुता रिक्षेला—हा बसलों मीं' तर तें कसें होईल? सायकलवर दुसऱ्याला बसवून घेणें म्हणजे रिक्षा ओढणें च आहे. कोणी आजारी असेल त्याला सायकलवर घेतलें तर ती गोष्ट वेगळी. एरव्हीं तें अयोग्य होय. विचार करून ग्राह्याग्राह्य ठरवत चला. उगीच नवीन म्हणून सर्व स्वीकारीत जाऊं नका. तो हार्मोनियम! 'यत्र धूमस्तत्र वह्निः' तसा जेथें हार्मोनियम तेथें फुटका आवाज. त्याचा तो भों आवाज! त्यापेक्षां गाढवाचा आवाज काय वाईट आहे? तो चांगला च आहे. गाढवाच्या आवाजांत कारुण्य प्रगट होतें. हार्मोनियमच्या आवाजांत तें हि नाहीं. गाणाऱ्याचा फुटका आवाज लपविणें एवढा च त्याचा उपयोग. वास्तविक तंतुवाद्यासारखें वाद्य नाहीं. त्यांत बरोबर नेमका स्वर दाखविला जातो. पण तेथें अक्कल, बारकावा, कला लागते. लोक अकलेला कंटाळले आहेत. हार्मोनियमचा प्रसार झाला आणि सतार मागें पडली, याचें कारण हें च. यंत्रयुग माणसाला बेअक्कली करीत आहे. याचा पुरावा म्हणजे युरोपांत चाललेलें युद्ध. लोकांच्या वर्तनें कांहीं लोक चांगले-वाईट ठरवतात आणि म्हणतात हात वर करा. इंग्रजींत म्हणतात, या गिरणींत ५०० हात आहेत. तेथें डोक्याचें काम च नाहीं. युरोपांतील डोकीं खोकीं बनलीं आहेत. तेथें मतमोजणीच्या नांवानें

हातमोजणी होते. यंत्रयुगानें अशी बुद्धिहीनता पसरत आहे. हातमोजणीच्या ह्या यांत्रिक लोकशाहीमुळें च ही हुकुमशाही आली आहे. तिनें आज अनर्थ मांडला आहे.

तुम्हीं तसूभर सूत न काढलें तरी चालेल. पण विचार करा. विचार करायला शिका. गांधींच्या कार्यक्रमांत विचार, विकास, बुद्धि आहे कीं नाहीं तें पहा. तुम्हांला त्यांत तीं आढळलीं तर तुम्ही तो घ्या.

ग्रा. से. वृ., ४-११

---

## २७ खादीचें गृह्य-शास्त्र[†]

आपण पुष्कळ दिवसांपासून सूत कांतणारी मंडळी आहों. कांतण्यांत वाकबगार आहोंत. उत्तम खांडण-विंचरण करून बारीक सूत कांततों. ही आपली राष्ट्राची सेवा आहे असें आपण समजतों. आणि तें योग्य हि आहे. पण ती च सेवा पुरी करायची तर आपण स्वतः बारीक सुताचें कापड न वापरतां जाड कापड वापरलें पाहिजे. राष्ट्राला पुरें पडण्याइतकें बारीक कापड तयार होईपर्यंत हा आपणां सेवकांचा धर्म आहे. राष्ट्रांत जाडीभरडी खादी थोडीफार तयार होत च आहे. ती आपण वापरून ज्यांचें बारीक कापडाशिवाय चालणार नाहीं त्यांच्यासाठीं आपलें सूत समर्पण केलें पाहिजे. तसें पाहिलें तर जाड कापडांत जितका लाभ आहे तितका बारीक कापडांत नाहीं च. जाड कापड वापरणें ही खरोखर श्रीमंती आहे. जाड कापडाचें शरीराशीं होणारें घर्षण आरोग्यदायी आहे. तथापि बारीक कापडाचें हि स्थान आहे. आणि बारीक कापड कांहीं प्रमाणांत राष्ट्राला लागेल च. म्हणून बारीक कांतलें पाहिजे च आणि तें हि असें कांतलें पाहिजे कीं ज्याचें कापड वर्षभर टिकेल. आपल्या बारीक सुताचें

---

† पवनारच्या परिश्रमालयांतील मंडळींशीं चर्चिलेल्या कांहीं मुद्द्यांचें टांचण.

कापड वर्षभर टिकलें कीं नाहीं हें पाहण्यासाठीं आपण ज्यांना तें देऊं त्यांना त्या विषयींची नोंद ठेवायला सांगूं म्हणजे आपलें काम होईल. आपणा स्वतःला तें वापरण्याची गरज च नाहीं.

आपल्यासाठीं आपण जाड खादी खरीदूं. ती हि बिनधुतलेली कोरी खरीदली पाहिजे. धुवट खादी जी भांडारांत मिळते ती माझ्या दृष्टीनें अगदीं च कुचकामाची. ह्या खादीला धुवट खादी हें नांव हि चुकीचें. वास्तविक ओपवलेली ही खादी आहे. बारीक कापडाची राष्ट्राला थोडी फार जरूर आहे पण ह्या ओपवलेल्या खादीची गरज मुळीं च असतां कामा नये. ही ओपवण्याची क्रिया जर बिघडली तर कापड जळून गेल्यासारखें होऊन महिन्या-दोन-महिन्यांत च फाटतें. पण जरी ती बिघडली नाहीं आणि व्यवस्थित साधली तरी कापडाचें आयुष्य निदान दोन महिने तरी ती कमी केल्याशिवाय रहात नाहीं. हिंदुस्थानसारख्या गरीब देशानें आपल्या तुटपुंज्या जमिनींतून कापूस पिकवून तो रेचून, कांतून, विणून अशा प्रकारें जाळून टाकावा हा एक नैतिक गुन्हा च समजला पाहिजे. कापड ह्या ओपवण्याच्या क्रियेनें दहा महिने टिकायचें म्हणजे कापडाचा टिकाऊपणा पांचषष्ठांश झाला. अर्थात् कापड सहापंचमांश लागणार. माणशीं १५ वारांप्रमाणें ४० कोट माणसांना ६०० कोटि वार खादी लागायची, त्याऐवजीं ती आतां ७२० कोटि वार लागणार. खादीची किंमत रुपयाला ३ वार मानली तर १२० कोटि वारांची किंमत ४० कोटि रुपये होणार. नुसत्या धुलाईंत ४० कोटि रुपयांची नासाडी प्रतिवर्षी होणार. हें गणित लक्षांत घेतलें म्हणजे मी ह्याला नैतिक गुन्हा कां म्हणतों तें स्पष्ट होईल. खादी भांडारांना आजच्या स्थितींत ही धुवट खादी अजीबात न ठेवणें शक्य झालें नाहीं तर निदान त्यांनीं कोरा माल अधिकांत अधिक खपवण्याचा प्रयत्न तरी करायला पाहिजे, असें मला वाटतें. पण मला अशी धास्ती आहे कीं आजच्या घटकेला 'विक्रीची कला' म्हणून जी एक रूढ झाली आहे तिला बळि पडून उलट ह्या धुवट खादीला उत्तेजन दिलें जात आहे. पण तूर्त तो मोठा प्रश्न बाजूला ठेऊन तुम्हांला तरी मी असें सुचवितों कीं तुम्ही त्या

घुवटच्या मोहांत पडूं नये. त्यांत आपलें तिहेरी नुकसान आहे. एक तर मीं आतां सांगितलें च आहे. दुसरें, घुवट खादीची वीण नीट पारखतां येत नाहीं. त्यामुळें सुंदर ह्या नांवानें गचाळ वस्त्र पदरीं पडतें. वर पुन्हां धुलाईचे दाम द्यावे लागतात, तें वेगळें च.

आपण कोरी खादी खरीदूं आणि स्वतः च ती धुऊं आणि रोज धूत जाऊं म्हणजे ती चांगली स्वच्छ राहील. पण हें धुणें हि कसें धुवावें आणि स्वच्छ म्हणजे काय ह्या दोन्ही गोष्टी पुन्हां समजून घेतल्या पाहिजेत च. स्वच्छता निराळी आणि भडक पांढरा रंग निराळा. घाम, मळ, डाग इत्यादि घाण कापडांत शिल्लक न राहणें ह्याचें नांव स्वच्छता आणि तेवढें च धुण्याचें कार्य. त्यासाठीं सोडा, साबू इत्यादि वापरण्याची किंवा आपटून धोपटून कापडाचे हाल करण्याची गरज नाहीं. स्वच्छतेच्या कल्पनेनें जे असला प्रयोग करितात त्यांची दिशाभूल झालेली आहे. ते वस्तुतः साधी खादी वापरणारे लोक नसून रंगीत खादी वापरणारे आहेत असें च समजलें पाहिजे. रंगीत म्हणजे भडक पांढऱ्या रंगाची रंगीत. आपला देह मातीचा बनलेला आहे. आपण मातींत काम करणारे लोक. माती आणि मळ यांतला फरक आपल्या लक्षांत आला पाहिजे. मातीचा किंचित् रंग धोतरावर चढला तरी त्यानें स्वच्छता मुळीं च बिघडत नाहीं. तें हि एक प्रकारचें रंगीत कापड आहे असें फार तर म्हणा. मी तर तें च साधें कापड समजतों. स्वच्छ पाण्यानें रोज धूत गेलों म्हणजे आपलें काम संपलें. इतकें करून मातीचा जो सहज रंग कापडावर चढेल त्याचा द्वेष करण्याची गरज नाहीं. भडक पांढऱ्या रंगाची हौस आणि मातीच्या सहज रंगाचा द्वेष ही आम्हां श्रमिकांना न शोभण्यासारखी वस्तु आहे. त्यासाठीं साबूसोडयाचा व्यर्थ खर्च करावा लागतो. आणि शिवाय कापडाचा टिकाऊ-पणा कमी होतो. उलट पक्षीं स्वच्छतेची जाणीव नसल्यामुळें आणि कधीं कधीं धुण्यानें कपडा फाटतो अशा कल्पनेनें आपले खेडयांतले लोक घामट कपडा वापरीत राहतात. स्वच्छतेची जाणीव झाली तर ते तसें करणार नाहींत. कापड कशानें चांगलें टिकतें याचें खरें ज्ञान त्यांना झालें तर ते तसें

करणार नाहींत. कापडांत घाम मुरलेला तसा च राहिला तर तो कापडाच्या आयुष्याला साधक नसून बाधक च आहे.

साध्या पाण्यानें रोज धुऊन आपण खादी वापरूं. ती आपल्या देहाचें चांगलें रक्षण करील आणि त्याला यथायोग्य सजवील. पण रक्षण म्हणजे काय ? आणि शोभा म्हणजे काय ? हें नीट लक्षांत घेतलें पाहिजे. दिवसभर देहाला कापडी वाइंडिंग करून ठेवणें ह्यांत देहाचें रक्षण नाहीं व शोभा हि नाहीं. एक गृहस्थ संपूर्ण खादीधारी होते. त्यांची माहिती करून देतांना दुसरे एक गृहस्थ म्हणाले, 'हे अमुक अमुक गृहस्थ नखशिखान्त खादी-धारी आहेत.' तें ऐकून च मी घाबरलों. नखापासून शिखेपर्यंत खादी धारण करावयाची म्हणजे केवढें कठिण काम! आणि केवढया हि देशभक्तानें तें कां करावें ? 'पोटभर अन्न आणि आंगभर वस्त्र' अशी आपल्यांत म्हण आहे; पण अन्नानें सबंध पोट भरणें आणि वस्त्रानें सबंध आंग झांकणें म्हणजे एक निसर्ग-द्रोह च आहे. लज्जा-रक्षणासाठीं कांहीं वस्त्र अपरिहार्य आहे. आणि थंडी वगैरेपासून रक्षणासाठीं जें पाहिजे तेवढें पाहिजे च. पण त्याशिवाय विनाकारण दिवसभर आणि आंगभर वस्त्र वापरीत राहणें म्हणजे वस्त्र व्यर्थ फाडून टाकणें तर आहे च पण हा त्यांतला कमींत कमी दोष आहे. त्यांतून मुख्य हानि म्हणजे त्यानें शरीर नाजूक, निस्तेज आणि कमजोर व्हायचें. सूर्यकिरणांचा आणि मोकळया हवेचा महिमा अपार आहे. त्यांना भिण्याचें मुळीं च कारण नाहीं. उलट त्यांना न भिण्याचें आणि त्यांच्यावर प्रेम करण्याचें भरपूर कारण आहे. वेदांत एका भक्ताचें वर्णन आलें आहे. तो देवाला म्हणतो, 'देवा, तूं मला फार आवडतोस. किती आवडतोस म्हणून सांगूं! जीर्ण झालेल्याला जसें वस्त्र आवडतें तसा तूं मला आवडतोस!' वस्त्रांची आवड ही जीर्ण माणसाचें एक लक्षण तर असो च. पण जीर्ण बनण्याचें तें एक साधन हि आहे. सूर्याला संस्कृतांत 'मित्र' म्हणतात त्याचें कारण झाडांना सुद्धां माहीत आहे; सूर्यनारायण हा उत्तम मित्र तर आहे च पण तो उत्तम वैद्य हि आहे. 'वैद्यो नारायणो हरिः' ह्या वाक्यांत सूर्यनारायणाकडे हि लक्ष आहे. मी प्रायः उघडा राहतों,

त्यानें मला शारीरिक आणि बौद्धिक लाभ अनुभवास आला आहे. म्हणून आपल्या ह्या देशांत गरिबांनीं आणि श्रीमंतांनीं शक्य तितकें उघडें रहावें असें मला वाटतें.

खादीच्या काटकसरीचे दुसरे कांहीं गृह्य-शास्त्रीय मुद्दे आपण थोडक्यांत पाहूं.

(अ) स्नान केल्यानंतर ओले कपडे तसे च पडूं न देतां लागलीं च धुऊन वाळंत घालावे. तसें न केल्यानें कपडा तर कुजून लवकर फाटतो च पण माणसाला आळसाची आणि अव्यवस्थितपणाची संवय लागते.

(आ) लांब धोतर वापरण्याची ज्यांना संवय आहे त्यांनीं रात्रीं निजतांना तें बदलावें आणि त्याऐवजीं दुसरें चड्डी किंवा पंचासारखें वेगळें वस्त्र नेसावें. ह्यानें त्या लांब धोतराची आयुर्वृद्धि होईल. पाश्चात्त्य लोकांत अशी चाल आहे. आणि आपल्याकडे हि पूर्वीं होती च. कपडा निजल्या अवस्थेंत च जास्त फाटतो.

(इ) धोतर जीर्ण होण्याच्या आंत च मधोमध फाडावें आणि उलट बाजू शिवून घ्याव्या. ह्यानें धोतर पुन्हां ताजेंतवानें होईल. ह्याला मराठींत दांड भरणें हा पारिभाषिक शब्द आहे.

(ई) वस्त्र यत्किंचित् फाटलें तर त्याची उपेक्षा किंवा त्याग करूं नये. तें शीघ्र डागडूज करावें. डागडुजणें अशक्य होईपर्यंत वस्त्राचा त्याग विहित नाहीं. देहाला वस्त्राची उपमा दिली जाते. देह डागडूज करून वापरण्यांत जशी लाज नाहीं तसें च वस्त्राचें हि समजलें पाहिजे. फाटकें वापरण्यांत लाज आहे.

शेवटीं खादी-तत्त्वाचें स्मरण करून संपवूं. खादीची गादीशीं लढाई आहे. याला मी खादी-तत्त्व म्हणतों. खादीची गादी बनूं शकते हा खादीचा महिमा आहे. पण तो च महिमा तिच्या च जिवावर उलटतां कामा नये. पांच-पांचशें नंबरचें सूत- हिंदुस्थानांत निघत होतें हें लोक गौरवपूर्वक सांगत असतात आणि मी हि सांगतों. असें वस्त्र निर्माण करून देवाच्या मूर्तीला अर्पण करीत असते किंवा प्रदर्शनांत ठेवीत असते तर तें गौरव

शोभिवंत होतें. पण श्रीमंत लोक आपला तुच्छ देह सजविण्यासाठीं इतकी अपार मेहनत गरिबांकडून करवीत होते, आणि गरीब हि एवढी अद्‌भुत कला अल्पतम मजुरीसाठीं किंवा कदाचित् भरपूर मजुरीसाठीं हि विकून तुच्छ मानव-देहाची खुशामत करीत होते, असा विचार मनांत आला म्हणजे मला तर लाज च वाटते. खादी वैभवशाली असो पण विलासी कधीं हि नसो. रामदासांनीं शिकविलें : **'चातुर्यें शृंगारे अंतर। वस्त्रें शृंगारे शरीर। दोहींमध्यें कोण थोर। बरें पहा॥'** मराठ्यांनीं, हें खादीतत्त्व जेमतेम शंभर वर्षं लक्षांत ठेवलें आणि जेमतेम शंभर वर्षं च त्यांचें राज्य टिकलें. ह्या खादी-तत्त्वाचा आम्हांस कधीं हि विसर न पडो.

---

# २८ गो-सेवेचें रहस्य

माझ्या प्रिय बंधूंनो आणि भगिनींनो,

आज जे चार शब्द मी आपणांपुढें मांडणार आहें, त्याच्या प्रस्तावने-दाखल थोडें सांगण्याची गरज आहे. काल आमची—कार्यकारी मंडळांची—जी सभा झाली होती त्या वेळीं मी म्हणालों होतों, कीं मला आपण अध्यक्ष करीत आहां, पण संभाळा. मी एक जंगली प्राणी आहें. म्हणून माझ्या वागण्यांत आपल्याला जर कुठे असभ्यता दिसून आली, तर साहून घ्यावी लागेल.

**मी एक जंगली प्राणी आहें**

माझा जन्म च आधीं कोंकणच्या जंगलांत झालेला, आणि ज्याला आजकाल शिक्षण म्हणतात तें थोडें लाभलें न लाभलें इतक्यांत मला उपनिषद् वाचण्याची इच्छा झाली. आपण जाणत च असाल कीं, उपनिषद् एक

---

ता. १ फेब्रुवारी १९४२ रोजीं गोसेवासंघाच्या संमेलन-प्रसंगीं दिलेलें अध्यक्षीय भाषण.

जंगली साहित्य आहे. त्याला संस्कृतांत 'आरण्यक' म्हणतात. 'आरण्यक' शब्दाचा सरळ अर्थ आपल्या भाषेंत 'जंगली साहित्य' हा च होईल. त्यांत ब्रह्मस्वरूपाचें वर्णन करतांना दोन लक्षणें दाखविलीं आहेत: "अवाकी, अनादरः" म्हणजे ब्रह्म न बोलणारें आणि कोण्या हि वस्तूची पर्वा न करणारें आहे. माझ्या स्वभावांत ही गोष्ट मुरल्या सारखी आहे. अशा लहान-मोठ्या अनेक गोष्टी असतील, ज्यांची मी पर्वा करतों कीं करीत नाहीं, हें माझ्या लक्षांत येणार नाहीं. म्हणून आपण एवढें सहन करून घ्याल.

**दरबारी थाटाची उणीव**

दुसरी गोष्ट-जी पहिलीचा च भाग आहे-मला ही सांगायची होती, कीं माझी मातृभाषा मराठी आहे. आणि मराठी भाषेंत जरी अनेक प्रकारचें अद्‌भुत सामर्थ्य भरलेलें आहे, तरी एका गोष्टीची मोठी उणीव आहे. ज्याला दरबारीपणा म्हणतात-आणि जो हिंदी, उर्दू, व हिंदुस्थानी भाषेंत भरपूर आहे-तो मराठींत मुद्दल च नाहीं. आम्हीं शंभर प्रयत्न केले तरी 'आप आइयेगा, बैठियेगा' ह्याचें भाषांतर मराठींत नीट जमत च नाहीं. म्हणून ह्या हि कारणास्तव ज्या उणिवा माझ्या हिंदींत राहून जातील त्या हि आपण माफ करावयाच्या आहेत.

**व्याख्यान लेखी कां नाहीं?**

ह्या नंतर प्रस्तावनेंत आणखी एक गोष्ट मला सांगावी लागेल. मीं आपलें अध्यक्षीय भाषण लिहून द्यावें, असें मला सुचविण्यांत आलें होतें. कदाचित् हा एक शिष्टाचार असेल. पण मी तसें करूं शकलों नाहीं. कारण, प्रायः लोकांचें दर्शन झाल्याशिवाय मला कांहीं सुचत च नाहीं. ही झाली नेहमींची गोष्ट. त्याशिवाय ह्या वेळीं इथें माझ्या आधीं बापूंचें व्याख्यान व्हावयाचें होतें. तेव्हां मीं विचार केला, कीं त्यांचें व्याख्यान ऐकावें आणि मग त्याच्या प्रकाशांत बोलावें म्हणजे त्यांनीं ज्या वस्तु विस्तारपूर्वक सांगितल्या असतील त्यांची पुनरावृत्ति टळेल. आणि त्यांनीं न सांगितलेल्या वस्तु सहजपणें सांगतां येतील. असें चिंतून मीं माझें व्याख्यान लिहून तयार केलें नाहीं.

आणि आतां माझें भाषण मौखिक च होत आहे. ह्यासाठीं जर क्षमा मागण्याची गरज मानली जात असेल तर ती हि मागून घेतों. आणि आतां मी माझें व्याख्यान सुरूं करतों.

प्रथम मी नामापासून आरंभितों. कारण, नाम-महिमा सर्वांना अवगत च आहे. आमच्या संघाचें नांव ' गो-सेवा-संघ ' आहे. हें नांव

'गो-सेवा '– शब्द कां ?

ऐकून ओघानें च प्रश्न निघतो, " आपण कधीं ' गोरक्षा' शब्द ऐकला आहे का ? सदरहू शब्द जाणत असून हि आपण 'गोसेवा' शब्द बुद्धया योजला आहे कीं विचार न करतां सहज च तो पडला आहे ! " ह्याचें उत्तर देणें जरूर आहे.

संस्कृतांत आपल्याला ' गोसेवा ' शब्द सहसा आढळावयाचा नाहीं. संस्कृतांत ' गोरक्षा ' शब्द च प्रचलित आहे. अर्थात् हा शब्द सर्वांना माहीत च आहे. पण तो जाणून, हेतुपूर्वक सोडलेला आहे, आणि 'गोसेवा' शब्द अधिक नम्र म्हणून निवडला आहे. गोरक्षेचें सामर्थ्य आज आमच्यांत आम्हांला दिसत नाहीं. म्हणून ' गोसेवें ' त संतोष मानला आहे. अर्थात् दयाभावपूर्वक आमच्यानें होईल तितकी गाईची सेवा आम्ही करूं. आणि भगवंताच्या कृपेनें जेव्हां आम्हांला योग्यता लाभेल तेव्हां आम्ही 'गोरक्षा' करूं.

पण आम्ही गोसेवेचें नांव घेतां तेव्हां आम्हांला विचारलें जाईल, कीं " तुम्ही गाईची काय सेवा करूं इच्छितां ? तुम्ही गाईचें दूध-तूप वाढवूं इच्छितां आणि उत्तम बैल तयार करावे म्हणतां, तर ही तुमची च सेवा तुम्ही करूं पाहतां; ह्यांत गाईची सेवा काय झाली ? इंग्रजांनीं 'पब्लिक सर्व्हिस' शब्द काढला आहे. तशांतली च ही तुमची गोसेवा झाली ! " ह्या प्रश्नाबाबत थोडें बोलणें ठीक होईल.

असला प्रश्न उत्पन्न होतो, कारण आम्हांला आमची मर्यादा कळत नाहीं. 'सेवा' आणि 'उपयोग' ह्यांचा विरोध च असतो असें नाहीं, हें

आमची मर्यादा

समजणें जरूर आहे. ज्या प्राण्याचा आम्ही उपयोग घेऊं शकत नाहीं, त्याची सेवा करण्याची शक्ति आमच्यांत

नाहीं. ही आमची–मानवांची–मर्यादा आहे. ह्यांत स्वार्थाचा कांहीं मुद्दा नाहीं. एकमेकांची सेवा करण्याचा हा च एक मार्ग ईश्वरानें आमच्या-साठीं मोकळा ठेवलेला आहे. नाहीं तर बापूंनीं आज पिंजरापोळांची जी दशा वर्णन केली, ती च साऱ्या समाजाची होणार आहे. आज सुद्धां आम्हांला हें च दिसून येत आहे. पक्ष्यांना लोक दाणे घालतात, आणि माणसांना उपाशी ठेवतात. अशा वागणुकीनें दया किंवा सेवा होत नाहीं, पण निर्दयता आणि अ-सेवा होते.

ईश्वराचे अनन्त गुण आहेत. त्यांचें आम्हीं यथाशक्ति अनुकरण हि करावयाचें आहे. पण ईश्वराचा जो विशेष गुण आहे–म्हणजे जो ईश्वराचा च आहे–त्याचें आम्ही अनुकरण करूं जाऊं, तर तो अहंकार होईल. 'ऐश्वर्य' हा ईश्वराचा मालकी हक्काचा गुण आहे. त्याचें अनुकरण आम्हांला शक्य नाहीं. बाकी सर्व गुणांचें थोडेंफार अनुकरण शक्य आहे. ईश्वर सृष्टि-पालन करतो आणि संहार करतो. ह्याचें अनुकरण आम्हांला वर्ज्य आहे. आम्ही कोण्या हि प्राण्याचें पालन करूं च शकत नाहीं. फार झालें, तर मुंग्यांना आम्ही साखर घालूं. मग तेथें मुंग्या गोळा होतील, आणि दैव-वशात् तेथें एखादा बैल आला तर त्याच्या पायांखालीं त्या मुंग्या चिरडल्या जातील. असें झालें, तर त्याची जबाबदारी मी कसा उचलीन? "ईश्वराची करणी आहे" असें म्हणून मी आपला मोकळा होईन.

मनुष्याचा अहंकार

मला एक गोष्ट आठवते. एक होती म्हातारी. आणि तिचा होता एक मुलगा. तो तिचें मानी च ना. म्हणून बिचारी फार कष्टी होई. एकदां मी तिच्या घरीं गेलों होतों. तेव्हां ती मला म्हणाली, "पहा ना, मीं ह्याला एवढा पाळला-पोसला आणि हा आपला माझें मानत च नाहीं!" मीं तिला विचारलें, "तुम्हांला का हा एक च मुलगा आहे?" ती म्हणाली, "आणखी तिघे होते ते वारले." मीं तिला आपल्या जंगली भाषेंत सरळ सवाल केला, "आजीबाई, तुम्हीं आपल्या तिघा मुलांना कां मारून टाकलें?"

हा जंगली सवाल ऐकून तिच्या हृदयाला केवढा धक्का बसला असेल ह्याची तुम्ही कल्पना करूं शकतां. थोडा वेळ तर ती चकित च झाली, आणि मग सांवरून म्हणाली, "मी काय करूं? देवाची इच्छा होती तसें झालें." मग मी तिला म्हणालों, "तुमच्या तिघा मुलांना मारलें देवानें, तर ह्या चौथ्या मुलाला पाळलें-पोसलें कुणीं? पालन केलें तें मात्र तुम्हीं आणि मारलें देवानें, असें कसें होईल? एक तर दोन्ही जबाबदाऱ्या घ्या, किंवा दोन्ही सोडा."

ज्या प्राण्याचा आम्हांला उपयोग नाहीं, त्याची सेवा आमच्यानें होऊं शकायची नाहीं. गोसेवेचा मार्ग सरळ आहे. गाईचा आम्हांला पुष्कळ उपयोग आहे च. तो अधिकांत अधिक घेण्याचा आम्ही प्रयत्न करूं, आणि त्या बरोबर च तिची सेवा अधिकांत अधिक जितकी होऊं शकेल तितकी करूं, ज्या प्रमाणें मुलाबाळांची करतों त्या प्रमाणें. हा गोसेवेचा सरळ अर्थ आहे.

**वेदांत गो-सेवेचें शिक्षण**

गोसेवेचा प्रथम पाठ आपल्याला वैदिक ऋषींनीं शिकविला आहे. कांहीं लोक म्हणतात, "ऋषींनीं गोसेवेचा भलता च पाठ शिकवून गाई-विषयीं अनुचित पूजाभाव निर्माण केला आहे. असली पशुपूजा वैज्ञानिक नाहीं." हा आक्षेप वस्तुस्थितीला धरून नाहीं. ज्याप्रमाणें आम्ही उपयोगाचा विचार करतों, त्याप्रमाणें ऋषींनीं हि सरळ उपयोगाचा च विचार केला आहे. त्या च दृष्टीनें त्यांनीं सांगितलें, कीं हिंदुस्थानला गोसेवा च लाभदायी आहे. म्हणून तो च धर्म होऊं शकतो. अशा स्थितींत आमचें हें कर्तव्य आहे, कीं आम्ही गाईतून जितका उपयोग काढूं शकतों, तितका काढावा. वेदाचें वाक्य आहे :—

सहस्रधारा पयसा मही गौः ।

"अशी गाय कीं जी दुधाच्या हजार धारा रोज देईल." दुधाची एक धार केवढी असते तें तुम्ही समजूं शकतां. हिशेब केला म्हणजे लक्षांत येईल, कीं वैदिक गाईचें दूध ४०–४५ रतल होतें. ह्या वरून वैदिक ऋषींची इच्छा काय होती, आणि गाईपासून त्यांनीं काय अपेक्षा राखली होती,

हें तुमच्या लक्षांत येईल. हल्लीं तर गाय दूध च देत नाहीं, अशी तक्रार असते. वैदिक ऋषींनीं गोसेवेची योग्य दिशा दाखविली आहे.

लोक बोलतात, "दूध तर गाईपासून जेमतेम मिळूं तरी शकतें, परंतु तुपा साठीं म्हशीला च शरण जाणें भाग आहे." पण आमचे प्राचीन वैदिक ऋषि ही गोष्ट मान्य करीत नाहींत. ते म्हणतात—

**यूयं गावो मेदयथा कृशं चित्!**

"हे गाईनो! कृश शरीराला तुम्ही मेदोयुक्त करतां." मेद म्हणजे स्नेह, म्हणजे चरबी, म्हणजे ज्याला वैज्ञानिक 'फॅट' म्हणतात ती. ह्याचा भावार्थ हा झाला कीं दुबळ्या शरीराला परिपुष्ट करण्यालायक चरबी गाईच्या दुधांत पर्याप्त असली पाहिजे. आज जर गाईच्या दुधांत तुपाची मात्रा अल्प दिसत असेल, तर ती वाढविणें आमचें काम आहे. ती कसर गाईच्या दुधांत नाहीं, पण आमच्या प्रयत्नांत आहे.

ह्याच्या च पुष्टयर्थ त्यांनीं गाईचें वर्णन आणखी असें केलें आहे—

**अश्रीरं चित् कृणुथा सुप्रतीकम्।**

जें शरीर अ-श्रीर आहे, त्याला गाय श्रीर बनवते. श्री-र म्हणजे शोभन, सुंदर. आणि अ-श्री-र म्हणजे शोभाहीन. 'अश्रीर' शब्दावरून च 'अश्लील' शब्द बनलेला आहे. ह्यावरून तुम्ही लक्षांत घ्याल, कीं आम्हांला गोसेवेचा पहिला पाठ वैदिक ऋषींनीं शिकविला आहे, तिच्या विकासाची दिशा हि दाखविली आहे, आणि ती दिशा अनुचित पूजा-भावाची नाहीं, परंतु शुद्ध वैज्ञानिकतेची आहे, म्हणजे परम उपयुक्तेची आहे.

सेवेचा अर्थ उपयोगहीन सेवा नव्हे. उपयोगी प्राण्याचा उपयोग घेऊन त्याची यथासंभव अधिकांत अधिक सेवा करणें, हा अर्थ आहे.

**सेवेची व्याख्या**

ह्याचा अर्थ असा, कीं उपयोगी प्राण्याला आम्हीं अधिकाधिक उपयोगी बनवलें पाहिजे, आणि त्या च रीतीनें आम्ही त्याची अधिकाधिक सेवा हि करूं शकतों, ज्याप्रमाणें आम्ही आमच्या

मुलाबाळांची करतों. अशा प्रकारें आमच्या दृष्टीनें सेवेचा उपयोगाशीं नित्यसंबंध आहे. आतां मी आणखी पुढें जातों. ज्याप्रमाणें उपयोगहीन सेवा आम्हीं करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें सेवाहीन उपयोग हि आम्ही घेतां कामा नये. गोसेवा-संघाच्या नांवांतील 'सेवा' शब्दाचा हा च अर्थ आहे. म्हणजे सेवा केल्याशिवाय आम्ही लाभ घेणार नाहीं. आज हि असें च थोडेंफार होत आहे. आम्ही आज हि गुरांची सेवा कांहीं-ना-कांहीं करतों च; मात्र शास्त्रीय दृष्टीनें जितकी करायला पाहिजे तितकी करीत नाहीं. कारण, शास्त्रीय दृष्टि च आमच्या जवळ नाहीं. तज्ज्ञांकडून ह्या कामीं आम्ही मदत जरूर घेऊं. पण सर्व च काम त्यांच्यावर सोडतां कामा नये. आम्हीं गाईची प्रत्यक्ष सेवा केली पाहिजे. जेव्हां आम्ही अशी प्रत्यक्ष सेवा करूं, तेव्हां गोसेवेचें शास्त्र थोडेंबहुत आमच्या हातीं लागेल.

**स्नेहभावनेचें महत्त्व**

पवनारला आमच्या आश्रमांतील एक बंधु नामदेव ह्यानें दोन चार गाई पाळल्या आहेत. बाजारासाठीं त्याला एक दिवस सेलूला जावें लागलें. संध्याकाळीं नामदेव परत आला. आणि दूध काढायला बसला. पण गाय दूध देई च ना. त्यानें प्रयत्न पुष्कळ केला. मग त्यानें विचारलें, "आज गाईला काय झालें आहे?" उत्तर मिळालें, कांहीं झालें तर नाहीं. दूध कां देत नाहीं कुणास ठाऊक? वासरूं हि बांधलेलें च होतें. तेव्हां तें हि दूध प्यालेलें नाहीं." शेवटीं नामदेवनें विचारलें, "कोणीं गाईला मारलेंबिरलें तर नाहीं? एका जणानें म्हटलें, "होय, मारलें खरें." नामदेव म्हणाला, "बरोबर, म्हणून च ती दूध देत नाहीं." मग नामदेव गाई जवळ गेला. त्यानें तिच्या शरीरावर हात फिरविला. तिला चुचकारलें. हें स्नेह-दर्शन पाहून थोड्या वेळानें गाय दूध द्यायला तयार झाली. सारांश, नामदेवाप्रमाणें आम्ही सेवा करूं, तेव्हां गोसेवेचें रहस्य हळूं हळूं आम्हांला समजेल, आणि गोसेवेचें शास्त्र हि बनेल.

हिंदु संस्कृतीचा अप्रतिम प्रतिनिधि जो कालिदास त्यानें गोसेवेचा

किती सुंदर आदर्श आमच्या पुढें मांडला आहे! महाराज दिलीप ऋषीच्या आश्रमांत रहावयास येतो. ऋषि त्याला गाईच्या सेवेचें काम देतात. कारण, आश्रमांत कांहीं तरी सेवा केल्याशिवाय थोडें च रहावयाचें असतें! आश्रम म्हणजे च सेवा-भूमि. तो राजा गोसेवेचें काम किती आस्थेनें करतो, तिची किती चाकरी करतो, तिच्या कसा मागें मागें राहतो, ह्याचें चित्र कालिदासानें असें रेखाटलें आहे —

कालिदास आणि गोसेवा

**स्थितः स्थितां उच्चलितः प्रयातां, निषेदुषीं आसनबंध-धीरः।**
**जलाभिलाषी जलमाददानां, छायेव तां भूपतिरन्वगच्छत्॥**

" जेव्हां ती गाय उभी राही, तेव्हां तो हि उभा राही. जेव्हां ती चालूं लागे, तेव्हां तो हि चालूं लागे. ती बसली, म्हणजे तो बसे. ती पाणी प्याल्यानंतर तो पाणी पिई. शरीराच्या छायेप्रमाणें तो तिचा अनुचर झाला होता."

गाय एक उदार प्राणी आहे. ती आमची सेवा आणि प्रेम ओळखते, आणि अधिकांत अधिक लाभ देण्याला तयार असते.' सेवा '-शब्दाचें दोहन करून मीं हें दूध आपल्या समोर ठेवलें आहे. एक तर उपयोग घेतल्यावांचून आम्ही सेवा करूं शकत नाहीं. आणि दुसरी गोष्ट, सेवा केल्याशिवाय आम्ही उपयोग घेऊं, तर तो हि गुन्हा होईल. आम्हांला असें करावयाचें नाहीं. ह्या दोन गोष्टी मीं आपल्या समोर ठेवल्या.

सेवेचा निष्कर्ष

आतां आपण संघ-शब्दाचें मनन करूं.

' संघ '- शब्दांत एखादी विशेष दृष्टि दिसते काय? चरख्यासाठीं संघ, हरिजनांसाठीं संघ, असे आम्ही अनेक संघ बनवले आहेत. तसा च गोसेवेसाठीं हा संघ बनला आहे. इतकें च कीं आणखी कांहीं अर्थ आहे? मला वाटतें, ह्यांत विशेष अर्थ असूं शकतो. हिंदुस्थानच्या जमिनीची आणि गाईची आज

संघ-शब्दाची व्याख्या

जी दशा आहे, ती लक्षांत घेतां बहुधा सहकार्याशिवाय हें काम वाढण्यासारखें नाहीं. कदाचित् ठिकठिकाणीं संघाचें स्वरूप देऊन च हें काम करावें लागेल. गोसेवा-'संघ' शब्दांतून इतका विशेष अर्थ निघण्यास अडचण नाहीं.

आतां आपण पुढें जाऊं. गोसेवा-संघाच्या कार्याचा आरंभ प्रतिज्ञेपासून केला आहे. अभिप्राय असा आहे, कीं आम्ही जर गाईच्या च

**प्रतिज्ञेचा उपयोग**

दुधा-तुपाचें सेवन करूं, तर आम्हांला तिची सेवा करण्याची इच्छा होईल. म्हणून गाईचें च दूध-तूप वापरण्याची प्रतिज्ञा आरंभीं च ठेवली आहे. पुष्कळ लोक विचारतात, "प्रतिज्ञेची काय अवश्यकता ? प्रतिज्ञेवांचून काम नाहीं होऊं शकणार ?" उत्तरादाखल मी माझा अनुभव च सांगतों. मीं असें पाहिलें आहे, कीं संकल्पपूर्वक केलेला प्रयत्न जसा यशस्वी होतो, तसा सामान्य इच्छेनें केलेला प्रयत्न यशस्वी होत नाहीं. कोणतें हि महान् कार्य संकल्पावांचून पार पडत नाहीं. जर संकल्पपूर्वक आरंभ केला, तर अर्धे कार्य तिथें च संपतें. दूध-तूप खाणार वा न खाणार, एवढी च प्रतिज्ञा नाहीं. गाईच्या दुधातुपाची पैदास वाढवण्याचा प्रयत्न करावयाचा, हा प्रतिज्ञेचा हेतु आहे.

प्रतिज्ञेबाबत एक आक्षेप नेहमीं घेतला जातो, कीं दुसऱ्यांच्या घरीं गेलों असतां असल्या नियमांनीं त्यांना तकलीफ होते. ह्याचें उत्तर बापूंनीं

**एका आक्षेपाचें उत्तर**

आपल्या अहिंसेच्या भाषेंत दिलें आहे. मी आपल्या अनादराच्या भाषेंत देऊं इच्छितों. एवढी सभ्यता राखण्याची काय गरज ? सूर्याला आपण त्याच्या किरणांनीं ओळखतों. तो जिथें जातो तिथें, आपले किरण घेऊन जातो. त्यांपासून कोणाला ताप होवो वा आह्लाद होवो. तो त्याची पर्वा करूं शकत नाहीं. सूर्य जर आपल्या किरणांना सोडील, तर त्याचें सूर्यत्व च लोपेल. तसें च आम्हीं हि जिथें जावयाचें तिथें आपल्या किरणांसह—आमच्या सिद्धान्तांसह—गेलें पाहिजे. मी आपले सिद्धान्त किंवा विचार सोडून जर कोणाच्या

घरांत जाईन, तर मी आपला माझेपणा च सोडून देतों. मग मी हा 'मी' च राहत नाहीं. आम्ही आमचें 'स्वत्व' सोडून कोणाच्या घरीं जाऊं तर त्याला हि आनंद होईल, असें नाहीं. म्हणून प्रतिज्ञा अवश्य घेतली पाहिजे. आणि लोकांच्या मानीव तकलिफीसंबंधानें निर्धास्त असलें पाहिजे.

आणखी एक गोष्ट. गाईम्हशीच्या प्रश्नाबाबत पुष्कळ बोललें जातें. दोन्ही जनावरें मनुष्याला दूध देणारीं आहेत. दोहोंत कांहीं मूलभूत विरोध असण्याचें तर कारण च नाहीं. तथापि आम्ही गाईचें च दुभतें वापरण्याची प्रतिज्ञा घेत आहोंत ह्यांतलें तत्त्व जाणलें पाहिजे. हिंदुस्थानची कृषिदेवता बैल आहे. आणि हें तर सर्वांना माहीत च आहे, कीं हिंदुस्थान कृषिप्रधान देश आहे. बैल तर आम्हांला गाईपासून च मिळतो. ही च गाईची विशेषता. ह्या विशेषते-बरोबर गाईची अन्य उपयुक्तता आम्ही जितकी वाढवूं शकूं तितकी जरूर वाढवूं. पण गाईचा मुख्य उपयोग ती बैलाची जननी म्हणून च आहे. बैला-वांचून आमची शेती होत नाहीं. म्हणून आम्ही गाईकडे विशेष लक्ष द्यावयास पाहिजे, आणि तिची काळजी घ्यावयास पाहिजे. असें आम्ही न करूं, तर हिंदुस्थानच्या शेतीचें भारी नुकसान होणार आहे. ह्या दृष्टीनें आम्ही विचार केला, म्हणजे म्हशीचा सवाल सहज सुटतो. आणि गाईला प्रोत्साहन देणें हें आमचें प्रथम कर्तव्य कां ठरतें तें ध्यानांत येतें.

गाय विरुद्ध म्हैस

दुष्काळाच्या वेळीं जनावरें कोणत्या क्रमानें मरतात, ह्या विषयीं आमच्या मित्रांनीं एकदा त्यांच्या प्रांतांतला अनुभव सांगितला होता, तो मला आठवतो. ते म्हणाले, सर्वांत आधीं रेडा मरतो. कारण, त्याची उपेक्षा करून आम्ही त्याला मारून टाकतों किंवा मरूं देतों. वर्ध्याच्या बाजारांत म्हशी अशा अवस्थेंत आणतात, कीं एक दोन तासांत च त्यांची विण्याची तयारी व्हावी. हेतु असा, कीं लोकांनी त्या शीघ्र खरीदाव्यात. एक वेळ एक मनुष्य अशी च एक म्हैस वर्ध्याला घेऊन चालला होता. मनोहरजी त्या वेळीं महारोगि-सेवा-मंडळामार्फत महारोग्यांची सेवा येळीकेळीला करीत. त्यांनीं त्याला

गाई आणि रेडे ह्यांची उपेक्षा

पाहिलें होतें. रस्त्यांत – येळीकेळी जवळ च – सदर म्हैस व्याली. पुत्र-जन्म झाला! पण त्या गृहस्थाला त्या पुत्रजन्माची फार अडचण वाटली. तो विचार करतो, हा पुत्र कसला? ही एक बला च आली! मनुष्याला तर पुत्रजन्माचा आनंद होत असतो. पण म्हशीच्या पुत्राला तो सहन करीत नाहीं. त्या माणसानें त्या पुत्राला तेथें च सोडलें आणि वर्ध्याला जाऊन म्हैस विकून जो कांहीं पैसा मिळाला, तो गांठीं बांधून सदर गृहस्थ आपल्या घरीं चालता झाला. बिचारा महिषी-पुत्र तिथें च पडून राहिला. मनोहरजी दयाळु. त्यांना फिकीर पडली, कीं त्याचें आतां काय करावयाचें? ज्या शेतांत तें पारडूं पडलें होतें त्याच्या मालकाकडे ते गेले. आणि त्याला म्हणतात, "ह्याला सांभाळाल तुम्ही?" तो म्हणतो, 'ही काय बला आली. ह्याला मी कसा राखूं? त्याचा उपयोग काय होणार? त्याचें पालन मीं कां करावें? शेवटीं दसऱ्याच्या बळीसाठीं विकावें लागणार. दुसरा तर कांहीं च मार्ग निघावयाचा नाहीं.'

मीं ही एक नेहमींची घटना तुमच्या समोर मांडली. एकूण, सर्वांत आधीं रेडा मरतो. त्यानंतर मरते गाय. मग म्हैस. आणि सर्वांत शेवटीं बैल. बैल सर्वांत ज्यास्त उपयोगी. म्हणून त्याची काळजी घेण्याचा विशेष यत्न करतात. कोण्या हि प्रकारें लोक त्याला खायला घालतात, आणि जिवंत ठेवण्याचा प्रयत्न करतात. पण प्रश्न असा, कीं गाईची सेवा केल्या-शिवाय उत्तम बैल कसे मिळायचे? हिंदुस्थानच्या माणसाला बैल तर हवा, पण गाईची सेवा करायला नको. तो धार्मिक दृष्टीनें गाईला पूजण्याचें सोंग करतो, पण दुधासाठीं तो म्हशीची कदर करतो. हिंदुस्थानच्या लोकांची इच्छा अशी, कीं म्हैस असावी माय आणि बैल बाप! योजना तर ठीक आहे, पण भगवंताला मंजूर नाहीं. म्हणून हा मामला कठिण होऊन बसला आहे. म्हैस आणि गाय दोहोंचें एकत्र पालन हिंदुस्थानच्या आजच्या स्थितींत अडचणीचें झालें आहे.

परंतु आम्हांला हें समजायला हवें आहे, कीं आज आम्हांला गाईच्या च सेवेला महत्त्व देणें भाग आहे. महात्माजी म्हणाले, कीं आम्ही जर

**म्हशीची हि सेवा होऊं शकत नाहीं**

गाईला वांचवूं शकलों, तर म्हशीचा प्रश्न आपोआप सुटेल. ह्याचें पूर्ण दर्शन तर मला हि नाहीं, आणि कदाचित त्याची आज जरूर हि नसेल.

गाय आणि म्हैस ह्यांना एकमेकांचे शत्रु मानण्याचें कारण नाहीं. पण आम्हांला गोसेवेपासून आरंभ करायला हवा, आणि तें च होऊं हि शकतें. आज आम्ही वस्तुतः म्हशीची हि सेवा करीत नाहीं. आज आम्ही जी म्हशीची सेवा करतों, ती वास्तविक नाहीं गोसेवा, नाहीं म्हशीची सेवा. आम्ही त्यांत केवळ आपला स्वार्थ पाहिला आहे. आम्ही म्हशीचा सेवाहीन उपयोग घेतों आहोंत.

मी आतां सांगून चुकलों, कीं आम्ही रेड्याची तर उपेक्षा च करतों. वस्तुस्थिति अशी आहे, कीं हिंदुस्थानच्या थोडया भागांत रेड्याचा

**म्हशीचा स्वभाव**

उपयोग कांहीं होत असेल तर असो, पण साधारणतः हिंदुस्थानच्या गरम हवेंत रेडा विशेष उपयोगी होऊं शकणारा नाहीं. म्हशीचें पालन आम्ही केवळ लोभवश करून राहिलों आहों. नागपूर-वऱ्हाडकडे उष्णतामान गरमीच्या दिवसांत ११५° पर्यंत जातें. म्हशीला विशेषतः त्या दिवसांत तर पाण्यांत च डुंबायला पाहिजे. पण पाण्याचा तर इकडे तुटवडा. पाण्यावांचून बिचारी तडफडत असते. म्हैस हें पूर्णपणें जमिनीवरचें जनावर च नव्हे. तें अर्धं जलचर आणि अर्धं स्थलचर आहे. गाय पूर्ण स्थलचर आहे. पाण्यांतील प्राण्यांना देवानें अधिक चरबी दिलेली आहे. थंडी आणि पाणी ह्यांपासून बचाव होण्याला त्या चरबीचा उपयोग असतो. माशाचें शरीर तेलानें भरलेलें असतें. म्हणून पाण्याच्या बाहेर निघतां च मासा सूर्याच्या तापानें जळूं लागतो. तशी च कांहींशी म्हशीची दशा आहे. म्हणून नागपूर-वऱ्हाडचे लोक म्हशीच्या पाठीवर तिच्या शेणाचे लेप करतात. म्हणजे तिला थोडा थंडपणा लाभावा हा हेतु. त्या प्राण्याला उन्हाळ्यांत किती त्रास होत असतो, ह्याची त्यांना कल्पना असते. खेडयांत जाऊन जर तुम्ही तपास कराल, कीं गांवांत म्हशी किती आहेत आणि रेडे किती आहेत तर उत्तर मिळेल, म्हशी आहेत

१००-१५० तर रेडे आहेत १०-२०. त्यांना जर विचारलें, कीं नर आणि मादी म्हणजे च स्त्रीपुरुष, ह्यांच्या संख्येंत इतकी विषमता कां? तर आमचे खेडेगांवचे लोक उत्तर देतील, "काय करावें? भगवंताची करणी च अशी; कीं रेडा ज्यास्त दिवस जगत च नाहीं." शेवटीं इथें हि भगवंताची करणी आली च. हें आमच्या अबुद्धीचें लक्षण आहे. आम्ही म्हशीच्या तकलीफीचा विचार न करतां म्हशीचा उपयोग घेतों, आणि रेडयाची उपेक्षा करून म्हणतों, रेडे ज्यास्त जगत नाहींत आणि जगायचे नाहींत. सारांश, आम्ही म्हशीची हि सेवा करीत आहोंत, असें नाहीं. आम्ही केवळ तिचा उपयोग घेत आहोंत. सेवेच्या नांवानें शून्य च आहे. ह्यावरून तुमच्या लक्षांत येईल, कीं गोसेवा-संघाची स्थापना आम्ही कां करीत आहोंत.

**यंत्रानें शेती कां करूं नये?**

कांहीं लोक म्हणतात, "हिंदुस्थान कृषि-प्रधान देश आहे. म्हणून शेतीसाठीं बैल पाहिजेत, बैल पाहिजेत तर गाय हि पाहिजे इत्यादि विचार-श्रेणी ठीक आहे. पण हिंदुस्थानचें हें च एक अर्थशास्त्र होऊं शकतें काय? दुसरें अर्थशास्त्र होऊं शकत नाहीं का? परिस्थिति अनुकूल होईल, तेव्हां शेतीचें काम ट्रॅक्टरनें कां करूं नये?"

ह्याच्याउत्तरा दाखल मी विचारतों, कीं ट्रॅक्टर चालवूं तर बैलाचें काय होईल? जबाब येतो, "बैलाला हिंदुस्थानच्या लोकांनीं खावें. हिंदुस्थानचे लोक दुसऱ्या अनेक प्राण्यांचें मांस खात च आहेत. तसें च बैलाचें मांस हि खातां येईल. हा मार्ग कां स्वीकारूं नये?" अशा प्रकारें जेव्हां बैलाला खाण्याची व्यवस्था होईल, तेव्हां च ट्रॅक्टरनें जमीन नांगरण्याची योजना होऊं शकेल. बोललें जातें, कीं बैल खायला हिंदू तयार नसतील तर अ-हिंदूंनीं ते खावे. आज सुद्धां हिंदू लोक गाय विकतात च. स्वतः कसायापासून पैसे घेतात आणि कसायाला गोहत्येचें पाप देऊन टाकतात! अशी सुंदर आर्थिक व्यवस्था त्यांनीं आपल्यासाठीं बनवली आहे. हिंदू म्हणतो, कीं जर मी कसायाला गाय मोफत देत असतां, तर

गोहत्येच्या पापाचा मी भागीदार झालों असतों. पण मी तर त्याला गाय विकत असतों, म्हणून पापाचा वांटेकरी मी नाहीं होत. ही च व्यवस्था आणखी जरा व्यापक केली, म्हणजे सर्व ठीक होईल. आम्ही म्हशीपासून दूध-तूप घेऊं, बैलांना खाऊन टाकूं, यंत्रांनीं शेती करूं, अशा प्रकारें तिघांचा प्रश्न सुटेल.

ह्याच्या उत्तरांत मी आपल्याला हें समजावूं इच्छितों, कीं बैल खाणें कां योग्य नाहीं. पूर्वपक्षाचा तर्क असा आहे, कीं कांहीं पूर्वग्रहदूषित वेडपे बैलांना न खावोत, पण बाकीचे तर खातील, आणि आम्ही यंत्रद्वारा मजेनें शेती करूं. ह्या बाबतींत आमचे विचार स्पष्ट असावयास पाहिजेत. माझा असा विश्वास आहे, कीं हिंदुस्थानची आज जी स्थिति आहे, आणि पुढें जी होणारी आहे, त्या स्थितींत जर आम्ही गोमांसाचा प्रचार करूं, आणि यंत्रांनीं शेती करूं, तर आम्ही जिवंत राहणार नाहीं. हें समजणें अगत्याचें आहे. हिंदुस्थानचे लोक जर गाईबैलांना खाऊं लागले, तर किती गाईबैल लागतील? इतक्या बैलांची पैदास आम्ही करूं शकणार नाहीं. नाममात्र मांस खाण्याचें ढोंग तर करायचें नाहीं? मांस जर खायचें च असेल तर तो आमच्या भोजनांतील नियमित भाग झाला पाहिजे. तर च त्याचा काय जो अपेक्षित लाभ असेल, तो होईल. पण आम्हांला हें माहीत आहे, कीं माणशीं सव्वा एकर जमिनीच्या ज़ोरावर आमच्या खाण्याला पुरेसे बैल निर्माण होणें शक्य नाहीं. जर आम्ही असला उद्योग करूं लागलों, आणि शेती ट्रॅक्टरनें होऊं लागली, तर एक, ट्रॅक्टरचा खर्च वाढेल, मांस हि पुरें पडणार नाहीं, आणि शेवटीं गाई-बैलाचा वंश च नष्ट होऊन त्याबरोबर मनुष्य हि नाश पावेल.

युरोप आणि अमेरिका ह्यांची काय दशा आहे? दक्षिण अमेरिकें-तील अर्जेन्टिना हा एक प्रचंड गवताळ जमिनीचा ओसाड प्रदेश गाई-बैलांना खाण्यासाठीं पडलेला असल्यामुळें तेथें भरपूर जनावरांचा पुरवठा होतो. आणि एकट्या ब्यूनॉस आयरिसच्या बंदरांत रोजचे दहा हजारांवर बैल कापले

**यूरोप-अमेरिकेचें उदाहरण**

जातात. आणि तिथून मांसाचे डबे दूरदूरच्या देशांना रवाना होत असतात. युद्धामुळें आतां तर ही व्यवस्था युरोपच्या कामाची राहिलेली नाहीं. परंतु एरवीं हि हा क्रम जर असा च चालू राहिला, तर कालांतरानें लोकांना मांस मिळणें कठिण होईल. म्हणून युरोपच्या डॉक्टरांनीं आतां असा शोध केला आहे, आणि पुष्कळ विचारान्तीं निर्णय दिला आहे ( संभव आहे ह्यांत हि मतभेद असेल, कारण, डॉक्टर लोकांत मतभेद नेहमीं च असतात ) कीं मांसापेक्षां दूध अधिक गुणवान् आहे. हा शोध आमच्या आयुर्वेदिक वैद्यांनीं आणि हकीमांनीं पुष्कळ पूर्वी केलेला आहे. मी असें मानतों, कीं आज युरोपचे लोक ज्या प्रमाणें मांसाहार करतात त्या च प्रमाणें हिंदुस्थानचे लोक हि प्राचीन काळीं मांसाहार करीत होते. शेवटीं ते ह्या निर्णयावर आले, कीं जर आम्हीं मांसाऐवजीं दूध वापरूं तर च आम्ही जिवंत राहूं, आणि गाई हि जिवंत राहतील. म्हणून ट्रॅक्टरचा उपयोग आमचा प्रश्न सोडवणारा नाहीं. आणि म्हणून आम्हीं हें समजलें पाहिजे, कीं मांसापेक्षां दुधावर भरंवसा ठेवणें सर्व प्रकारें अपरिहार्य आणि अवश्यक आहे.

माझी अशी भविष्यवाणी आहे, कीं जसजशी लोकसंख्या वाढत जाईल तसतसें जगभर मांसाचें महत्त्व कमी होईल आणि दुधाचें वाढेल.

**दुधाचा महिमा**

विचारलें जातें, “शेवटीं दूध तरी प्राणिजन्य च आहे ना ?” होय, आहे तर खरें. “मग दूध पवित्र कां मानलें गेलें ?” ह्याचें उत्तर आतां मीं जें कांहीं सांगितलें त्यांत मिळण्यासारखें आहे. आतां मी सांगून चुकलों, कीं एका काळीं हिंदुस्थानांत मांसाहार च चालू होता. त्यांतून सुटण्यासाठीं काय करावें, हा प्रश्न उत्पन्न झाला. योग्यांनीं आणि वैद्यांनीं लोकांच्या पुढें गाईच्या दुधाचा महिमा वर्णिला. तेव्हां दूध एक अशी वस्तु ठरली, कीं जिनें माणसाला मांसाहारांतून सोडवावें. म्हणून दूध पवित्र मानलें गेलें. ह्याचा पुरावा वेदांत हि मिळूं शकतो. ऋग्वेदांत असें वचन आहे—

**गोभिष्टरेम अमतिं दुरेवां, यवेन क्षुधं पुरुहूत विश्वाम् ।**

ह्या मंत्राचा अर्थ मीं असा केला आहे—"दुनियेची भूक तर आम्ही धान्याच्या आधारावर भागवूं शकतों. पण 'दुरेवां अमतिं' म्हणजे दुर्मार्गांत नेणारी अबुद्धि, अर्थात् मांसाकडे प्रवृत्त करणारी अबुद्धि आम्ही गाईच्या दुधाच्या द्वारें च मिटवूं शकतों." सर्व प्रकारची अबुद्धि दूर करण्याला गाईचें दूध आमच्या कामीं पडतें. म्हणून गाईचें दूध पवित्र मानलें गेलें आणि मानावयाचें. सर्व मिळून भावार्थ हा, कीं ट्रॅक्टर-निष्ठा जे लोक शिकवून राहिले आहेत, ते संपूर्ण चुकत आहेत.

आतां ह्यानंतर मला सांगायचें फार थोडें राहतें. तेव्हां आतां आमच्या संघाच्या मंडळीच्या कर्तव्याविषयीं थोडें सांगतों. आज तर एक

**कांहीं सूचना**

संघ स्थापला गेला आहे. त्याविषयीं हिंदुस्थानला विचार-प्रेरणा द्यावयाची आहे. आम्हांला एक व्यापक प्रचार कार्य करावयाचें आहे. पण सर्वांत प्रथम गोष्ट ही करावयाला पाहिजे आहे, कीं गोसेवा संघाचे जितके सदस्य आहेत, त्यांनीं स्वदेशी धर्माला अनुसरून, ते जिथें असतील तिथें, कार्य सुरूं करायचें. प्रत्येक शहरांत गाईचें निर्मळ आणि उत्तम दूध मिळेल, अशी व्यवस्था करायला पाहिजे. गांवांत गाई राखून गोसेवेला उत्तेजन द्यावयास पाहिजे, आणि प्रयोगक्षेत्र जवळ च ठेवलें पाहिजे. आमचा विद्यार्थी ज्याप्रमाणें गाईची व्यक्तिगत सेवा करीत आहे, त्या प्रमाणें, होऊं शकेल तर, व्यक्तिगत सेवा करायला पाहिजे. अशा प्रकारें न करतां केवळ आम्ही व्यापक मत-प्रचाराला लागूं तेवढ्यानें हें कार्य वाढणार नाहीं. आम्हीं कांहीं सक्रिय सेवा, जिथें असूं तिथें, आरंभिली पाहिजे. हा एक मार्ग कार्य करण्याबाबत मीं सुचविला.

दुसरी गोष्ट अशी, कीं आमच्या गोसेवा-संघाचे बहुतेक सदस्य इतर विधायक कार्यक्रम करणारांपैकीं च आहेत. आम्हांला अशी एक

**विधायक दृष्टीची आवश्यकता**

दृष्टि हवी, कीं आमचीं जेवढीं कार्यें आहेत, तीं आम्ही खंडित स्वरूपांत अलग अलग तुकडे मानून करूं, तर आम्हांला यश लाभावयाचें नाहीं. खादी, ग्रामोद्योग,

गोसेवा आदि सर्व मिळून एक पूर्ण कार्य आहे. हें आम्हीं लक्षांत घेतलें पाहिजे.

मी एक उदाहरण देतों. आम्ही मंडळी सुरगांवला गेलों होतों. तिथें आम्ही एक कोल्हू (तेल-घाणा) चालवतों. आणि तें तेल गांववाल्यांना मिळतें. गांववाल्यांना विचारलें, कीं एका कोल्हूनें गांवची गरज पुरी पडेल का? उत्तर मिळालें, एका कोल्हूनें काम पुरें होत नाहीं. मग विचारलें, दुसरा कोल्हू कां करीत नाहीं? त्यांनीं उत्तर दिलें, असें करतां आलें तर फार चांगलें होईल. मग ठरलें, कीं दोन कोल्हू चालवावयाचे. सर्व तेल गांवांत होईल, तर बाहेरचें तेल गांवांत येणार नाहीं, आणि येऊं द्यावयाचें नाहीं. दोन कोल्हू तर झाले. पण प्रश्न निघाला, कीं ढेप बनते तिचें काय करावयाचें? कारण, तिथें पूर्ण दाम देऊन ढेपीला मागणी नाहीं. मग ढेपीच्या मानानें तितक्या गाई तेथें पाळण्याचें ठरलें. अशा तऱ्हेनें गोसेवा तेथें कोल्हूशीं जोडली गेली. अशा च प्रकारें जेव्हां आम्ही खादी, कोल्हू, गाय इत्यादि सर्व विधायक प्रवृत्ति एकवटून विचार करूं, तेव्हां आमची योजना असफल आणि अर्थहीन नव्हे, पण सफल आणि अर्थयुक्त होईल. मला असें म्हणावयाचें नाहीं, कीं आम्हीं सगळ्या च कामांत डोकें लढविलें पाहिजे. पण आमचे जे कार्यकर्ते भिन्न भिन्न कामांत आहेत, त्यांच्यासाठीं ही एक दृष्टि मी देत आहें

आतां च एक सवाल विचारला गेला, कीं गोसेवाकार्य विधायक कार्यक्रमांत येतें काय? बापूंनीं त्याचें अहिंसेच्या दृष्टीनें आणि आपल्या नम्र भाषेंत उत्तर दिलें. हा च सवाल मला विचारला जाईल, तर मी पृच्छकाला उलट सवाल विचारीन, कीं गोसेवाकार्य हें आपण विध्वंसक कार्य मानतां काय? जर तें विध्वंसक कार्य नाहीं, तर तें विधायक उघड च आहे. इतकें हि समजण्याची बुद्धि आम्हांस नसावी काय? जर आम्ही खादी, ग्रामोद्योग आणि गोसेवा ह्यांना अलग तुकडे मानूं, तर तीं सर्व कार्यें प्राणहीन होतील. हें च आमचें अर्थशास्त्र आहे, आणि तें आम्हांला समजून घ्यावयाचें आहे. तें आम्हांला परिपूर्ण आणि सकलांग बनवावयाचें आहे. आमच्या सदस्यांना

मला सांगावयाचें आहे, कीं त्यांनीं गोसेवेच्या कामांत भेद-दृष्टि वापरूं नये. तें परिपूर्ण करण्यासाठीं झटावें, आणि शास्त्रशुद्ध काम करावें.

बंधूंनो! मीं, मला ह्यावेळीं काय सांगावयाचें होतें तें, सांगून टाकलें आहे. तूर्त कांहीं अधिक सांगण्याची मला गरज दिसत नाहीं.

---

# २९ राज्यकारण कीं स्वराज्यकारण ?

एका भिकाऱ्याला स्वप्नांत राज्यपद लाभलें. पण राज्य चालविण्याची त्याला पंचाईत पडली. तो विचार करूं लागला: 'प्रधानाशीं मी काय बोलूं, आणि सेनापति माझें कसें ऐकेल?' भिकाऱ्याचें च तें डोकें. त्याचा निर्णय होई ना. थोड्या वेळानें तो जागा झाला. आणि त्याचे प्रश्न सुटले.

आमचें हि असें च होऊं पाहत आहे. हिंदुस्थानला स्वराज्य मिळून चुकलें असें समजून मंडळींनीं विचार आरंभिला. तर त्यांना एकदम च विश्वरूप-दर्शन झालें. 'परचक्राचें काय करणार? अंतर्गत बंडाळी कशी मोडणार?' एक म्हणाला, 'हिंसेचा कांहीं उपयोग नाहीं.' दुसरा म्हणाला 'अहिंसेची आमची तयारी नाहीं.' तिसरा म्हणाला, 'कांहीं अहिंसा कांहीं हिंसा जसें जमेल तसें करूं. तूर्त आपण गांधीजींना मोकळे करूं. सरकारशीं अहिंसात्मक असहकार तर आपला आहे च आहे. पण पाहूं. देवाच्या दयेनें आणि हिटलरच्या दाबानें सरकारला सुबुद्धि सुचून स्वराज्याचें शब्दोदक हातांत पडलें तर सरकारच्या युद्ध-यंत्राला मदत करूं. इंग्लंडपाशीं शस्त्रसामग्री आहे. आमच्यापाशीं मनुष्यबळ आहे. दोहोंचा जोड बसला तर बहुधा प्रश्न उकलेल.'

एकूण भावार्थ हा कीं स्वराज्य आम्हीं मिळविलेलें नाहीं. म्हणून विचाराचे हे घोटाळे उत्पन्न होत आहेत. अहिंसेच्या शक्तीनें जर आम्हीं स्वराज्य मिळविलेलें असतें किंवा मिळवूं—आणि अहिंसेशिवाय स्वराज्य

मिळवायला दुसरी शक्ति नाहीं हें वर्किंग कमिटी स्पष्ट च सांगत आहे—तर त्या च शक्तीनें पुढचे प्रश्न कसे उकलायचे हें सुचलें असतें किंवा सुचेल. आज श्रद्धा दृढ करण्याचा च मुद्दा होता. ज्ञान पायरी पायरीनें च होऊं शकतें हा तर ज्ञानाचा महिमा आहे.

पण आज काय होऊन राहिलें आहे ? "गांधीजींचा त्याग करणें आम्हांला सोपें नव्हतें. पण तेवढा कठिण त्याग करून आम्हीं सहकार्याचा हात सरकारपुढें केला आहे. सरकारनें आम्हांला स्वराज्याचा शब्द द्यावा. आणि आमचें सहकार्य मिळवावें." असें आमचे पुढारी आतां जीव तोडून विनंती करतांना दिसत आहेत.

ह्या विचित्र घटनेचा जों जों विचार करावा तों तों विचाराला उत्तरोत्तर व्यथा च होत जाते. समजा सरकारनें ही विनंती मान्य केली, आणि सरकारच्या युद्ध-यंत्रांत काँग्रेस दाखल झाली; तर ज्या क्षणीं ती स्वराज्याचा शब्द पदरांत पाडून घेते, त्या च क्षणीं ती स्वराज्याचा अर्थ शेंकडों वर्षे दूर लोटते, अशी स्थिति निर्माण होत आहे.

हिंसात्मक युद्धांत भाग घेण्याचें ज्यानें ठरविलें त्यानें सुरवातीला न्यायान्यायाचा काय थोडा फार विचार केला असेल तो असेल. पण युद्ध-चक्रांत एकदां सांपडल्यानंतर पुढें न्यायान्यायापेक्षां बलाबलाचा विचार च मुख्य ठरतो. जपाननें ब्रिटनला नोटिस दिली : 'ब्रह्मदेशांतून चीनला सामग्री पुरविली जाते ती बंद करा.' ब्रिटननें काय केलें ? तूर्त पावसाळ्याच्या तीन महिन्यांपुरतें जपानचें म्हणणें मान्य करून आपली सुटका करून घेतली. पं. जवाहरलालजी यावर मोकळ्या मनानें टीका करतात, 'चीनचा पक्ष न्यायाचा असतांना जपान जबरदस्त म्हणून त्याचें म्हणणें मान्य करणें योग्य नव्हे.' ब्रिटनच्या युद्ध-यंत्रांत प्रवेश केल्यानंतर मग अशी मोकळी टीका करणें सोपें जाणार नाहीं. जपाननें नोटिस दिली ती इंग्लंड अडचणींत आहे हें पाहून च दिली. आतां ती अमान्य करायची आणि जपानचें शत्रुत्व पतकरायचें म्हणजे तितकें बळ आपल्यापाशीं पाहिजे. इंग्लंडचें एक वेळ सोडा. फ्रान्सनें काय करायचें ? जपाननें फ्रेंच इन्डो-

चायनाला नोटिस कसली धमकी च दिली म्हणा ना कीं 'खबरदार, फ्रेंच इन्डोचायनामधून चीनला कांहीं मदत पोंचली तर.' फ्रेंच इन्डोचायनानें तें निमूटपणें कबूल केलें. इंग्लंडनें तीन महिन्यांपुरती मुदत तरी घालून ठेवली आहे. फ्रेंच इन्डोचायनानें तर बेमुदत मान्यता देऊन टाकली. चीन तक्रार करतें– 'फ्रान्सनें आमच्याशीं झालेला करार मोडला.' फ्रान्सची च जेथें कंबर मोडली तेथें तो आतां करार काय पाळणार होता ? अथवा फ्रान्सची गोष्ट कशाला ? हिटलर जो आज 'बळियाशिरोमणि' मानला जात आहे तो तरी काय करीत आहे ! रशियाला तो खुशाल पाय पसरूं देतो, तें काय रशियाचा पक्ष त्याच्या मतानें न्यायाचा असेल म्हणून ? हिंसेचें शस्त्र स्वीकारल्यानंतर बलाबल-विचार प्रधान. न्याय आपल्या बाजूला असेल तेवढा असेल आणि नसेल तेवढा नसेल. हिंदुस्थाननें काय किंवा कोणीं हि काय आजच्या यांत्रिक जगांत हिंसा स्वीकारायची म्हणजे न्यायाची आणि लोकशाहीची भाषा बाजूला च ठेवायची.

ब्रिटनशीं हिंसात्मक सहकार करण्याला आज तयार होणें म्हणजे केवळ अहिंसा-परित्याग च नव्हे, पण एकदम हिंसेच्या खोल पाण्यांत शिरणें आहे. हिंदुस्थाननें स्वखुषीनें, युरोपांत, आफ्रिकेंत, आशियांत माणूसमारी-साठीं माणसें पाठवायचीं म्हणजे जगभर विद्वेषाची आग लावायला प्रवृत्त व्हायचें. हिंदुस्थानच्या बाहेर माणसें पाठवीत नाहीं असें तर म्हणणें शक्य च नाहीं. कारण हिन्दुस्थानचा बचाव म्हणून एक तुटक वस्तु उरत च नाहीं. आफ्रिकेचा किनारा, भूमध्य समुद्र इत्यादि सर्व हिंदुस्थानच्या च सरहद्दी समजल्याशिवाय गत्यंतर नाहीं. म्हणजे वीस वर्षांची कॉंग्रेसची कमाई, आणि तीमुळें जगांत निर्माण झालेली आशा ही तर गेली च, पण हिंदुस्थानची हजारों वर्षांची कमाई वायां गेली. हिंदुस्थानच्या आप-ल्याला माहीत असलेल्या सबंध इतिहासांत हिंदी माणसें स्वेच्छा-पूर्वक हिंदुस्थानच्या बाहेर संहारार्थ निघालीं असें उदाहरण नाहीं. आम्ही बचावाची हिंसा करूं, उठावाची करणार नाहीं, हें हि जमायचें नाहीं.

'अमर्यादा-पुरुषोत्तम' हें च आमचें दैवत व्हायचें, आणि त्याची पूर्ण उपासना करूं तर च आम्ही यशस्वी व्हायचे.

आणि यशस्वी व्हायचें म्हणजे काय? इंग्लंडचे जेवढे शत्रु ते सारे आमचे शत्रु बनवून ठेवावयाचे. स्वराज्याच्या पहिल्या च हप्त्यांत एवढें मोठें शत्रुत्व खरीद करणें म्हणजे जवळपास कायमच्या पारतंत्र्याची सोय करून ठेवणें आहे.

एवढें शत्रुत्व कोणाच्या बळावर पचवायची उमेद राखायची? अर्थात् जितकी लांब आपली नजर जाऊं शकते तेवढ्या काळापुरतें बोलायचें म्हणजे इंग्लंडच्या बळावर. हा हि मुद्दा विचारांत घेण्यासारखा आहे. माणशीं जेमतेम एक एकर जमीन असलेल्या राष्ट्रानें, अन्य राष्ट्रांना लुटण्याची कल्पना सोडल्यास, अवांतर किती हि जोर मारला तरी लष्करावर विशेष प्रमाणावर पैसा खर्च करणें स्पष्टपणें अशक्य आहे. इंग्लंडचा चालू युद्धाचा रोजचा खर्च सुमारें दहा कोटि रुपये आहे. हे असले राक्षसी खर्च राक्षस च करूं शकायचे. हिंदुस्थानांतील मानवांचें तें काम नाहीं. हिंदुस्थानांतील मानवांनीं तें आपलें काम समजूं नये. असे राक्षस जगांत जे कांहीं आहेत ते च जगाला गरजेपेक्षां अधिक झाले आहेत. हिंदुस्थानची आणखी त्यांत भर पडायला नको आहे. आणि सुदैवानें हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिति किती हि सुधारली तरी हिंदुस्थानला तें शक्य हि नाहीं. हिंदुस्थानला फार मोठें लष्कर ठेवणें शक्य नाहीं, म्हणून त्याला बिनलष्कराचा मार्ग च एकंदरींत सोईस्कर होईल, असें जवाहरलालजी हि कधीं कधीं म्हणत असतात. अशा राष्ट्राला शत्रु-निर्माण-कला स्वाश्रयानें परवडणारी नव्हे. इतक्या हि उपर त्या कलेची उमेदवारी करावयाची म्हणजे अर्थात् ती पराश्रयानें च करायची. म्हणजे काय? इंग्लंडकडून आम्ही आज स्वराज्याचें, नव्हे अगदीं पक्क्या पूर्ण स्वराज्याचें, वचन घ्यायचें; आणि तें त्यांना सप्रेम, साभार आणि सव्याज परत करायचें. भगवान् अर्जुनाला गीता सांगून शेवटीं म्हणाले, 'तूं स्वेच्छेनें काय तें कर.' आणि पुन्हां म्हणाले, 'सर्व सोडून मला शरण ये.' दोहींचा मिळून अर्थ हा कीं

स्वेच्छेनें मला शरण ये. ईश्वराच्या बाबतींत भक्तानें असें च करायला हवें. तें च आम्हीं इंग्रजांच्या बाबतींत करायचें.

नैष्ठिक अहिंसा बाजूला सारणें, आणि सरकारशीं हिंसात्मक सहकार्य करणें उर्फ सरकारचें आणि अन्य हिंसा-निष्ठांचें हिंसात्मक सहकार्य स्वीकारणें, ह्यांतून निर्माण होणारी ही सारी निष्पत्ति लक्षांत घेतली म्हणजे "बहु मेळवूनि वल्लव अश पळत जाय कृष्ण सोडून" अशासारखा हा प्रकार होऊन राहिला आहे असें म्हणावें लागतें. ह्याच्या उलट कॉंग्रेसनें जर आपली अहिंसा दृढ केली, परभारें मिळणाऱ्या स्वराज्याची आशा च नव्हे तर कल्पना हि न ठेवतां कॉंग्रेसचें सहकार्य म्हणजे नैतिक सहकार्य असें जाहीर केलें, आणि स्वराज्याची सांगड चालू युद्धाशीं न घालतां, स्व-राज्य स्व-शक्तीनें यथासमय, मातींतून गणपति निर्माण करावा त्याप्रमाणें, आमच्या अंतरंगांतून निर्माण करण्याची कारागिरी अवलंबिली, तर सर्व प्रकारें कुशल होणार नाहीं काय? असें स्वराज्य टाळणें कोणाला हि शक्य व्हावयाचें नाहीं. सूर्यासारखें तें सहज उगवायचें. सूर्य उगवतो पूर्वेला तर प्रकाश आणि ऊन पसरतें थेट पश्चिमेपर्यंत सगळीकडे. ह्या स्वराज्याचें हि असें च व्हायचें. हिंदुस्थानांत तें जन्माला यायचें. पण साऱ्या जगाला त्यानें मुक्तीचा मार्ग मोकळा व्हायचा. त्याचा शत्रु जन्मण्याच्या अगोदर मरायचा. अंतर्गत बंडाळीचा संभव मिटवून च तें जन्माला आलेलें, त्यामुळें त्याच्या निवारणाचा प्रश्न तोंड च दाखवायचा नाहीं. आणि परचक्राची हि ती च गत व्हायची. किंवा ह्या दोन्ही प्रश्नांचे अवशेष कल्पून घेतले तरी त्यांची सोडवणूक आज भासते तशी बिकट भासायची नाहीं. हें स्वराज्य किती हि उशिरा मिळालें तरी तें च लवकरांत लवकर मिळायचें. कारण तें च स्वराज्य असायचें. आणि तें च चिरंजीव व्हायचें.

पण हिंदुस्थानला स्वराज्य खरोखर अहिंसेनें मिळेल काय, अशी शंका ह्या ठिकाणीं काढणारे काढतील च. ह्या शंकेचा आपणांला येथें विचार करण्याचें कारण नाहीं. कारण ही शंका नसून निष्क्रिय लोकांचा हा निश्चय आहे. हिंदुस्थानला हिंसेनें स्वराज्य मिळण्याची शक्यता नाहीं हें ह्या

लोकांना माहीत आहे. आणि अहिंसेनें कधीं च कोणाला स्वराज्य मिळत नाहीं असा ह्यांचा विश्वास आहे. आणि म्हणून निष्क्रिय राहून टीकात्मक वाङ्मयांत भर घालण्याचा ह्यांचा कार्यक्रम ठरलेला आहे. तेव्हां त्यांच्या नादीं लागण्यांत कांहीं हंशील नाहीं. शिवाय संघटित अहिंसा हें स्वराज्याचें एकमेव व्यवहार्य साधन आहे असें आजतागाईत कॉंग्रेस मानीत आहे. आणि तशा विचारांच्यां लोकांसाठीं च हा लेख आहे.

पण कॉंग्रेसवाल्यांचा घोटाळा वेगळा च आहे. व्यवस्थित सरकारशीं सामना देऊन स्वराज्य मिळविणें, आणि अचानक येऊन पडणाऱ्या परचक्राचें किंवा अंतर्गत बंडाळीचें निवारण करणें, ह्या त्यांना अजीबात वेगळ्या कोटी भासतात. पहिली गोष्ट आमच्यापाशीं असलेल्या मोडक्या तोडक्या अहिंसेनें साधतां येईल; पण दुसरी बलवानांच्या नैष्ठिक अहिंसे-शिवाय साधणें शक्य नाहीं; ही नैष्ठिक अहिंसा आम्हीं कोठून आणायची ? हा त्यांचा पेंच आहे.

माझ्यां नम्र विचाराप्रमाणें हा एक भ्रम आहे आणि त्याचें निवारण होणें अगत्याचें आहे. स्वराज्य-रक्षणाप्रमाणें च स्वराज्य-संपादन हि नैष्ठिक अहिंसेशिवाय अशक्य आहे. आतांपर्यंत दुर्बळांच्या अहिंसेचा प्रयोग आम्हीं केला. त्यांतून थोडी फार सत्ता मिळाली किंवा मिळाल्याचा आभास झाला. मी 'आभास' म्हणतों. कारण कॉंग्रेसच्या राजवटींत काय प्रकार झाले तें आपण पाहिले च आहेत. तथापि आभास न म्हणतां थोडी-फार सत्ता मिळाली असें च आपण समजूं या. पण हा सत्ताभास अथवा ही अल्प सत्ता, आणि ज्याला आम्ही 'स्वराज्य' म्हणतों आणि ज्याला 'पूर्ण' हें विशेषण जोडल्याशिवाय आमच्या जिवाचें समाधान होत नाहीं तें आमचें उद्घोषित ध्येय, ह्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. हें अंतर गडबडगुंडा अहिंसेनें तोडलें जाणारें नाहीं. त्याला बलवानांची पराक्रमी अहिंसा च लागेल, हें समजण्याची आतां वेळ आलेली आहे. आणि हें जितक्या लवकर लक्षांत येईल तितके आमचे घोंटाळे सुटतील.

स्वराज्य हा वर वर्णिल्याप्रमाणें मातींतून निर्माण करावयाचा गणपति

आहे, नदींतून वाहून येणारा नर्मद्या नव्हे. आमच्यांतल्या थोरामोठ्यांची अशी समजूत होऊन बसली आहे, कीं आम्हीं जें थोडें-बहुत अहिंसेचें प्रदर्शन केलें, त्यानें जणूं भगवान् संतुष्ट झाला, आणि संतुष्ट झालेल्या भगवानानें आमच्या संकटमोचनार्थ चालू महायुद्ध पाठविलें. आमचा तो शुद्ध भावानें केलेला अल्पतम प्रयत्न आणि भगवंतानें पाठविलेली ही कृपा ह्यांच्या संयोगानें आमचें कार्य आतां लवकर च साधतें, ह्या कल्पनेनें ग्रासल्यामुळें दुबळी अहिंसा हि आम्हांला स्वराज्यांत ढकलील अशा गफलतींत आम्ही सांपडलों आहोंत. बेडूक सापाच्या तोंडांत सांपडला तरी तोंडांतली माशी सोडत नाहीं, तसा इंग्रजाच्या बाबतींत अनुभव आला तर आम्हांला अनायासें स्वराज्य मिळत नाहीं हें स्पष्ट च होईल. पण ह्याहून उलट अनुभव येऊन त्यानें आम्हांला स्वराज्य देऊन टाकलें तरी आम्हांला स्वराज्य मिळत नाहीं हें माझें म्हणणें मी वर मांडलेलें च आहे. नैष्ठिक अहिंसे-शिवाय स्वराज्य राखण्याची जशी आम्हांला आज पंचाईत पडली आहे तशी नैष्ठिक अहिंसेशिवाय स्वराज्य मिळविण्याची हि आम्हांला पंचाईत पडली पाहिजे.

"मग काय तुम्ही व्यवस्थित सरकारशीं सामना देणें आणि आक्र-मणाचा किंवा बंडाळीचा प्रतिकार करणें ह्यांत कांहीं च फरक करीत नाहीं ?" उत्तर: 'करतों आणि करीत नाहीं.' एकीकडे दुबळी अहिंसा चालेल आणि दुसरीकडे वीर्यवती लागेल अशा अर्थानें फरक करीत नाहीं. स्वराज्य म्हणजे पूर्ण स्वराज्य असा जर अर्थ असेल तर दोन्हीकडे वीर्यवती अहिंसा च लागेल. पण व्यविस्थत सरकारशीं सामना देतांना तिची ज्या प्रकारची कसोटी होईल त्याहून वेगळ्या प्रकारची कसोटी दुसरीकडे होईल, असा फरक मी करतों. त्यांत पुन्हां 'वेगळ्या प्रकारची' कसोटी म्हणतों. 'ज्यास्त' कसोटी असें हि निश्चयानें म्हणत नाहीं, आणि 'कमी' हि म्हणत नाहीं.

ह्यावर कांहीं लोक म्हणतात कीं "तुमचें म्हणणें सारें कबूल, पण व्यक्तिशः कबूल. नैष्ठिक अहिंसेवर आमची श्रद्धा आहे. तिची तयारी

आम्ही करूं. पाय लटपटले तरी करूं. पण आम्ही जनतेचे प्रतिनिधि आहोंत. त्यामुळें आमचे नुसते पाय च लटपटत नाहींत. डोकें हि लटपटतें. जनतेला आजच्या स्थितींत अहिंसा मानवेल काय? आमच्या मतें मानवणार नाहीं." ह्यावर दुसरे उत्तर देतात, 'ऑल इंडिया-कॉंग्रेस कमिटीचा कौल घेऊं.' मी म्हणतों ही सारी विचारसरणी च गैरलागू आहे. आम जनता, चाळीस कोटींनीं मोजली जाणारी जनता, हिंदुस्थानसारखी प्राचीन अनुभवी जनता, अनेक मानव-समूहांनीं बनलेली जनता, ही केव्हां हि, आणि कोणाला हि न पुसतां, अहिंसक समजून घ्यावी. तिला हिंसक पक्षांत ढकलणें, किंवा कमिटीला पुसणें, म्हणजे व्यर्थ वेळ च घालविणें आहे. हिंदुस्थानची जनता अहिंसक, अहिंसक आणि अहिंसक. ती "अहिंसा-वादी" नव्हे. हा 'वाद' तिच्या तर्फे तिच्या विद्वान् सेवकांनीं वदायचा आहे. ती "अहिंसा-कारी" हि नव्हे. हा 'कार' तिच्या तर्फे तिच्या सत्याग्रही सेवकांनीं करायचा आहे. ह्यांनीं आणि त्यांनीं तिला 'तूं अहिंसा वादी आहेस का? आणि तूं अहिंसाकारी आहेस का?' असा चावट प्रश्न विचारायचा नाहीं. व्यक्तिशः आमची जर अहिंसेवर श्रद्धा असेल तर त्या अहिंसेंतून शक्ति निर्माण करणें आमचें काम आहे. ह्या आमच्या कामाला जनतेचा केव्हां हि उत्तम आशीर्वाद आहे. अहिंसेसारख्या प्रश्ना-बाबत जनतेच्या मत-परिज्ञानाची गरज नाहीं. तिचें स्वभाव-परिज्ञान पुरें आहे.

ह्यावर कांहीं लोक म्हणतात, "हें हि कबूल. पण आमच्या पुढें प्रश्न तूर्तातूर्तीचा आहे. आम्ही अहिंसेचा आग्रह धरून बसलों तर आम्ही तयारी करूं. शक्ति संपादन करूं. कालांतरानें सिद्धि हि मिळवूं. पण चालू घटकेला आम्ही अगदीं च कोपऱ्यांत पडल्यासारखे होऊं. दुसरे पक्ष पुढें येतील. सरकार त्यांना हाताशीं धरील. आणि राज्यकारणांत आम्ही शुन्य अंक होऊन बसूं." कांहीं हरकत नाहीं. आपल्याला राज्यकारण करायचें च नाहीं. आपल्याला स्वराज्यकारण करायचें आहे. गांधीजी लिहितात त्या प्रमाणें पुढें जातील ते हि आपले बंधु च असतील. मी तर म्हणतों,

आपल्या ह्या स्वराज्य-साधनेच्या पवित्र कार्यांत आम्हीं ईश्वराची ही च प्रार्थना करावी, कीं आम्हांला त्यानें कोणत्या हि कोपऱ्यांत टाकावें, पण भ्रमांत आणि मोहांत टाकूं नये. आम्ही स्वराज्य-साधक आहोंत. आम्हांला राज्यकामनेचा स्पर्श न होवो.

"न त्वहं कामये राज्यम्"

ग्रा. से. वृ. ऑगस्ट, १९४०

---

# ३० प्रार्थनेनंतर

पहिल्या प्रथम माझ्यासंबंधीं च सांगतों. एकूण नऊ महिन्यांत ९. रत्तल वजन कमी झालें. त्यापैकीं ६ रत्तल वजन भरून आलें. आहार येथल्यासारखा च घेत होतों.

माझा कार्यक्रमः—सकाळची प्रार्थना, आसपास चारीबाजूला निजले-ल्यांना त्रास होऊं नये म्हणून, मनांतल्या मनांत करीत असें. त्यानंतर प्रातर्विधि, वाचन, अल्पाहार आणि मग ८॥ वाजेपर्यंत दोन वर्ग. एक वर्ग संस्कृत वाल्मीकि रामायण, आणि दुसरा वर्ग गीतेसंबंधीं चर्चा. वर्गानंतर फिरावयास जातों. नंतर थोडें लिहीत असतों. त्यानंतर भोजन, विश्रान्ति. मग थोडा वेळ सूत कांततों. नंतर सार्वजनिक सूत-कताई येथल्यासारखी च अर्धा तास होते. त्यांत सर्व तर सामील नसतात पण अर्धे अधिक असतात. कताईनंतर आदल्या दिवसाच्या कांतलेल्या तारांची नोंद होते. त्यानंतर एक मनुष्य वर्तमानपत्रीय बातम्या टांचून टिपून आणलेल्या असतात त्या ऐक-

---

[ व्यक्तिगत सत्याग्रहाच्या दुसऱ्या जेल-यात्रेनंतर तारीख १२-७-४१ रोजीं विनोबांनीं नालवाडी येथें सायंकाळच्या प्रार्थनेचे वेळीं दिलेल्या प्रवचनाचा सारांश. ]

वतो. त्यानंतर फिरणें. संध्याकाळच्या जेवणानंतर २० मिनिटें रिकामीं असतात. यानंतर संध्याकाळची प्रार्थना. हल्लीं प्रार्थनेंत स्वराज्याची आपली काय कल्पना आहे तें सांगतों. रामायण वाचीत होतों पण डोळ्याच्या कारणानें तें बंद केलें आहे. प्रार्थनेनंतर ८॥ ला झोंप व सकाळीं ४ ला जागृति.

माझ्या डोळ्यांसंबंधीं लोकांना कमी-अधिक माहिती मिळाली असेल. डोळा थोडा कमजोर झाला आहे ही गोष्ट खरी आहे. कुराणाच्या वाचनानें हें झालें आहे. एरवीं हि झालें तर असतें च पण आज आलेला थकवा कांहीं वर्षांनंतर आला असता. या थकव्यामुळें अधिक वाचण्या-लिहिण्याची शक्यता नाहीं. कर्तव्य म्हणून जेवढें वाचावें-लिहावें लागतें, त्यापेक्षां जास्तीची जरूरी हि नाहीं. मी डोळ्यांना त्रास देण्याचें बंद केलें आहे. सकाळीं फक्त अर्धा तास कुराणासाठीं देतों.

यानंतर तेथल्या वातावरणासंबंधीं सांगावयाचें तर तेथें निरनिराळे लोक आहेत. प्रांताचे अध्यक्ष आहेत, तालुक्यांचे अध्यक्ष आहेत, असेम्ब्लीचे सभासद वगैरे पुष्कळ अधिकारी लोक आहेत. त्यांच्यापासून पुष्कळ घेण्यासारखें आहे. माझ्या लक्षांत एक गोष्ट आली कीं या सर्व समाजाला एकत्र रहावयाचें आहे तर त्यांच्यांत कांही सामुदायिक भावना निर्माण व्हावयास हवी.

सामुदायिक भावना निर्माण होण्याला मला तकली हें साधन उत्तम वाटतें. या गोष्टीचा अनुभव जेलमध्यें पुष्कळ लोकांना आला. माझें जेव्हां सुटावयाचें ठरलें तेव्हां मंडळींनीं ठरविलें कीं उद्यां रोजच्या अर्धा तासाऐवजीं एक तास कांतावयाचें आणि तें सूत विनोबांना द्यावयाचें. काल मी सुटावयाच्या वेळीं सर्व लोक एकत्र आले होते. त्यांनीं प्रेमाची संज्ञा म्हणून तें सूत दिलें आहे. ही समुदाय-भावना आहे.

एप्रिलच्या ६ किंवा १३ कोणत्या तरी एका तारखेला कांहीं मंडळींनीं २४ तास अखंड सूत कांतलें. त्यांत विशेष गोष्ट ही होती कीं दोन माणसांनीं अखंड २४ तास दोन तकल्या चालविल्या. असला प्रयोग आपल्या येथें आतांपर्यंत केला गेला नव्हता, तो तेथें झाला. त्यांपैकीं

एकानें २४ तासांत २१ लटी कांतल्या. तासांत १ लट पडली असती तर गति बरी पडली असें म्हटलें असतें. कांतणारानें दोन्ही हातांनीं सूत कांतलें. त्याला थकवा तर आला होता च. पण तो मुख्यतः बसण्याचा होता. हात किंवा पोटरी दुखली असा नव्हता.

यानंतर येथील मंडळींना कांहीं गोष्टी सांगावयाच्या आहेत. माझें लक्ष खांडण-विंचरणाच्या प्रयोगाकडे लागून राहिलें आहे. त्यासंबंधीं मीं लेख हि लिहिला होता. त्यांत सूचित केलें होतें कीं मंडळींनीं यासंबंधीं चे आपले अनुभव मला कळवावे. परंतु त्यासंबंधीं कोणाकडून माझ्याकडे कांहीं आलें नाहीं. मीं जेलमध्यें खांडण-विंचरण सुरू केलें परंतु माझ्या बोटांच्या घामाच्या अडचणीमुळे तो प्रयोग बंद करावा लागला. तरी पण जो कांहीं अनुभव आला त्यावरून विचार करतां सर्व क्रिया करून एका घंट्यांत एक लट होण्यास हरकत नाहीं. त्या क्रियेंत अपार शक्ति आहे. त्यासाटीं आपल्या येथील बऱ्या च मंडळींनीं रोज नियमानें अर्धा तास घालविणें उपयोगाचें होईल.

आपल्या मंडळींनीं आपल्या जीवनाच्या तत्त्वांचा अभ्यास केला पाहिजे. आपल्या येथील मंडळींना आपल्या सर्व तत्त्वज्ञानाची माहिती असावयास पाहिजे. खादी-शास्त्राच्या ज्या परीक्षा निघाल्या आहेत त्या तर द्याव्या च. शिवाय आपल्या येथील सर्वांकडून ग्रामोद्योग, खादी वगैरे तत्त्वांचा अभ्यास झाला पाहिजे.

आपल्या मंडळींत हिन्दु-मुसलमान ही भावना नाहीं. पण आपल्या मनांत तशी भावना नाहीं म्हणून आतां आपल्याला कांहीं करावयाचें नाहीं असें नाहीं. आज सर्वत्र जे दंगेधोपे होऊन राहिले आहेत त्यांत प्राणाहुति देण्याची पाळी आली तर खुशाल प्राण सोडतां यावे अशी आपली तयारी पाहिजे. या यादवींत प्राण देण्याची आपल्यावर पाळी आली तर तो शुभ मुहूर्त वाटला पाहिजे. आपलें प्रेम उत्कर्षाला पोहोंचलें असेल तर च आपण तसें करूं शकूं. प्रेमाच्या अभावीं असें होणार नाहीं. एकमेकांविषयींचें प्रेम परिपूर्ण आणि उत्कट असलें पाहिजे. आतां च आपण रामायणांत वाचलें,

कीं रामचंद्र जटायूला सांगून राहिले आहेत, "या जटायू! तुझ्या पुण्यानें च तुला गति मिळाली आहे. जे परहिताविषयीं नेहमीं तत्पर असतात त्यांना या जगांत दुर्लभ असें कांहीं च नाहीं." आपल्या चित्तांत कोणत्या हि प्रकारचा भेदभाव नसला पाहिजे. तर च आपण कसोटीला टिकूं.

येथें प्रार्थना ठीक होऊन राहिली आहे. पण शेवटीं जी सूत-नोंद होते त्यांत सर्वांचीं नांवें दिसत नाहींत. तीं नांवें असावयास पाहिजेत. या बाबतींत पाश्चात्त्य राष्ट्रांचा दाखला घेण्यासारखा आहे. लाखों माणसें दोन्ही बाजूंला लढून राहिलीं आहेत. केवढी त्यांची रचना शक्ति, किती अफाट व्यवस्था! शत्रूच्या हातांत आपली मालमत्ता पडूं नये म्हणून आपलें ठिकाण सोडून जातांना ती पद्धतशीरपणें जाळून टाकतात. लढाईंत जीं जीं ठिकाणें जिंकीत जातात त्या ठिकाणीं त्यांना आपल्याबरोबर वीज, रेल्वे, पाणी, अन्न सर्व कांहीं घेऊन जावें लागतें. ही त्यांची रचनाशक्ति आपल्यांत यावयास पाहिजे आणि आपल्याला ती सहज असावयास पाहिजे. या आपल्या सूत नोंदण्याच्या लहानशा क्रियेंत आपल्या जीवन-श्रद्धेचा अंश ओतला पाहिजे.

आतां पहा ना, मला जर हें वळण लागलें नसतें तर मी जेलमध्यें जाऊन काय करूं शकलों असतों? आज जेलमध्यें जी प्रेमाची गांठ दिसून राहिली आहे ती एरवीं दिसली नसती. तेथें एकूण ३५ चरखा संघाचे सभासद – महिन्यांत हजार वार सूत देणारे – झाले. हा सर्व परिणाम कशाचा आहे? आतां हें सर्व किती दिवस टिकेल तें एका परमेश्वराला च माहीत. परंतु आपण जेथें जाऊं तेथें आपलें वातावरण आपल्याभोंवतीं निर्माण झालें पाहिजे. सूर्य जेथें जातो तेथें आपले किरण तो आपल्याबरोबर च घेऊन जातो.

---

# ग्राम-सेवा-मंडळ, वरधा

## —प्रकाशन—

| | | किंमत रु. आ. | ट. ख. आ. पै. |
|---|---|---|---|
| | पू० विनोबा कृत— | | |
| १ | मधुकर (आवृत्ति तिसरी) | १—८ | २—० |
| २ | जीवन-दृष्टि (आवृत्ति दुसरी) | १—८ | २—० |
| ३ | *विनोबाके विचार पहिला भाग (आ० दुसरी) | १—८ | २—० |
| | ,, ,, दूसरा भाग | १—८ | २—० |
| ४ | स्वराज्य-शास्त्र (आवृत्ति दुसरी) | ०—१० | १—३ |
| | ,, ,, (हिंदी) | ०—१० | १—३ |
| ५ | गीता-प्रवचनें | २—८ | २—० |
| ६ | स्थितप्रज्ञ-दर्शन | १—८ | २—० |
| ७ | उपनिषदांचा अभ्यास (प्रस्तावना-खंड) | २—० | १—६ |
| ८ | विचार-पोथी (आवृत्ति दुसरी) | १—० | १—६ |
| | ,, हिंदी | १—८ | १—६ |
| ९ | *मूळ उद्योग : कांतणें | ०—१० | १—३ |
| | ,, हिंदी, (आवृत्ति दुसरी) | ०—१० | १—३ |
| १० | गीताध्याय-संगति | ०—१ | ०—९ |
| ११ | स्वातंत्र्याची प्रतिज्ञा आणि तिचा अर्थ | ०—४ | ०—९ |
| १२ | गीताई, (आवृत्ति नववी) | ०—२ | ०—९ |
| १३ | अभंग-व्रतें | ०—६ | ०—९ |
| १४ | ज्ञानदेवांचीं भजनें | ०—६ | १—३ |
| १५ | नामदेवांचीं भजनें (आवृत्ति दुसरी) | ०—८ | १—० |
| १६ | एकनाथांचीं भजनें | ०—६ | १—० |
| १७ | संतांचा प्रसाद | ०—१२ | १—३ |
| १८ | ईशावास्योपनिषत्, (मराठी, हिंदी) | ०—४ | ०—९ |

# ग्राम-सेवा-मंडळ, वरधा

## —प्रकाशन—

| | | किंमत रु. आ. | ट. ख. आ. पै |
|---|---|---|---|
| | **श्री० कुन्दर दिवाण कृत—** | | |
| १ | **श्रीमद्-भगवद्-गीता** विषयविभागादि-उंवलित तथा विनोबाकृत गीताध्याय-संगतिके साथ | ०—४ | १—० |
| २ | गीता-गीताई | ०—८ | १—३ |
| ३ | धर्म-पद | ०-१२ | १—६ |
| ४ | आश्रम-संगीत (आवृत्ति दुसरी छापत आहे) | | |
| ५ | *वस्त्रपूर्णा (मराठी) | १—४ | १—६ |
| ६ | *तकली (हिंदी, उर्दू) | १—४ | १—६ |
| | **श्री० सत्यन कृत—** | | |
| ७ | तकली कैसे कातें ? | ०—४ | १—६ |
| | **श्री० मनोहर दिवाण कृत—** | | |
| ८ | महारोग (मराठी) | १—० | १—६ |
| ९ | *कोढ (हिंदी) | ०-१२ | १—६ |

### —आगामी—

(१) सत्याग्रह आणि स्वराज्य
(२) ईशावास्य-वृत्ति
(३) तुकारामांचीं भजनें
(४) विनोबा-विचार-धारा
(५) ज्ञानदेवांचीं भजनें (चिंतनिकेसह) आवृत्ति दुसरी

---

**सूचना—**

१ पुस्तकें प्रायः व्ही. पी. नें पाठविलीं जात नाहींत.

२ टपाल खर्चाशिवाय रजिस्ट्रेशनसाठीं तीन आणे अधिक पाठवावे.

* अन्य-प्रकाशित.